# ग्रीस देशाचा
# संक्षिप्त इतिहास.



" Greece was not so much a nation, as a race, a movement, a lang-uage, a school of thought and art. "—Frederic Harrison's 'The Meaning of History', p. 99.




लेखक,

**गोविंद सखाराम सरदेसाई.**

# ग्रीस देशाचा संक्षिप्त इतिहास.

हें पुस्तक

श्रीमंत सरकार सयाजीराव महाराज गायकवाड,

सेनाखासखेल, समशेरबहादुर,

यांच्या हुकुमानें

विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां

तयार केलें आहे.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

सन १९०८.

किंमत आठ आणे.



# प्रस्तावना.

श्रीमंत सरकार **सयाजीराव महाराज गायकवाड** यांची ज्ञानार्जनाची आवड महशूर आहे. घरीं असोत किंवा प्रवासांत असोत, त्यांचा ज्ञानप्राप्तीचा उद्योग कधीं थांबत नाहीं. सन १९०५–६ सालीं त्यांनीं युरोपांत प्रवास केला, त्या वेळीं ते ग्रीस देशांत गेले. तो देश प्रत्यक्ष पाहून तेथील भयंकर स्थित्यंतराची मूर्तिमंत कल्पना त्यांच्या डोळ्यांसमोर उभी राहिली; आणि कालचक्राच्या फेऱ्यांत गोते खाणाऱ्या राष्ट्रांस इतिहासाचें मार्मिक अध्ययन हेंच खरें त्राण व आशाबंधन आहे, अशी खात्री साहजिक त्यांच्या मनांत पटली. तत्क्षणीं ह्या ग्रीस देशाचा प्राचीन इतिहास हिंदी मुलांमुलींनीं अवश्य वाचला पाहिजे, अशी प्रबल इच्छा उत्पन्न होऊन त्यांनीं तें काम ताबडतोब करविण्याचा हुकूम पाठविला. तदनुसार हें पुस्तक मुद्दाम तयार केलें आहे. ह्यानें ग्रीसच्या इतिहासांतील ठळक ठळक गोष्टी व स्थित्यंतरें यांचा थोडक्यांत बोध व्हावा, आणि विषय कंटाळवाणा होऊं नये असा प्रयत्न केला आहे. हें पुस्तक वाचून पुढें ग्रीक देशाचे मोठमोठे ऐतिहासिक ग्रंथ वाचण्याची स्फूर्ति आपल्या लोकांस होईल अशी आशा आहे. हें पुस्तक सर्वांस प्रिय वाटो आणि महाराजांचा स्तुत्य उद्योग जगन्नियंता तडीस नेवो, एवढीच प्रार्थना आहे.

बडोदें, राजपुत्र-विद्यालय,
माहे मे सन १९०८.

गोविंद सखाराम सरदेसाई.

# अनुक्रमणिका.

# ग्रीक इतिहासाचें महत्त्व.

इतिहास हा विषय इतका व्यापक, उपयुक्त, व गहन आहे, कीं त्याच्या स्वरूपाचें वर्णन थोडक्यांत करणें शक्य नाहीं. सृष्टिक्रमाच्या आरंभापासून आजपावेतों मनुष्याची प्रगति कसकशी होत गेली, ह्याचें तात्त्विक विवेचन म्हणजेच इतिहास होय. आपण ह्या सृष्टिरूपी विराट शरीराचे जिवंत घटकावयव आहों. तें शरीर अगदीं मंद गतीनें पण एकसारखें वृद्धि पावत आहे. ह्या वृद्धीची कथा प्रत्येकानें समजून घेतली पाहिजे. म्हणजे मनुष्यप्राण्याचा अखिल जीवनक्रम व त्याची अद्भुत उत्क्रान्ति आपणांस बरोबर कळेल, तरच इह-लोकची यात्रा आपणांस सुखानें पार पाडतां येईल. अलीकडेस अनेक विद्वानांनीं मोठे परिश्रम करून वरील उत्क्रान्ति स्पष्ट व सुसंबद्ध करून दाखविली आहे.

खरा व मार्मिक इतिहास लिहिण्याचें काम प्रथम ग्रीक लोकांनीं केलें. इसवी सनाच्या पूर्वी चारशें वर्षें हिरॉडॉटस नांवाचा एक ग्रीक इतिहासकार झाला. त्यानें डोळ्यांसमोर घडलेल्या व ऐकिलेल्या गोष्टींच्या कथा वर्णन करून आपल्या अप्रतिम बुद्धिकौशल्यानें एक अद्वितीय करामत करून ठेविली आहे, तिजवरून त्यास ' इतिहासाचा जनक ' असें यथार्थ नांव मिळालें आहे. हिरॉडॉट-सचा ग्रंथ प्रत्यक्ष अगर भाषांतरद्वारा प्रत्येकानें वाचण्यालायक आहे

मुखपृष्ठावरील अवतरणांत सांगितल्याप्रमाणें, ग्रीस हा कांहीं एक देश नव्हता, किंवा तें एक राष्ट्रही नव्हतें. पश्चिमेस स्पेनच्या किनाऱ्यापासून पूर्वेस यूफ्रेटिस नदीपर्यंत, आणि दक्षिणेस आफ्रि-केच्या उत्तरकिनाऱ्यापासून उत्तरेस काळ्या समुद्रापर्यंत जो मोठा टापू, त्यांतील अनेक प्रदेशांत व अनेक बेटांत ठिकठिकाणीं ग्रीक लोक वसाहत करून राहिले होते. इतर राष्ट्रांप्रमाणें ग्रीक राष्ट्र

एका ठरीव टापूंत वसलेलें नव्हतें. तरी त्या सर्व ठिकाणीं त्यांची भाषा, त्यांचे स्वतंत्र विचार, त्यांच्या कला चालू होत्या. ह्या सर्वांस म्हणजे प्राचीन ग्रीक लोकांच्या सर्वसामान्य विचारांस आणि चळवळींस ग्रीस ही संज्ञा देण्यांत येते. युरोपखंडांतील आग्नेय-कोपऱ्यांत जो लहानसा द्वीपकल्प आहे तेवढाच प्राचीन ग्रीस देश असें समजावयाचें नाहीं. हा द्वीपकल्पांतर्गत प्रदेश अत्यंत डोंगराळ व संकुचित आहे. त्यांत लोकवस्तीस फारशी जागाच नाहीं. आजूबाजूच्या दोनशें मैलांत जीं बेटें आहेत, तींसुद्धां समुद्रांतून वर बुडी मारून आलेले डोंगरच कीं काय, असा भास होतो. ह्या बेटांचा समावेश ग्रीस देशांत होता. मुख्य द्वीपकल्पाचा प्रदेश फार फार तर दोनशें मैल लांब व शंभर मैल रुंद होईल. त्यांतही अनेक ठिकाणीं अखातें व खाड्या असल्यामुळें एकसारखा सलग प्रदेश फारच थोडा आहे.

अशा ह्या प्रदेशांतील लोकांच्या इतिहासास इतकें महत्त्व कां देतात ? मनुष्याच्या निर्वाहाचीं साधनें अगदीं प्राचीन काळीं ग्रीक लोकांनीं लोकांस शिकविलीं असें नाहीं. जमीन नांगरून शेती करणें, धातूंचीं हत्यारें बनविणें, दूर देशांशीं व्यापार करणें, मोठमोठ्या सुंदर इमारती बांधणें, ह्या गोष्टी ग्रीक लोकांच्याही पूर्वीं इतर राष्ट्रांस माहीत होत्या. अशा सुखसाधनांच्या संबंधानें पाहिलें तर हिंदु आणि चिनी राष्ट्रें ग्रीक लोकांच्या फारच पुढें गेलेलीं होतीं. असें असतां ग्रीक लोकांस एवढें महत्त्व येण्याचें कारण असें कीं, ऐहिक व्यवहारांत विचारशक्तीचा स्वतंत्र उपयोग प्रथम ग्रीक लोकांनीं केला. उदाहरणार्थ, ग्रीक लोकांनीं लहान लहान अनेक प्रजासत्ताक शहरें स्थापन केलीं. पृथ्वीच्या पाठीवर इतर ठिकाणीं अनेक राजे लष्करी जोरानें मोठमोठ्या राष्ट्रांवर करडा अम्मल गाजवीत असतां, इकडे ग्रीक लोकांनीं निरनिराळ्या शहरांत सर्वांच्या

सुखाची अशी लोकसत्ताक राज्यव्यवस्था निर्माण केली. ग्रीक वाङ्मयांतही हाच प्रकार दृष्टीस पडतो. कवि, इतिहासकार, वक्ते आणि साधु ह्या सर्वांनीं स्वतःची बुद्धि चालवून आणि स्वतंत्र विचार करुन आपापल्या उद्योगाची अगदीं कमाल करून ठेविली आहे. विचारशक्तीस योग्य वाटेल तें खरें, कोणत्याही बाबतींत दुसऱ्याचा दास म्हणून व्हावयाचें नाहीं, हें तत्त्व प्रत्येक ग्रीक मनुष्याच्या ठिकाणीं अत्यंत दृढ झालेलें होतें. म्हणून ग्रीक राष्ट्र व ग्रीक भाषा ह्यांचा अस्त होऊन पुष्कळ काळ लोटला, तरी ग्रीक लोकांच्या अप्रतिम विचारशक्तीनें पुढें युरोपांतील नानाविध सुधारणांस चलन मिळालें. धर्म, नीति, भौतिकशास्त्र, राजनीति इत्यादि विषयांत आज जी प्रगति युरोपांत दिसून येत आहे, तिचा मूळ उगम ग्रीक राष्ट्रांत झालेला आहे. नीतिशास्त्र, तर्कशास्त्र व भूमिति हे विषय तर ग्रीक लोकांनींच पूर्णत्वास आणिले. हिरॉडॉटसच्या तोडीचा इतिहासकार अजून कोणी झाला नाहीं. किंबहुना, इतिहासाची थोरवी ह्यानेंच प्रथम लोकांस दाखविली. आमच्या इकडे पुष्कळ विद्वान लोक झाले, परंतु गतकालीन घडामोडींचें यथायोग्य विवेचन करून इष्टानिष्ट प्रकार कार्यकारणभावाच्या मार्मिक विवेचनानें लोकांस समजून देण्याचें काम प्रथम हिरॉडॉटसनेंच केलें. त्याच्या निरिक्षणाची व शोधकबुद्धीची कमाल आहे. हिरॉडॉटसच्या पुढचा दुसरा ग्रीक इतिहासकार थ्युसिडायडिज होय. पेरिक्लीजच्या वेळचें आथेन्सच्या कारभाराचें व पिलॉपोनेशन युद्धाचें थ्युसिडायडिजनें केलेलें वर्णन अप्रतिम आहे. सारांश नवीन विचारांची व कल्पनांची दिशा ग्रीक ग्रंथांत दिसून येते तशी दुसऱ्या भाषेंत सांपडत नाहीं. बहुतेक सर्व विषयांत नामांकित विद्वान ग्रीस देशांत निपजले. ग्रीसचीच सर्व सुधारणा रोमनें उचलली, आणि तीच पुढें पर्यायानें युरोपच्या अर्वाचीन प्रगतीस कारण झाली आहे.

## ग्रीसदेशांतील नामांकित ग्रंथकारांची यादी व त्यांचे काल.

| काळ क्रिस्तापूर्वी. | कवि व नाटककार. | वक्ते. | इतिहासकार. | तत्त्ववेत्ते व शास्त्रज्ञ. |
|---|---|---|---|---|
| ७००च्या पूर्वी केव्हां तरी | होमर. | | | |
| ६००–५०० | सोलन.<br>झेनोफेन्स.<br>इबिकस.<br>अनॅक्रियोन. | | हेकॅटियस. | थेल्स.<br>पायथॅगोरास.<br>झेनोफेन्स. |
| ५००–४०० | सिमोनिडिज.<br>पिंडार.<br>क्रॅटिनस.<br>यूपोलिस.<br>ॲरिस्टोफेनिस | ॲंटिफोन.<br>ॲंडासिडिज. | हेलानिकस.<br>हिरोडोटस.<br>थ्युसिडायडिज. | पार्मेनिडिज.<br>एंपिडॉक्लिज.<br>अनॅक्झॅगोरास.<br>सॉक्रेटिस. |
| ४००–३०० | | लिसियास.<br>इसोक्रेटिस.<br>डेमॉस्थेनिस.<br>लायकरगस.<br>हायपराइड्स.<br>दिनार्कस. | झेनोफन.<br>थिओपांपस.<br>एफोरस. | प्लेटो.<br>ॲरिस्टॉटल. |
| ३००–२०० | कॅलिमॅकस.<br>ॲरेटस.<br>थिओक्रिटस.<br>मोस्कस.<br>बियोन. | | मानीथो.<br>बेरोझस. | यूक्लिड.<br>आर्किमिडिज.<br>झेनोडोटस.<br>ॲरिस्टॉफॅनिस.<br>स्टोइक तत्त्ववेत्ते |
| २००–१०० | अपोलोनियस.<br>र्‍होडियस.<br>निकँडर. | | पोलिबियस. | ॲरिस्टार्कस.<br>अपोलोडोरस. |
| १००–१ | | डायोनिसियस. | डिओडोरस सिक्युलस. }<br>डायोनिसियस. | |
| क्रिस्तानंतर १–१०० | बाब्रियस. | | स्ट्रेबो.<br>जोझेफस.<br>प्लूटार्क. | एपिक्टेटस. |
| १००–२०० | ऑप्पियन. | हर्मोजिनिज.<br>ॲरिस्टाइड्स.<br>ल्यूसियन. | एर्रियन.<br>ॲप्पियन.<br>पॉझेनियस. | पोलक्स.<br>टॉलेमी.<br>आर्थीनियस.<br>पोलिएनस.<br>मार्कसऑरेलियस |

# ग्रीस देशाचा संक्षिप्त इतिहास.

## प्रकरण पहिलें.

### आरंभ.

—:o:—

ग्रीस देश युरोपखंडाच्या आग्नेयीस आहे. प्राचीन काळीं त्याचा विस्तार हल्लींच्याहून फार मोठा होता. त्याच्या मध्यभागीं कॉरिंथची सामुद्रधुनी असून, तिच्या योगानें देशाचे दोन भाग झाले आहेत. प्राचीन ग्रीस देशांत ह्या दोनही भागांचा समावेश होत असून, शिवाय, ईज्यनसमुद्र, आयोनियनसमुद्र व भूमध्यसमुद्र ह्यांतील सर्व बेटें व आशिया-मायनरचा कांहीं भाग हे प्रदेश त्यांत मोडत होते. ह्या दूरदूरच्या प्रदेशांत ग्रीक लोकांनीं फार प्राचीन काळीं वसाहती केल्या होत्या.

मुख्य ग्रीस देशांत प्रथम हेलन नांवाचे लोक राहत होते. हें नांव ग्रीक लोक अजूनही वापरितात; व त्यावरून आपल्या देशास हेलास असें म्हणतात. हा देश फार सुंदर आहे. त्यांत अनेक डोंगराच्या रांगा आहेत, त्यामुळें त्याचे स्वभावतः पुष्कळ विभाग झाले आहेत. ह्या प्रत्येक विभागांत प्राचीन काळापासून निरनिराळे लोक राहत होते. प्रत्येक जातीच्या लोकांचें स्वतंत्र राज्य व स्वतंत्र व्यवस्था असे. ह्यामुळें देशांत निरनिराळ्या वेळीं अनेक लहान लहान स्वतंत्र राज्यें उत्पन्न झालीं, तीं कालांतरानें पुढें उदयास आलीं.

हेलन लोकांच्या पूर्वीं ग्रीस देशांत पेलास्जन्स नांवाचे रानटी लोक राहत होते. पुढें हेलन्स हे पूर्वेकडील बाजूनें ग्रीस देशांत आले. त्यांनीं प्रथम थेसली प्रांतांत वसाहत केली; व हळूहळू दक्षिणेकडे प्रवेश केला. असें करतां करतां त्यांनीं अनेक स्वतंत्र राज्यें स्थापिलीं.

असें सांगतात कीं, हेलन लोकांचा मूळ पुरुष हेलन नामक एक राजा होता, तो ग्रीक लोकांचा देव ज्युपिटर ह्याचा पुत्र होय. ह्या राजाचेंच नांव पुढें सर्व लोकांस प्राप्त झालें. ह्या हेलन राजाचें वृत्त ऐतिहासिक नसून काल्पनिक आहे. अर्थात् तें विश्वास ठेवण्या-लायक नाहीं.

ग्रीसच्या इतिहासाच्या पहिल्या भागास वीरकाल असें म्हणतात. ह्या वीरकालीं देशांत अनेक वीरपुरुष उदयास आले. त्यांच्या कथा व कवनें देशांत उपलब्ध होतीं, तीं तपासून त्या काळचा इतिहास लिहिलेला आहे. ह्या वीरपुरुषांचा अवतार देवांपासून झाल असें ग्रीक लोक समजत, व देवांप्रमाणें त्यांची पूजा करीत. ग्रीस देशांत पुढें मोठमोठीं सरदार घराणीं उदयास आलीं, तीं अशा एखाद्या वीरपुरुषास आपला मूळपुरुष समजत. ह्या वीरपुरुषांचा काळ सुमारें दोनशें वर्षांचा, म्हणजे, हेलन्स लोक प्रथम ग्रीस देशांत आले तेव्हांपासून, ट्रॉयच्या वेढ्यापर्यंत, समजला जातो. ह्याच काळांत ग्रीक लोकांचीं राज्यें स्थापन झालीं; व त्यांच्या संस्था उदयास आल्या. ह्या राज्यांच्या व संस्थांच्या मुळांशीं अनेक दंतकथा जोड-लेल्या आढळतात, त्या मात्र निवळ काल्पनिक होत. उदाहरणार्थ, असें सांगतात कीं, सेक्रॉप्स् म्हणून एक राजा होता, त्यानें आथे-न्सची स्थापना केली; व इजिप्त देशांतील अनेक उपयुक्त गोष्टी ग्रीस देशाच्या ॲटिकाप्रांतांत चालू केल्या. त्यानें एकंदर बारा शहरें स्थापिलीं, त्यांतील सर्वांत मोठें आथेन्स होय. आथेनी म्हणून देवी होती, तिची कृपा देशावर सदोदित राहवी, ह्या हेतूनें तिचें नांव त्यानें ह्या शहरास दिलें. ही गोष्ट इ. स. पू. १५५० वे वर्षीं घडली असें सांगतात. पण आथेन्सच्या स्थापनेचा इजिप्तशीं जोडलेला संबंध खरा असण्याचा संभव फार थोडा आहे. आथेन्स शहर फिनिशन लोकांनीं स्थापिलें असावें. हे फिनिशन लोक आशिया खंडाच्या पश्चिम किनाऱ्यावर राहत असून मोठे सुधारलेले होते, व यांनीं भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर व्यापाराचीं अनेक ठाणीं वसविलीं होतीं, हें सुप्रसिद्ध आहे. त्यांच्या वेळीं ग्रीक लोक रानटी स्थितींत

असून रोमचा जन्मही झाला नव्हता. आथेन्ससारखें व्यापाराच्या सोयीचें ठिकाण फिनिशन लोकांच्या नजरेस आलें नसेल हें संभवत नाहीं. एक दंतकथा अशी आहे कीं, कॅड्मस नामक फिनिशन गृहस्थानें आपली लिपी ग्रीस देशांत प्रथम आणिली, व थीब्स् शहर वसविलें. ही कथा खोटी मानिली, तरी ग्रीक लोकांच्या प्राचीन इतिहासाशीं फिनिशन लोकांचा संबंध नव्हता असें म्हणतां येत नाहीं.

प्रत्येक राज्याच्या मुळाशीं अशी कांहीं तरी दंतकथा आहेच. प्रत्येकाचे मूळपुरुष निराळे असून ते ज्याचे त्यास पूज्य आहेत. मात्र ते पुरुष खरोखरचे होते असें मानण्यास आधार नाहीं. ग्रीक लोकांचा मात्र त्यांच्या ठिकाणीं पूर्ण विश्वास असे; व ह्या वीर-पुरुषांच्या योगानें ग्रीक लोकांचे संप्रदाय, रीतीभाती, राजकीय व धार्मिक संस्था इत्यादिकांवर अनेक परिणाम घडले आहेत.

प्राचीन ग्रीक लोक मूर्तिपूजक होते. त्यांच्या अनेक देवता असून त्यांत जुपिटर ऊर्फ झियस ह्यास अग्रस्थान मिळालें होतें. थेसली प्रांतांत आलिंपस नांवाचा पर्वत आहे. त्याच्या शिखरावर ह्या देवाचा दरबार भरत असे. जुपिटरच्या खालोखाल अपालो होय. तो विद्या व संगीतकला ह्यांचें अधिष्ठान असून, शिवाय पशूंचें संरक्षण करणें, पापाचरणाबद्दल पारिपत्य करणें, व देवेंद्र जो जुपिटर त्याचे हुकूम खालीं मानवांस कळविणें, हीं कामें अपॉलोचींच होतीं.

ग्रीक धर्मातील मुख्य वीरपुरुष हर्क्युलीज, थिसियस, ट्रिप्टो-लिमस, एस्क्युलेपियस, आणि मायनोज (Minos) हे होत. अगॅमेम्नॉन, ॲकिलीज, नेस्टॉर आणि यूलिसीज, हे त्यांच्या खालच्या पायरीचे असून, शिवाय ट्रोजन युद्धांत प्रसिद्धीस आलेल्या आणखीही अनेक वीरपुरुषांस ग्रीक लोक पूज्य मानीत असत.

प्राचीन ग्रीक इतिहासांतली बरीच विश्वसनीय गोष्ट म्हणजे ट्रॉयचा वेढा किंवा ट्रोजन युद्ध ही होय. हें युद्ध इ० स० पू० तेराशें व एक हजार ह्या काळाच्या दरम्यान झालें. ह्या युद्धाचें वर्णन प्राचीन कवितेंत केलेलें आहे. युद्ध झाल्यावर दोन तीनशें

वर्षांनीं होमर नांवाचा एक विख्यात कवि झाला, त्यानें या युद्धाचें वर्णन कवितेंत केलें. त्याचा सारांश असा.

आशियाच्या पश्चिमकिनाऱ्यावर पूर्वीं एक सुसमृद्ध राज्य होतें. त्याची राजधानी ट्रॉय शहर होतें. तेथें प्रायम नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यास पॅरिस नांवाचा एक मुलगा होता. तो मुलगा एकदां ग्रीस देशांतील स्पार्टाचा राजा मेनिलॉस ह्याच्या दरबारीं गेला. तेथें मेनिलॉसनें त्याचा उत्कृष्ट सत्कार केला. तथापि मेनिलॉसशीं कृतघ्न वर्तन करून, त्याची बायको हेलन हिला पळवून, पॅरिसनें आपल्याबरोबर ट्रॉय शहरीं नेलें. ह्या कृत्याचा सूड घेण्याकरितां मेनिलॉस ह्यानें सर्व ग्रीक राजे एकत्र जमवून प्रायमशीं युद्ध सुरू केलें, व ट्रॉय शहरास वेढा घातला. शहराची तटबंदी मजबूत होती, त्यामुळें हा वेढा दहा वर्षें चालला. शेवटीं युक्तीनें तें शहर ग्रीक लोकांनीं काबीज केलें. ह्या युद्धांत अनेक वीरांनीं नानाप्रकारचीं अघटित व अचाट अशीं शूर कृत्यें केलीं. ग्रीक लोकांनीं शेवटची म्हणून एक युक्ति केली ती अशी कीं, त्यांनीं एक लांकडाचा मोठा प्रचंड घोडा बनवून तटाबाहेर ठेविला, आणि त्यांत मेनिलॉस व दुसरे पुष्कळ योद्धे गुप्तपणें जाऊन बसले. इकडे बाकीच्या फौजेनें वेढा उठवून निघून जाण्याचा बहाणा केला. शत्रु निघून गेलेले पाहून ट्रोजन लोकांनीं तो लांकडाचा घोडा ओढीत ओढीत शहरांत आणिला. त्यांत बसलेले गुप्त लोक रात्रीं बाहेर आले, व त्यांनीं किल्ल्याचे दरवाजे उघडून ग्रीक फौजेस आंत घेतलें. अशा रीतीनें त्यांनीं ट्रॉय शहर काबीज करून उद्ध्वस्त केलें; व मेनिलॉसची बायको हेलन हिला परत आणिलें.

पुढें ग्रीक राजे स्वदेशीं परत येऊन पाहतात, तों परकी लोकांनीं आपलीं राज्यें काबीज केलीं आहेत, असें त्यांस आढळलें. तेव्हां तेथेंही पुनरपि युद्धें होऊन कांहीं राज्यें ग्रीक राजांस परत मिळालीं, व कांहींचीं राज्यें जाऊन त्यांस देशत्याग करावा लागला. ह्या देशत्याग केलेल्या मंडळींत ऑडिसियस ऊर्फ यूलिसीज म्हणून इथाका बेटाचा राजा होता. ट्रॉयचें युद्ध झाल्यानंतर दहा वर्षेंपावेतों

अनेक कारणामुळें तो स्वदेशास परत येऊं शकला नाहीं. तेव्हां समुद्रांत वादळ होऊन त्यांत तो मरण पावला असावा, असें सर्वांस वाटलें. त्याची बायको पेनिलोप म्हणून होती. नवरा मेला असें समजून तिची मागणी करण्यास अनेक राजे आले. परंतु ती पतिव्रता होती, त्यामुळें ती पुनर्विवाह करण्यास कबूल होईना; व कांहीं तरी काम काढून तें संपल्याशिवाय लग्नाचा विचार करावयाचा नाहीं, असें सर्वांस तिनें उत्तर दिलें; व जितकें काम ती दिवसा करी, तितकें सर्व ती रात्रीं उलगडून टाकी. अशा रीतीनें, यूलिसीज परत येईपावेतों तिचें काम पुरें झालें नाहीं. पुढें एके दिवशीं यूलिसीजनें भिक्षेकऱ्याच्या वेषानें आपल्या वाड्यांत येऊन बायकामुलांस ओळख दिली. त्याच्या मुलाचें नांव टेलेमेकस असें होतें. ह्या मुलाच्या साह्यानें यूलिसीजनें आपली बायको व राज्य परत मिळविलें, व शत्रूंचा पराभव केला. ह्याप्रमाणें ट्रॉयचें युद्ध व यूलिसीजचें प्रत्यागमन ह्या दोन कथांचीं वर्णनें होमर कवीनें अनुक्रमें इल्यड व ऑडिसे ह्या दोन ग्रंथांत केलीं आहेत. ग्रीक लोकांची पुढें भरभराट झाली, तेव्हां ते ह्या ग्रंथांचें अध्ययन करूं लागले. प्रत्येक विद्यार्थ्यास हे ग्रंथ पढावे लागत. हल्लीं सुद्धां ग्रीक भाषा शिकणारे ह्याच ग्रंथांचें अध्ययन करितात.

हे ग्रंथ होमर कवीनें लिहिले अशी प्रसिद्धि आहे. तथापि ते त्यानें एकट्यानेंच लिहिले, कीं त्याचे निरनिराळे भाग अनेकांनीं भिन्न वेळीं लिहिले ह्याविषयीं वाद आहे. ग्रीस देशांत त्या काळीं अनेक कवि होते. मोठमोठ्या समारंभांच्या प्रसंगीं ते नानाप्रकारचीं स्वतंत्र कवनें करून सभेंत म्हणून दाखवीत. त्यांत ट्रोजन युद्धाची कथा वर्णिली जात असेल ह्यांत संशय नाहीं. अशा अनेक विस्कळित कवनांचा होमरनें एकत्र संग्रह करून, त्यास इल्यड हें नांव दिलें असावें. होमर हा आशियांतील आयोनियाचा राहणारा असून, त्याच्या वेळीं ग्रीक लिपीही सुरू होतीसें दिसत नाहीं. त्यानें संग्रह केलेलीं कवनें लोकांनीं प्रथम तोंडपाठ करून ठेविलीं असावीं, व कांहीं काळपावेतों तीं लोकांत तशींच प्रचलित असावीं, असा संभव दिसतो.

ख्रिस्ती शकापूर्वी सहाव्या शतकापावेतों कागदावर लिहिण्याची कला ग्रीक लोकांस साध्य झाली नव्हती. त्यापूर्वी लांकूड, पितळ, किंवा दगड ह्यांवर ते आपले लेख कोरून ठेवीत असत. इ. स. पू. ५७३ ह्यावर्षी इजिप्त देशांत राज्यक्रान्ति होऊन अमासीज नांवाच्या पुरुषास तेथील राज्य प्राप्त झालें. त्यानें ग्रीक लोकांशीं स्नेह जोडिला, व त्यांस आपल्या राज्यांत आणून वसाहती व व्यापार करण्याची परवानगी दिली. ह्या परिचयामुळें इजिप्त देशांतील पेपिरस वनस्पति ग्रीक लोकांनीं पुढें आपल्या देशांत आणिली. ही वनस्पति इजिप्त देशांत पुष्कळ होत असे, व तिचा तेथील लोक एक प्रकारचा कागद बनवीत. हल्लींचा कागदाचा वाचक 'पेपर' हा इंग्रजी शब्द ह्या पेपिरस वरूनच झाला आहे. ग्रीस देशांत हा कागद आल्यापासून लेखनकला सर्वत्र पसरली. त्यानंतरच होमरचे ग्रंथ लिहिले गेले. पूर्वी ते लोकांस मुखोद्गत मात्र असत. होमर आशियाच्या पश्चिम किनाऱ्यावर राहत होता, तेथून कोणीं तरी हे ग्रंथ ग्रीस देशांत आणून हल्लींच्या स्थितींत लिहून काढिले. हे ग्रंथ प्रथम निर्माण झाले, त्या वेळीं ग्रीक लोकांची स्थिति व रीतीभाती कशा होत्या, ह्याची माहिती ह्या ग्रंथांवरूनच कायती उपलब्ध आहे.

ट्रोजन युद्ध झाल्यावर बऱ्याच काळानें होमर अवतीर्ण झाला. तो इ. स. पू. नवव्या शतकांत झाला असावा असा तर्क आहे. त्या दरम्यानच्या काळांत ग्रीसच्या उत्तरभागांतील थेसली प्रांतांतून डोरियन नांवाचे लोक दक्षिणेंत आले व त्यांनीं सर्व देश काबीज केला. म्हणजे नॉर्मन लोकांनीं इंग्लंडांत येऊन सॅक्सन लोकांना जिंकिलें, त्याचप्रमाणें डोरियन लोकांनीं येऊन पहिल्या हेलन लोकांना जिंकिलें. ह्या डोरियन लोकांच्या युद्धांची हकीगत फारशी उपलब्ध नाहीं. परंतु त्यांनीं देशांत अनेक राज्यें स्थापिलीं. तेव्हांपासून पुढें ग्रीक लोकांच्या तीन पृथक् जाती दिसून येतात, त्या ह्या : ईओलियन्स, आयोनियन्स्, आणि डोरियन्स. ह्या सर्वांस ग्रीक असेंच म्हणत; तरी त्यांजमधील परस्पर भेद नेहमीं कायम

होते. उदाहरणार्थ, अथीनियन लोक हे आयोनियन जातीचे असून स्पार्टन लोक डोरियन जातीचे होते. असाच भेद इंग्लंडांतही नार्मन व सॅक्सन ह्या दोन लोकांमध्यें पुष्कळ वर्षें कायम होता, हें इंग्लंडच्या इतिहासज्ञांस मशहूर आहे.

---

# प्रकरण दुसरें.

## होमरच्या वेळची ग्रीसची स्थिति.

होमरच्या काव्यांत ग्रीसदेशाची माहिती मिळते, तिजवरून असें दिसतें कीं, उत्तरेस आयोनियन किनाऱ्यावर थेसली, इटोलिया व आकरनेनिया; मध्यभागीं डोरिस व फोसिस; आणि कारिंथ आखाताच्या किनाऱ्यावर लोक्रिस, असे उत्तर प्रांताचे सहा भाग त्या वेळीं होते. उत्तर भाग व दक्षिण भाग हे कॅरिंथच्या संयोगिभूमीनें जोडलेले असून, तिजमधून एक डोंगराची रांग दक्षिणोत्तर गेली आहे; व दक्षिणेस ह्या रांगेस अनेक फांटे फुटल्यामुळें, दक्षिण भाग जो पिलॉपोनेसस त्याचे अनेक विभाग झाले आहेत. त्या विभागांस आकेया, आर्केडिया, एलिस, मेसेनिया, आर्गोलिस आणि लॅकोनिया अशीं नांवें होतीं. स्पार्टा शहर ह्या लॅकोनिया प्रांतांत आहे. वरील सर्व प्रांतांत स्वतंत्र राज्यें होतीं. त्यांतील राज्यव्यवस्था बहुतेक एकसारखीच असे. मुख्य राजा असे, त्याची गादी वंशपरंपरा चाले. युद्धप्रसंगीं सर्व अधिकार राजाचे हातीं असून, शांततेच्या दिवसांत राज्यकारभार पाहणारी त्याच्या हाताखालीं एक सभा असे. मुख्य न्यायाधीशाचें कामही राजाकडेच असून तो न्यायसभेंत येऊन इनसाफ करी. ह्या न्यायसभा बाजारच्या चौकांत अथवा अन्यत्र उघड्या जागेंत भरत. न्यायाधीशांकरितां शिलासनें केलेलीं असून, तीं अर्धवर्तुलाकृति मंडळांत मांडलेलीं असत.

होमरच्या काळीं ग्रीक लोक बरेंच सुधारलेले असून उपयुक्त कलांचें ज्ञान त्यांस बरेंच होतें. तथापि तें ज्ञान सर्व लोकांत पसरलेलें नसल्यामुळें, शिल्पज्ञ लोकांस कवि किंवा वैद्य ह्यांजप्रमाणेंच उच्च मान मिळत असे. लोकरीचीं वस्त्रें विणणें, व मातीचीं ओबडधोबड भांडीं बनविणें ह्या गोष्टी त्यांस येत होत्या. इजिप्त देशांतून मलमल, आणि बाबिलोन, टायर व सिडोन येथून गालिचे, ग्रीस देशांत येत असत. कित्येक श्रीमंत लोकांपाशीं चांदीचे प्याले असत, पण ते परदेशांतून आलेले असावे.

होमरच्या वेळीं व पुढेंही ग्रीक लोकांचे सर्व सामान्य धंदे म्हणजे शेती, दारू तयार करणें, व गुरेंमेंढरें बाळगणें हे होते. पण त्या वेळीं निरनिराळ्या राज्यांमध्यें एकसारखे युद्धप्रसंग चालू असल्यामुळें हे उद्योग बंद पडत; व शेतकरी असो कीं गवळी असो, त्यास लढाईवर जाणें भाग पडे.

राजधानीच्या मध्यभागीं किंवा जवळपास उच्चभागीं एक लांकडी किल्ला बांधलेला असून, त्यांत तत्कालीन राजे राहत असत. ह्या किल्ल्यास आक्रोपोलिस असें म्हणत. श्रीमंत लोकांचे वाडे लांकडीच असत; व त्यांस वाडे असें नांव होतें तरी, तीं केवळ ओबडधोबड लांकडी घरें असत. ह्या वाड्यांत पाहुण्यांच्या सोयीसाठीं मोठमोठीं दालनें बांधिलेलीं असत. कारण पाहुण्यांचा आदरसत्कार करण्यांत ग्रीक लोक मोठें अगत्य दाखवीत. त्यांजकडे कोणीही गृहस्थ आला कीं, त्याचा सत्कार करणें आपलें कर्तव्य आहे असें ग्रीक लोक समजत; तो शत्रु आहे कीं मित्र आहे, ह्याचा विचार ते प्रथम करीत नसत.

डेन्स लोक ज्याप्रमाणें पूर्वीं समुद्रावर चोऱ्या करून इंग्लंडवर धाड घालीत, त्याचप्रमाणें प्राचीन काळीं ग्रीक लोकांत चांचेपणाचा धंदा करूनही पुष्कळ बडे लोक उदयास आले होते. आजूबाजूच्या किनाऱ्यांवर धाड घालून लूट पैदा करणें हें राज लोक सुद्धां मोठें वीर्योत्तेजक व भूषणावह समजत. ह्या [illegible]च्या स्वारींत ते जीं गलबतें

वापरीत, तीं लांब व चिंचोळीं असून, त्यांस एक डोलकाठी, व शीड व वल्हीं असत. त्यांपैकीं कित्येक मोठीं असून त्यांत शंभर-शंभर लोकांचा समावेश होत असे. तथापि त्या वेळीं होकायंत्र माहीत नसल्यामुळें, समुद्रकिनारा सोडून हीं गलबतें फारशीं दूर जात नसत.

हा चांचेपणाचा धंदा अगदीं सार्वत्रिक होता. शेतकरी कामास जाऊं लागला, कीं त्यास लढाईच्या तयारीनें जावें लागे; कारण लुटारू लोकांचा हल्ला केव्हां येईल त्याचा नेम नसे. ह्या धास्ती-पासून लोकांचा बचाव करण्यासाठीं सर्व संस्थानांनीं मिळून एक प्रतिनिधिसभा स्थापन केली. ह्या सभेस प्रत्येक संस्थानांतून दोन प्रतिनिधि येत. ही सभा वर्षांतून दोनदां भरे: एकदां पावसाळ्यांत थर्मापिली येथें, व पुनः वसंतकाळीं डेल्फाय येथें. ह्या सभेस ॲंफिक्टिऑनिक (amphictyonic) म्हणजे अन्योन्यस्नेहसंवर्धक असें नांव होतें. सर्व राष्ट्रांनीं शांततेच्या व युद्धाच्या प्रसंगीं पाळ-ण्याचे नियम ह्या सभेंत ठरत; तसेंच धार्मिक संप्रदाय कोणी मोडिल्यास, त्यास शासन करण्यांत येत असे; व ठरविलेले नियम बरोबर पाळले गेले कीं नाहीं, ह्याचा खलही ह्या सहामाही बैठकींत होत असे. ह्या सभेचे सभासद पांच वर्षांतून एकदां आपल्या सर्व कुटुंबांसुद्धां डेलॉस येथें जमून एक मोठा धर्मोत्सव करीत.

ग्रीक लोकांच्या धर्मांत सण व उत्सव ह्यांचें महत्त्व मोठें असे. त्यांजविषयीं होमरच्या ग्रंथांत विशेष माहिती नाहीं. तथापि देशां-तील सर्व लोक एकत्र जमून देवाचा उत्सव व यज्ञयाग करीत. त्या वेळेस भजन होई, व मिरवणूक निघे. ग्रीक लोकांतील सार्व-जनिक भजनांचा हा आरंभ होय. ह्या भजनांत वाजंत्रीं व झांजा वापरीत.

होमरच्या वेळीं ग्रीक लोकांचीं देवळें लहान व लांकडी असूनही तीं एखाद्या मोठ्या राईत बांधिलेलीं असत, व आंत दिवे लावीत. पुढें देशांत संपत्ति वाढली, तेव्हां लांकडी काम काढून लोकांनीं तें दगडी केलें. राईंतील झाडें तोडण्याची मनाई असे. कोणी एखादा

गुन्हेगार न्यायासनासमोर येण्याचें चुकवून ह्या राईत लपून राहिला तर, तो तेथें आहे तोंपर्यंत त्यास पकडलें जाण्याची भीति नसे. ग्रीक लोकांत उपाध्यायांचा म्हणून निराळा वर्ग नव्हता. सार्वजनिक सणांच्या प्रसंगीं उपाध्यायांचें काम करण्यास लायक इसम नेमीत, व प्रत्येक कुटुंबांतला मुख्य इसम आपापल्या घरीं तें काम करीत असे.

होमरच्या वेळेस एकंदर लोकांचे तीन वर्ग होते. पहिला वर्ग, युद्धांत पराक्रम करून व विजय संपादून ज्यांनीं देश जिंकला होता, अशा लोकांचा; ते आपणांस सरदार किंवा योद्धे असें समजत. दुसरा वर्ग जिंकलेल्या लोकांचा; व तिसरा वर्ग गुलामांचा.

प्राचीन ग्रीक लोकांची राहणी अगदीं साधी असे. त्यांच्या घरांत मेजें, खुर्च्या व बांकें असें सामान असून, शिवाय कांहीं श्रीमंतांच्या घरांतून पलंग असत. त्यांवर वाघ किंवा अन्य जनावरांच्या चामड्यांच्या गाद्या घातलेल्या असत. गरीब लोक जमिनीवर मेंढ्यांचीं चामडीं, वाळलेलीं पानें किंवा लव्हाळे आंथरून त्यांवर निजत. पुरुष वरपासून खालपर्यंत अंग झांकणारें धोतर नेसत, व त्यावर एक लोंकरीची शाल पांघरीत. बायका लांबच लांब बाह्या असलेला एक झगा अंगांत घालून त्यावर पुरुषांप्रमाणेंच शाल पांघरून घेत. हा पोषाख श्रीमंत लोकांचा झाला. पण सामान्य गरीब लोक बकऱ्यांमेंढ्यांचीं कातडीं नेसत. सरदार लोक लढाईच्या प्रसंगीं अंगात चिलखत घालून रथारूढ होत. युद्ध हें त्यांचें मुख्य काम असल्यामुळें, शस्त्रें, घोडे व रथ हीच कायती त्यांची मुख्य मालमत्ता असे.

घरांत ते कसे राहत ह्याची माहिती फारशी मिळत नाहीं. मोठमोठ्या भोजनप्रसंगीं मेजवानीच्या दालनांत लोक चौफेर भिंतीस पाठ लावून बसत; व प्रत्येकाच्या पुढें लहानशा चौरंगावर पात्र ठेविलेलें असे. दालनांतील मधला भाग मोकळा असून तेथें वाजंत्री वाद्यें वाजवून जेवणारांची करमणूक करीत. गोमांस, मेंढ्याचें, बकऱ्याचें, व डुकराचें मांस, पनीर ( Cheese ), आणि फळें हे खाण्याचे मुख्य पदार्थ असत; व दारूंत पाणी मिसळून तें ते पीत, दारूचें

हें मिश्रण एका मोठ्या घागरींत तयार करून तें प्रत्येकास वाढीत. भांडें तोंडास लावण्यापूर्वीं प्रत्येक इसम थोडेंसें पेय जमिनीवर ओती, व त्या वेळीं 'अपालो तुला अर्पण,' 'देवी तुला अर्पण,' असें म्हणून इष्टदेवतेचें स्मरण करी. ह्या विधीस नैवेद्य असें म्हणतां येईल. भांडीं व प्याले बहुतेक मातीचे असत; पण श्रीमंत लोकांच्या घरीं मेजवानीच्या प्रसंगीं कधीं कधीं चांदीचे प्यालेही दिसत असत.

## प्रकरण तिसरें.

### आथेन्सचें राज्य.

ग्रीस देशांत पुष्कळ लहान लहान राज्यें होतीं हें वर सांगितलेंच आहे. त्यांत आथेन्स आणि स्पार्टा हीं मुख्य व विशेष प्रबळ होतीं. आथेन्सची स्थापना केव्हां झाली तें बरोबर सांगतां येत नाहीं. प्रथम ॲटिका प्रांताचे अनेक लहान लहान विभाग होते. प्रत्येक विभागावर स्वतंत्र राजा होता; वास्तविक म्हटलें तर हे विभाग अगदींच लहान म्हणजे दोन तीन गांव मिळून झालेले होते. म्हणून त्यांस राज्य म्हणण्यापेक्षां संस्थानें म्हणणें बरें. निरनिराळ्या संस्थानांत नेहमीं तंटे व लढाया होत. पुढें कांहीं काळानें बारा संस्थानें एक झालीं, व त्यांचें प्रमुखत्व आथेन्सकडे आलें, त्या वेळीं एकमेकांनीं एकमेकांस मदत करून सर्वांचा बचाव करावा असा विचार ठरला. सेक्रॉप्स् आणि त्याचीं बारा शहरें ह्यांविषयीं जी कथा प्रचलित आहे, ती ह्या वरील बारा संस्थानांच्या एकीपासून निघाली असावी. कांहीं काळ लोटल्यावर ह्या सर्व संस्थानांचें एकच राज्य होऊन, त्याची राजधानी आथेन्स शहर झालें; व सर्व राज्यकारभार आथेन्स येथें होऊं लागला.

अशी एक दंतकथा आहे कीं, थीसियस नांवाच्या राजानें ह्या वरील संस्थानांची एकी केली, त्यानें आथेन्स शहर वाढविलें,

देवालयें बांधिलीं, आणि सर्व ॲटिकांतील लोकांसाठीं कायदे व निबंध तयार केले. हा थीसियस कोणी खराखुरा पुरुष झाला, कीं केवळ काल्पनिक होता, हें निश्चित सांगतां येत नाहीं. एवढें खरें, कीं अथीनियन लोक त्यास फार पूज्य मानीत, व देवाप्रमाणें त्याची पूजा करीत. तथापि तो काल्पनिक पुरुष असावा असें दिसतें. कारण आथेन्सचे कायदे एकानें तयार केलेले नाहींत, ते निरनिराळ्या वेळीं तयार झाले आहेत. ॲटिकांतील लोकांचें एक राज्य झाल्यावर, सर्व लोकांचे चार भाग व ह्या प्रत्येक भागाचे तीन पोटभाग करण्यांत आले. ह्या पोटभागांस 'फ्रेट्रिया, अशी संज्ञा होती. फ्रेट्रिया म्हणजे एक जात. प्रत्येक फ्रेट्रियांत अनेक गोत्रांचे म्हणजे अनेक मूळपुरुषांपासून वृद्धि पावलेले लोक असत; एका गोत्रांत अनेक कुटुंबें असत. ह्या सर्व विभागांत जेवढ्यांची गणना असे, तेवढ्यांसच 'आथेन्सचे नगरवासी' अशी संज्ञा असून, त्यांस कांहीं विशिष्ट हक्क असत. एका फ्रेट्रियांत सुमारें तीस गोत्रें असत. प्रत्येक गोत्राची विशिष्ट देवता असून, तिचेंच भजन व पूजन त्या गोत्रांत चाले. प्रत्येक गोत्राचे विशिष्ट कुलाचार असून, त्याचीं प्रेतें पुरण्याची जागा पृथक् असे. तसेंच प्रत्येक कुटुंबांतील धार्मिक संस्कार निराळे असून ते त्या कुटुंबांत नेहमीं चालवीत. एखाद्या कुटुंबाचा निर्वंश होऊन, कुळधर्म बंद पडले तर, सर्व देशावर देवाचा कोप होऊन कांहीं तरी आपत्ति येईल, असा लोकांचा समज होता.

इ. स. पू. नवव्या शतकाचे अखेरीस आथेन्सची राज्यसत्ता मोडली; व हळू हळू प्रजासत्ताक राज्य स्थापन होण्यास प्रारंभ झाला. पहिल्या प्रथम राजा जाऊन त्याच्या जागीं 'आर्कन' नांवाचा एक मुख्य अधिकारी म्ह० मॅजिस्ट्रेट नेमण्यांत आला; त्याचा अधिकार त्याच्या हयातीपर्यंत चाले. असा बदल होण्याचें कारण दंतकथेवरून असें दिसतें कीं, एकदां पिलॉपोनेसस येथील फौजेनें ॲटिकावर स्वारी केली. तेव्हां डेल्फाय येथील अपॉलोचा कौल घेण्याकरितां आथेन्समधून वकील पाठविण्यांत आले. त्या वकिलांनीं देवीचा कौल घेऊन असा निरोप आणिला कीं, आथे-

न्सचा राजा मरेल तरच शत्रूचा पराभव होईल. हा निरोप आथेन्सचा राजा कोड्रस ह्यानें ऐकिला व आपला जीव देण्याचा निश्चय केला. नंतर आपण होऊन तो कोणास न कळवितां शत्रूंच्या फौजेंत शिरला, तेथें त्यास शत्रूंनीं न ओळखतां ठार मारिलें. पुढें शत्रूंस ही सर्व गोष्ट समजून, आथेन्स जिंकण्याचें काम दुर्घट आहे अशी त्यांची खात्री झाली, व ते स्वदेशीं परत गेले. इकडे आथेन्सच्या लोकांनीं राजा मेल्यावर आर्कनची नेमणूक केली.

वरसांगितलेल्या डेल्फायच्या कौलाचें महत्त्व राज्यकारभारांत अतोनात होतें. राष्ट्राचे राजकीय व खासगी व्यवहार एवढ्यारया यःकश्चित् गोष्टीवर अवलंबून असलेले इतिहासांत क्वचित्च आढळतात. ग्रीक लोकांचा व पुढें रोमन लोकांचा ही असा समज होता, कीं ह्या कौलांच्या द्वारें देव आपली इच्छा प्रगट करितात. प्राचीनकाळीं ग्रीस देशांतच नव्हे तर, त्या वेळच्या मूर्तिपूजक राष्ट्रांत अपॉलोचें प्रस्थ मोठें होतें. त्याचें देऊळ डेल्फायच्या बेटावर एका राईंत असून आंत सोन्याची मूर्ति होती. देऊळ फुलांच्या माळांनीं सदैव शृंगारिलेलें असे. तेथें नेहमीं सहा पुजारी असत. सर्वांच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें काम ह्या पुजाऱ्यांकडे असल्यामुळें, त्यांस अतिशय महत्त्व आलें होतें. सर्व ग्रीक लोकांची अशी पक्की समजूत होती कीं हीं उत्तरें खास अपॉलोकडूनच येतात. परंतु हे पुजारी राज्यांतील प्रमुख लोक असल्यामुळें, त्यांच्या मर्जीस येईल त्याप्रमाणें लोकांस ते प्रश्नांचीं उत्तरें देत ह्यांत कांहीं संशय नाहीं. आधीं तें देऊळच एका अवघड ठिकाणीं बांधिलेलें होतें. त्यांत खालीं एक मोठें भुयार होतें; त्यांतून दुर्गंधयुक्त हवा वर येत असे; आणि तिचा श्वासोच्छ्वास करणारास घेरी येऊन चमत्कारिक वाटल्याशिवाय राहत नसे. भुयाराचें तोंड नेहमीं बंद असे. पण प्रश्न विचारावयाचा असे तेव्हां त्या तोंडावर एक तिवई ठेवीत; व तिजवर एक बाई बसवीत. ह्या बाईला पायथिया असें म्हणत. तिला तिवईवर बसविल्यावर मग भुयाराचें द्वार उघडीत, त्याबरोबर ती दुर्गंधीनें घुसमटून चमत्कारिक हातवारे व बडबड करूं लागे, कीं मग तिच्या अंगांत देव आला असें लोकांस

वाटे. अंगांत आल्यावर ती जे शब्द उच्चारी, ते सर्व शब्द पुजारी लिहून घेत; व मागून त्याची कविता बनवून ती पृच्छकांच्या हवालीं करीत. ह्या कवितेंतील शब्दरचना अशी घोटाळ्याची असे कीं, त्यांतून वाटेल तो अर्थ निघावा. तेणेंकरून, पुढें कसाही प्रकार घडून आला तरी, भविष्य खरें झालें अशी लोकांची खात्री करण्यास अडचण पडत नसे. म्हणून देवाचा कौल खोटा ठरण्याचा प्रसंगच कधीं येत नसे.

ह्याप्रमाणें डेल्फायच्या कौलाचें महत्त्व अतिशय वाढलें होतें. पायाथियाचें काम करण्याकरितां आरंभीं एखादी हलक्या कुळांतील बाई आणीत. एकवार तिचा देवळांत प्रवेश झाल्यावर, तिला देऊळ सोडून जाण्याची किंवा लग्न करण्याची मनाई असे. एकदां अशी एक तरुण स्त्री वरील नियम मोडून पळून गेली, तेव्हां असा कायदा करण्यांत आला कीं, पन्नास वर्षांखालील बाईस देवळात घेऊं नये. आरंभीं पुष्कळ दिवस पायथियाचें काम एकच बाई करीत असे; पण पुढें पुढें पृच्छकांची संख्या अतोनात वाढल्यामुळें, दोन बाया ठेवण्यांत आल्या, व दुर्गंधयुक्त हवेनें एखादी बाई क्वचित्प्रसंगीं आजारी वगैरे झाल्यास, काम बंद पडूं नये म्हणून, तिसरी एक बाई देवळांत आणून तयार ठेवीत असत.

डेल्फायच्या देवाकडे वकील पाठविण्यासाठीं आथेन्सच्या लोकांनीं सरकारी गलबतें बांधिलीं होतीं. तीं फार पवित्र समजत. इतर धार्मिक महोत्सवांच्या प्रसंगींही ह्या गलबतांचा उपयोग करण्यांत येई. मागें सांगितलेंच आहे कीं, डोरियन लोकांनीं आथेन्सवर स्वारी केली, तेव्हां देवाकडून आलेला कौल राजा कोड्रस ह्यास सांगण्यांत आला; त्याबरहुकूम त्यानें जीव दिल्यावर, पुढें नवीन राजा न नेमतां आर्कन ह्या हुद्याचा एक मुख्य अधिकारी नेमण्याची चाल आथीनियन लोकांनीं पाडिली. आथेन्सचा राजवंश बंद पडला त्याची दंतकथा मूळ अशी आहे.

आर्कनची नेमणूक तरी आरंभीं वंशपरंपरा होती, ती सुमारें १६० वर्षें तशी चालली. पुढें कांहीं दिवस दरदहावर्षांनीं नवीन आर्कन नेमावा असें ठरलें. असा प्रकार कांहीं दिवस चालल्यावर

अल्पसत्ताक म्हणजे नऊ प्रधानांची राज्यव्यवस्था सुरू झाली; म्हणजे राज्यांतील नऊ प्रमुख सरदारांच्या हातांत राज्यव्यवस्था देण्यांत आली. ह्या नवांत एक इसम मुख्यप्रधान, दुसरा मुख्य धर्माधिकारी आणि तिसरा सेनापति असे. बाकीचे सहा असामी राज्यांतील मुख्य-न्यायाधीश होते.

ह्याप्रमाणें सर्व सत्ता राज्यांतील श्रीमंत व प्रमुख लोकांच्या हातांत गेल्यामुळें, रयतेचें नुकसान होऊं लागलें. हे सरदार लोक वाटेल ते कायदे करीत, व लोकांस पिळून काढीत. त्यांनीं लोकांवर जबरदस्त कर बसविले. ते भरण्यासाठीं लोकांस आपल्या जमिनी गहाण टाकणें किंवा जबर व्याजानें कर्ज काढणें भाग पडूं लागलें. अशा कर्जांत बुडून जाऊन त्यांच्या सर्व जमिनी जप्त झाल्या, व ते केवळ गुलाम होऊन बसले. कारण जो कोणी इसम कर्ज फेडण्यास असमर्थ असेल, त्यानें धनकोच्या येथें गुलामगिरी किंवा मजुरी करून त्याचें कर्ज फेडलें पाहिजे, असा कायदा होता. कित्येकांनीं तर ह्या कर्जाचे पायीं आपलीं मुलेंमाणसें सुद्धां विकलीं. अठरा वर्षां-खालील मुलगे व अविवाहित मुली किंवा बहिणी विकण्याची प्रत्येकास कायद्यानें मुभा होती. दारिद्र्यामुळें ते नाना प्रकारचे गुन्हे करूं लागले, व असे गुन्हे बंद करण्याकरितां अधिकाऱ्यांनीं ज्यास्त कडक कायदे केले. असले कडक कायदे करणारा एक मुख्य गृहस्थ ड्रेको म्हणून होता. त्याचा स्वभाव अत्यंत बेफिकीर व कडक असल्या-मुळें लोकांस कठोरपणानें वागवून त्यांस दाबांत ठेवण्याचा त्याचा इरादा होता. आथेन्सचे पहिले कायदे ड्रेकोनेंच केलेले होते. बहुतेक गुन्ह्यांस मृत्यूचीच शिक्षा ठरविली असल्यामुळें, ड्रेकोचे कायदे रक्तानें लिहिलेले आहेत, अशी सामान्यत: म्हण पडली होती.

पण ह्याचा परिणाम चांगला झाला नाहीं. जिकडे तिकडे असंतोष माजला. सायलोन नांवाचा एक सरदार होता, त्यानें अशा संधींत बंड केलें. कांहीं सोबती जमवून त्यानें आथेन्सचा किल्ला काबीज केला, तेव्हां त्यास सरकारी फौजेनें वेढा घातला. पुढें किल्ला सरकारच्या हस्तगत झाला, पण सायलोन पळून गेला, तो हातीं लागला नाहीं.

बाकीचे लोक आथिना देवीच्या देवळांत जाऊन लपून बसले. 'तुम्हांस सर्व गुन्हे माफ करून सोडून देऊं,' असें त्या लोकांस वचन देऊन, देवळांतून बाहेर आणिलें, व विश्वासघातानें सर्वांस ठार मारिलें.

ह्या विश्वासघातकी कृत्यानें आथेन्स येथें राज्यक्रान्ति झाली. सर्व लोक घाबरून गेले. वर सांगितलेल्या विश्वासघाताबद्दल देवी आपला काय सूड घेईल नकळे, अशी सर्वांस चिंता पडली. तेव्हां खऱ्या गुन्हेगारांस शिक्षा करून देवीचा राग शांत करण्यासाठीं, तीनशें नगरवासी लोकांची एक सभा बसली. तिनें सर्व गुन्हेगारांस हद्दपार केलें. नंतर सोलन नांवाच्या गृहस्थानें आथेन्स येथें नवीन राज्यव्यवस्था व कायदे सुरू केले. हा प्रकार इ. स. पू. ५९४ ह्या वर्षीं घडला. सोलन हा प्राचीन ग्रीक इतिहासांत मोठा शहाणा व सज्जन म्हणून नांवाजलेला आहे. त्यानें प्रथम गहाण पडलेल्या मिळकती सोडविण्याचा कायदा केला. कर्जदारांस गुलाम बनविण्याची मनाई करण्याचाही दुसरा एक कायदा त्यानें केला. मोठ्या खुबीनें त्यानें नाण्याची किंमत बदलली. ड्राक्मा म्हणून आथेन्सचें नाणें होतें. ज्याहत्तर जुन्या ड्राक्मांची किंमत शंभर नवीन ड्राक्मा समजावी, असा ठराव करून, ७३ ड्राक्मा दिले म्हणजे शंभरांची फेड झाली असा ठराव त्यानें केला. राज्यव्यवस्थेंत एक मोठा फरक त्यानें असा केला कीं, अमुक एक दौलत जवळ असणाऱ्या सव लोकांस आर्कनची जागा मिळण्यास प्रतिबंध असूं नये. ह्या सवलतीनें सरदार व सामान्य लोक यांजमधील भेद बहुतेक नाहींसे झाले, व लोकांच्या हातांत बरीच सत्ता आली. त्यामुळें श्रीमंतांचा गरिबांवर होणारा जुलूम पुष्कळ कमी झाला.

पूर्वीं राज्यांतील सर्व मोठमोठ्या जागा बड्या लोकांसच काय त्या मिळत असत. परंतु सोलनच्या कायद्यानें अमुक एक इस्टेट असणारे सर्व लोक सारख्या योग्यतेचे झाले. सोलननें सर्व सामान्य लोकांचे चार वर्ग केले. ज्या इसमाचें वार्षिक उत्पन्न पांचशें मापें किंवा ज्यास्त होतें, अशांचा पहिला वर्ग : मग हीं मापें धान्य, दारू किंवा अन्य पदार्थांचीं असलीं तरी हरकत नाहीं. दर एक मापाची किंमत एक

ड्राक्मा समजावयाची. ह्या पहिल्या वर्गांतील पाहिजे त्या इसमास आर्कन करण्यास हरकत नाहीं, असा सोलननें ठराव केला. दुसरा वर्ग स्वारलोकांचा : ह्यांनीं युद्धोपयोगी असा निदान एक घोडा तरी जवळ बाळगिला पाहिजे, व पगार न घेतां लढण्यास आलें पाहिजे, असा ठराव होता. तिसरा वर्ग लहान लहान जमिनींच्या मालकांचा; ह्यांस पायदळ म्हणत; व त्यांस स्वतःचीं हत्यारें बाळगावीं लागत. चवथ्या वर्गांत सर्व स्वतंत्र मजुरांचा समावेश असून, त्यांस जरी कोणतेंही सरकारी काम देतां येत नसे, तरी हरएक प्रकारच्या सार्वजनिक संस्थेस हजर राहणें, व आर्कन किंवा दुसऱ्या अधिकाऱ्यांच्या नेमणुका करितांना मत देणें, हे हक्क त्यांस होते. पहिल्या तीन वर्गांतील लोकांस कमी ज्यास्त प्रमाणानें सरकारास कर द्यावे लागत; चवथ्या वर्गावर कोणताही कर नसे.

फौजदारी दाव्यांचा निकाल करण्याकरितां एरिओपेगस नांवाचें एक कोर्ट सोलननें स्थापिलें, असें सांगतात. पण आथेन्स येथें मार्स-हिल नांवाची एक टेंकडी आहे, तीवर सोलनच्या अगोदरपासून असलेलें एक कोर्ट बसत असे. (ह्याच ठिकाणीं सेंटपॉल ह्यानें आथीनियन लोकांस उपदेश केल्याचा उल्लेख बायबलांत आहे.) तथापि पूर्वीच्या कोर्टांत व त्याच्या अधिकारांत सोलन ह्यानें पुष्कळ नवीन फेरफार केले ह्यांत संशय नाहीं. ह्या कोर्टाच्या चौथऱ्याचे पडके भाग अजून आथेन्स येथें दृष्टीस पडतात.

सोलननें एरिओपेगस कोर्टाच्या बाबतींत मुख्य फरक असा केला कीं, लोकांच्या नैतिक वर्तनावर देखरेख ठेवण्याचा कोर्टास अधिकार दिला. पाहिजे त्या वेळेस लोकांच्या घरांत शिरून त्यांचें आचरण शुद्ध आहे कीं नाहीं, व ते विनाकारण पैसा उधळितात कीं काय, हें पाहण्याचा न्यायाधीशांस अधिकार दिला. त्यांच्या दृष्टीस कांहीं गैरशिस्त प्रकार पडल्यास, त्याबद्दल दंड किंवा अन्य शिक्षा करण्याचा त्यांस अधिकार होता. म्हणून ह्या एरिओपेगसच्या अधिकाऱ्यांस सर्व लोक भीत असत. त्यांच्या समोर कोणी हंसत नसे. लोकांवर कर बसविण्याचें काम ह्यांजकडेच असल्यामुळें, प्रत्येक

इसमास आपली जमीन, जिंदगी व उत्पन्न ह्यांजबद्दलची कच्ची हकीगत ह्या कोर्टाकडे जाहीर करावी लागे.

सोलननें एकंदर दहा न्यायकोर्टें स्थापिलीं; व प्रत्येक कोर्टांतील कज्जे ऐकण्यास सहाशें इसमांची जूरी नेमून दिली. परदेशांतील कारागीर लोक आपल्या राज्यांत आणून त्यांजकडून अनेक उद्योगधंदे सुरू केले. आथेन्सचीं लढाऊ गलबतेंही ह्यानेंच बांधिलीं. त्याजबद्दल असा नियम केला कीं, वर सांगितलेल्या चार वर्गांपैकीं प्रत्येक वर्गानें बारा जहाजें लढाईस सज्ज करून दिलीं पाहिजेत; आणि तसेंच अमुक एक उत्पन्न असणाऱ्या वाटेल त्या इसमास जहाजाचा कप्तान नेमावें, व त्याजबद्दल एक वर्षाचा सर्व खर्च ज्याचा त्यानें सोसावा. अशा इसमांस ट्रायरार्क्स ( Trierarchs ) असें म्हणत.

ह्याशिवाय मध्यम वर्गांतील लोकांची स्थिति सुधारण्याकरितां सोलननें आणखी अनेक कायदे केले, व बड्या लोकांचा जुलूम बंद केला. परंतु त्यानें केलेल्या सर्वच गोष्टी लोकांस पसंत पडल्या असें नाहीं. म्हणून देशपर्यटन आणि ग्रंथलेखन हीं कामें पत्करून, त्यासाठीं तो आथेन्स सोडून निघून गेला. त्याचे कायदे लांकडी तक्त्यांवर खोदलेले असत. हे तक्ते आंसावर फिरते ठेवून, ते प्रथम किल्ल्यांत व मागाहून सार्वजनिक सभागृहांत ठेवण्यांत आले.

---

## प्रकरण चवथें.

## स्पार्टाचें राज्य.

कॉरिंथच्या आखातानें ग्रीस देशाचे दोन भाग झाले आहेत. त्यांतील दक्षिणभागाच्या अगदीं दक्षिणच्या टोंकास लॅकोनिया असें म्हणतात. ह्या लॅकोनिया प्रांतात स्पार्टा शहर आहे. प्राचीन काळीं डोरियन लोकांनीं हा प्रांत जिंकिला, व त्यास लॅसिडीमन असें नांव दिलें. हळू हळू ह्या डोरियन लोकांनीं आजूबाजूस आपला अंमल

वाढविला; व जिंकलेल्या लोकांवर खंडणी बसविली. डोरियन लोक मूळच्या रहिवाश्यांस आपले ताबेदार समजत; व आपणांस ते स्पार्टन्स व लॅसिडिमोनियन्स असें म्हणूं लागले. जिंकलेल्या लोकांस लॅकोनियन्स हें नांव प्राप्त झालें. ह्या दोन लोकांत बेटीव्यवहार बंद होता. जिंकले-ल्यांस आपल्याबरोबरीचे हक्क त्यांनीं कधींच दिले नाहींत, म्हणून ह्या उभयतांमधील भेद पुष्कळ शतकें कायम राहिला. जिंकलेल्या लोकांस राज्यप्रकरणीं कोणतेही हक्क नव्हते, व त्यांस राज्यांत नोकऱ्याही मिळत नसत. त्यांचीं कामें फक्त व्यापार व शेती हीं होतीं. स्पार्टन लोक आपणास लढवय्ये समजत असल्यामुळें, व्यापार व शेती हीं कामें त्यांस हलकीं वाटत असत.

ह्या दोन जातींशिवाय स्पार्टा संस्थानांत हेलॉट नांवाचे गुलामा-सारखे पुष्कळ लोक होते. त्यांस जमिनी दिल्या असून, त्या ते नांगरीत व त्यांचा क्रयविक्रय करीत. जमिनीचा मालक निराळाच असे; पण त्याची ह्या गुलामांवर संपूर्ण सत्ता नसे. हे हेलॉट गुलाम सरकारच्या मालकीचे म्हणून समजले जात, व त्यांस गुलामगिरींतून मुक्त करण्याचें काम सरकारचें असे. त्यांची मूळउत्पत्ति माहीत नाहीं; परंतु बहुधा ते देशांतले मूळचे रहिवाशी असून, त्या वेळच्या जमीनदारांचे नोकर बनले असावे. स्पार्टन लोकांनीं त्यांजवर नाना-तऱ्हेचे जुलूम केल्यामुळें, व अनेक वेळां त्यांनीं शेंकडों लोकांची कत्तल उडविल्यामुळें, त्यांची स्थिति अगदीं शोचनीय झाली होती. त्यांनीं आपल्या सत्तेविरुद्ध ब्र काढूं नये असा स्पार्टन लोकांनीं बंदोबस्त ठेविला होता. असें सांगतात कीं, एका प्रसंगीं दोन हजार हेलॉट लोकांस स्पार्टन लोकांनीं मेजवानीस बोलाविलें, व विश्वास-घातानें सर्वांस कापून काढिलें. हेलॉट लोकांचीं कित्येक कुटुंबें आपल्या शेतांवर घरें करून राहत, व कित्येक लोक स्पार्टनलोकांच्या घरीं काबाडकष्ट करीत. युद्धप्रसंगीं प्रत्येक स्पार्टन गृहस्थ आपल्या-बरोबर सात असामी हेलॉट गुलाम घेत असे. स्पार्टन पायदळाप्रमाणें ह्या हेलॉट लोकांना अवजड शिरस्त्राणें व चिलखतें दिलेलीं नस-ल्यामुळें, त्यांचा उपयोग हलक्या फौजेसारखा करण्यांत येत असे.

स्पार्टाची राज्यव्यवस्था इतर सर्व ग्रीक संस्थानांहून अगदीं भिन्न होती. स्पार्टा येथें नेहमीं दोन राजे राज्यावर असत. दोघांचेही अधिकार सारखे होते. ह्या दोहोंपैकीं कोणीही मरण पावला, तर त्याच्या जागीं त्याचा मुलगा किंवा दुसरा नजीकचा हक्कदार असेल त्यास राज्यपद मिळे. ह्या दोन राजांविषयीं एक दंतकथा अशी आहे, कीं स्पार्टा देश जिंकून तेथील राज्य स्थापन करणारा हर्क्युलीस म्हणून मूळपुरुष झाला, त्याचा मुलगा अरिस्टोडिमस (Aristodemus) ह्या शूर पुरुषानें कांहीं वर्षें राज्य केल्यावर मरण-समयीं त्यानें आपलें राज्य यूरिस्थेनिस (Euresthenes) व प्रॉक्लीस Procles) ह्या दोन मुलांस दिलें, व दोघेही एकाच वेळीं राज्य करूं लागले. त्या वेळेपासून स्पार्टा येथें दोन राजे असावे असा प्रघात पडला. ही गोष्ट केवळ काल्पनिक दिसते. तरी पण दोन राजांची उत्पत्ति अशाच कांहीं तरी कारणानें किंवा जुळ्या बंधूंमुळें झाली असावी. कदाचित् दोन सरदारांनीं प्रथम हें राज्य जिंकल्यामुळें दोघांनींही त्यांचा कारभार करावा असा ठराव झाला असेल.

इ. स. पूर्वीच्या नवव्या शतकापावेतों स्पार्टाचा इतिहास विशेष उपलब्ध नाहीं. नवव्या शतकाच्या सुमारास लायकरगस नांवाचा एक पुरुष स्पार्टा येथें झाला, त्यानें तेथें नवीन कायदे तयार केले. पुतण्या चरिलॉस ( Charilaus ) हा लहान वयाचा असल्या-मुळें, त्याच्या नांवानें लायकरगस राज्यकारभार पाहत असे. त्यानें केलेल्या सर्व कायद्यांचें धोरण एकच होतें. जिंकलेल्या लोकांनीं स्पार्टन लोकांविरुद्ध आपलें डोकें कधींही वर काढूं नये; स्पार्टन लोकांनीं नेहमीं युद्धास सिद्ध असावें; त्यांचीं शरीरें कणखर व मजबूद व्हावीं, आणीबाणीच्या प्रसंगीं न डगमगतां स्वराज्यसंरक्षणासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग त्यांनीं करावा, व बायकांमुलांचीही पर्वा न करितां आपल्या लोकांचें राज्य राखावें; असा लायकरगसच्या कायद्यांचा हेतु होता. लायकरगसच्या नियमांनीं स्पार्टन लोक शूर व धाडशी झाले, ही गोष्ट खरी, तरी पण त्यामुळें त्यांचा

स्वभावही क्रूर व निर्दय बनला. त्यांस गृहसौख्याचा तिटकारा उत्पन्न झाला, व कुटुंबास एकत्र करणारीं सामाजिक बंधनें नाहींशीं झालीं.

लायकरगसनें मुलांचीं संगोपनगृहें स्थापन केलीं. कोणताही स्पार्टन मुलगा सात वर्षांचा झाला कीं, सरकार तो आईबापांपासून काढून ह्या गृहांत आणी. या ठिकाणीं त्याजकडून सर्व प्रकारचे व्यायाम करवून त्याचे अवयव मजबूत करीत. अशा प्रकारें लोकांस शूर, धीट, व तरतरीत बनवीत. त्यांच्या अंगावर एकच आंखूड असें लहान वस्त्र असे. तें ते अंगाभोंवतीं गुंडाळीत. अवघड ठिकाणीं अनवाणी फिरणें, पळणें, उड्या मारणें, झाडावर चढणें, इत्यादि गोष्टी त्या मुलांस शिकवीत. त्यांस अन्नही जाडेंभरडेंच देत. गवत गोळा करून त्यावर ते निजत; व कधींकधीं आजूबाजूच्या शेतांतून चोरी करण्यासही त्यांस शिकवीत असत. वास्तविक हें शिक्षण चांगलें नव्हे; पण शत्रूंच्या मुलखांत आपला बचाव कसा करावा, हें लोकांस शिकविण्याचा शिक्षणाचा रोख होता. आपल्या राज्यकर्त्यांची आज्ञा पाळून त्यांस सन्मान देणें, फाजील भाषण न करणें, होईल तितक्या थोड्या शब्दांनीं आपला मनोदय बाहेर कळविणें, इत्यादि गोष्टींचा सुद्धां त्यांजकडून अभ्यास करविण्यांत येत असे. इंग्रजी भाषेंत ' लॅकॉनिक ' भाषण हा शब्द स्पार्टन लोकांच्या ह्या रीतीसूपान प्रचारांत आला आहे.

अठरा वर्षांचें वय झालें, म्हणजे मुलगे आपल्या बापांबरोबर सार्वजनिक भोजनगृहांत जात. तेथें मेजांजवळ उभे राहून वडिलांस वाढण्याचें काम त्यांस करावें लागे. वीस वर्षांचें वय झालें म्हणजे, त्यांस फौजेंत दाखल करून सरहद्दीच्या रक्षणावर पाठवीत. तेथून दहा वर्षांनीं परत आल्यावर त्यांस सरकारनोकरींत दाखल करीत, किंवा फौजेंत अंमलदारांच्या जागा देत. इतकें होईल तेव्हांच मग सार्वजनिक भोजनगृहांत पंक्तीस बसून जेवण्याची त्यांस परवानगी मिळे. लोकांनीं घरीं ऐषआराम करूं नये, म्हणून सरकारानें मुद्दाम असलीं भोजन-गृहें काढिलीं होतीं. हा प्रघात पूर्वीं क्रीट बेटांत होता, तेथून तो

स्पार्टन लोकांनीं उचलिला. भोजनासाठीं मोठे हॉल बांधलेले असत. तेथें जवसाचें पीठ, दारू, अंजीर व पनीर (म्ह. चीझ) वगैरे भोजनाचे जिन्नस प्रत्येक शेतकऱ्यास पाठवावे लागत. कांहीं लोक जेव्हां जनावरांचा बळी देत, तेव्हां त्या बळीचा कांहीं भाग ह्या भोजनगृहांत त्यांस पाठवावा लागे. सरकारानें जंगलें राखलेलीं असून, त्यांतील शिकार पकडून ह्या ठिकाणीं आणीत. पुढें पुढें तर मीठमसाल्या-साठीं सुद्धां प्रत्येक असामीवर कांहीं थोडा आकार बसविण्यांत आला. कोणीही इसम, मग तो राजा असो कीं रंक असो, त्यास ह्या सार्वजनिक गृहांतच भोजनास यावें लागे; व आपापल्या हिशाचा आकार देणें त्यास प्राप्त असे.

भोजनाप्रमाणेंच शयनगृहेंही सरकारी असत. त्या ठिकाणीं सर्व स्पार्टन लोकांस निजण्यास जावें लागे. ह्याप्रमाणें वयाचीं साठ वर्षें झालीं, कीं लष्करी नोकरी संपली. मध्यंतरीं युद्धप्रसंग नसून फुर-सत सांपडल्यास, त्या फुरसतींत कवाइती व शिकार हे धंदे चालत. साठवर्षांनंतरचें आयुष्य सरकारची इतर बैठी नोकरी करण्यांत, किंवा लहानांचा सांभाळ करण्यांत खर्च करावें, असा नियम होता. अगदीं वृद्धापकाळ आला, म्हणजे समवयस्क लोक एकत्र जमून गोष्टी करून आपला काळ घालवीत. अशा प्रकारचीं सार्वजनिक भेटीचीं गृहें प्रत्येक ग्रीक शहरांत बांधलेलीं होतीं. स्पार्टामध्यें मात्र त्या गृहांचा उपयोग फक्त वृद्ध झालेल्या सैनिकांस करूं देत असत.

स्पार्टन लोकांच्या बायका व मुलींकरितां अशी सार्वजनिक व्यवस्था नव्हती; त्या आपापल्या घरींच राहत, तरी पण त्यांचें शिक्षणही पुरुषांसारखेंच कठोर असे. लहानपणीं त्यांस तालमींत व्यायाम करावा लागे. कोणत्याही प्रकारचें सौख्य किंवा आराम त्यांस घेऊं देत नसत. पुरुषांप्रमाणेंच बायकाही फक्त एक वस्त्र नेसून राहत.

स्पार्टन राजांच्या हातांत अधिकार फारच थोडा असे. साठ वर्षांच्या अठ्ठावीस बड्या गृहस्थांची एक सभा नेमलेली असून, तिच्या

हातांत सर्व कारभार असे. ह्या सभेचें अध्यक्षस्थान राजांकडे असे व कधीं कधीं धर्माध्यक्ष व सेनापति ह्यांसही अध्यक्ष नेमीत असत.

स्पार्टा येथें व डोरियन लोकांच्या इतर सर्व शहरांत, ईफोर नांवाचे सरकारी तपासनीस असत. ते लोकांचें शिक्षण व वर्तन ह्यांवर देखरेख ठेवीत. युद्धप्रसंगीं दोनही राजे वारंवार बाहेर जाऊं लागल्यामुळें, राज्याचा सर्व कारभार ह्या तपासनिसांच्याच हातांत गेला. वृद्धमंत्रिसभा व सामान्य लोक ह्यांजमध्यें शिष्टाई करण्याचा त्यांनीं आव घातल्यामुळें, त्यांच्या सर्व सूचना पास होत गेल्या, म्हणून त्यांची सत्ता वाढली. असें होतां होतां राज्यांत त्यांच्याशिवाय पान हालेनासें झालें.

इकडे स्पार्टाची सत्ताही हळूहळू फारच वाढली. शेजारच्या राजांस स्पार्टाचा मोठा धाक वाटूं लागला. लॅकोनियाला लागूनच नैर्ऋत्येस मेसेनिया म्हणून एक प्रांत होता, त्यांतील लोकांस स्पार्टन लोकांनीं जिंकून आपल्या अंमलाखालीं आणिलें. मेसेनियन लोक तरी कांहीं कमी नव्हते. प्रसंग पडला कीं तेही स्पार्टन लोकांबरोबर दोन हात करीत असत. पुढें त्या दोघांमध्यें युद्धप्रसंग होऊन मेसेनियन लोक जिंकले गेले. हें युद्ध चालू असतां अनेक शहरें धुळीस मिळालीं; देश उद्ध्वस्त झाला, आणि हजारों लोक तलवारीखालीं कापले गेले. ह्याप्रमाणें चाळीस वर्षेपावेतों मेसेनियन लोक स्पार्टाच्या ताब्यांत राहिले. इ. स. पू. ६८५ ह्या वर्षीं आरिस्टोमिनिस म्हणून मेसेनियाचा एक शूर देशभक्त स्वातंत्र्यासाठीं स्पार्टन लोकांशीं लढण्यास पुढें आला. त्यानें सर्व मेसेनियन लोकांस धीर देऊन युद्धास सिद्ध केलें; व अनेक पराक्रम करून स्पार्टन लोकांस पुष्कळ दमविलें. एके दिवशीं रात्रीं तो एकटाच स्पार्टा शहरांत शिरला. शहरास तटबंदी नव्हती. तेथें मिनर्व्हा देवीच्या देवळांत जाऊन तिच्या अंगास एक ढाल त्यानें खिळवून दिली; व 'स्पार्टन लोकांपासून मिळविलेल्या लुटीपैकीं ही ढाल मीं देवीस अर्पण केली आहे,' असा लेख तेथें लिहून ठेविला.

सकाळीं स्पार्टन लोकांनीं ती ढाल पाहिली तेव्हां ते घाबरून गेले. त्यांस असें वाटलें कीं, देवी आपणांस सोडून मेसेनियन लोकांवर कृपादृष्टि करीत आहे.

ह्या युद्धांत घडलेल्या अनेक चित्तवेधक गोष्टी लोकांत सांगण्यांत येतात. एक गोष्ट अशी आहे कीं, टिर्टियस नांवाचा ॲटिका प्रांतांतला एक गृहस्थ होता. तो मूळचा पंतोजी असून शिवाय शूर प्रसंगांचीं कवनें करून लोकांस म्हणून दाखवीत असे. डेल्फाय येथील कौलावरून असें जाहीर झालें होतें कीं, स्पार्टन लोकांस एखादा आथेन्सचा योद्धा सामील झाल्याशिवाय जय मिळावयाचा नाहीं. ह्या कौलास अनुसरून स्पार्टन लोकांनीं आथेन्सकडे विनंती केली कीं, आपणांस एक उत्कृष्ट योद्धा पाठवून द्यावा. आर्कनच्या मनांत स्पार्टाला मदत करावी असें नव्हतें. तथापि अपॉलो रुष्ट होईल ह्या भीतीनें आथेन्सच्या लोकांनीं टिर्टियस यास स्पार्टा येथें पाठवून दिलें. टिर्टियस लंगडा असून त्यास युद्धकलेची माहिती नव्हती; तेव्हां त्याच्या हातून विशेष कांहीं पराक्रम घडेल असें आथेन्सच्या लोकांस वाटलें नाहीं. कोणतीही कथा घेतली तरी डेल्फाय येथील अपॉलोचें भाकीत खरें ठरलेंच पाहिजे, अशा आथेन्सच्या सर्व दंतकथा आहेत. त्याचप्रमाणें टिर्टियस ह्याच्या कवनांनीं व वीर्योत्पादक गाण्यांनीं स्पार्टन फौजेस स्वेष येऊन, त्यांनीं मेसेनियन लोकांस पुनरपि जिंकून टाकिलें.

टिर्टियस यास स्पार्टा येथें कसा मान मिळत असे तें कळत नाहीं. तथापि त्याचीं कवनें स्पार्टन लोकांस फार आवडत; व प्रत्येक शिपाई रात्रीं भोजन झाल्यावर तीं मोठ्या भक्तीनें म्हणत असे. स्पार्टन व मेसेनियन लोकांचें हें युद्ध सतरा वर्षें चाललें. अखेरीस मेसेनिया प्रांत स्पार्टाच्या कबजांत आला. स्पार्टाच्या ताब्यांतील आर्केडिया प्रांतांत कारी येथें डायाना देवीचा उत्सव दरसाल होत असे. त्या उत्सवांतून एकदां मेसोनियन लोकांनीं कित्येक स्पार्टन मुली पळवून नेल्या. पण त्यांचा सरदार ॲरिस्टोमिनिस ह्यानें स्पार्टन लोकांपासून योग्य दंड घेऊन, त्या मुली त्यांच्या त्यांस परत दिल्या. अशा अनेक

आख्यायिका ह्या युद्धांतल्या प्रचलित आहेत. ॲरिस्टोमिनिस ह्याचा शेवटीं उपाय हरला. तो मेसेनिया सोडून ऱ्होड्स बेटांत जाऊन तेथेंच आमरण राहिला. मेसेनियन लोक त्यास फार पूज्य मानीत असत. त्याच्यावर अनेक कविता व आख्यानें केलेलीं असून, त्यांवरून व टिर्टियस ह्याच्या कवनांतून ह्या मेसेनियन युद्धाची हकीगत उपलब्ध झाली आहे.

मेसेनिया जिंकल्यापासून स्पार्टा येथें अनेक घडामोडी झाल्या. अनेक स्पार्टन लोक युद्धांत मरण पावल्यामुळें, त्यांचे हक्क पुष्कळ लॅकोनियन लोकांस देण्यांत आले; तसेंच युद्धांत मरण पावलेल्या लोकांच्या विधवांशीं लग्न करण्याची त्यांस परवानगी मिळाली. त्यामुळें कित्येक कुटुंबें कुलभ्रष्ट झालीं; व ज्यांनीं दुसऱ्या जातीच्या लोकांशीं लग्नें केलीं नाहींत, ते आपणास पवित्र समजूं लागले. आरंभीं सर्व स्पार्टन लोक सारख्या दर्जाचे होते; पण मेसेनिया जिंकल्यावर त्यांजमध्यें उच्चनीच भाव शिरला. ह्या वरील युद्धांत स्पार्टन लोकांस कॉरिंथची मदत होती. आथेन्सचें आरमार सोलन ह्यानें सुधारण्यापूर्वीं, आरमाराच्या बाबतींत कॉरिंथचा पगडा सर्व ग्रीस देशावर होता. मेसेनियन युद्धाच्या वेळेस कॉरिंथच्या सरकारानें गलबतें बांधण्याच्या कामांत फारच सुधारणा केली. ते मोठमोठीं विस्तृत व उंच गलबतें बांधूं लागले; त्यांवर वल्ह्यांच्या तीन तीन रांगा असत. जुन्या गलबतांना फक्त एकच रांग असे. म्हणून ह्या नवीन गलबतांस ट्रायरीम, म्हणजे तीन रांगांचीं गलबतें, असें नांव मिळालें. पुढें ज्यास्त रांगांचीं गलबतें बांधण्यांत आलीं त्यांसही चार रांगांचीं, पांच रांगांचीं, अशीं नांवें पडत गेलीं

## प्रकरण पांचवें.

### इ० स० पू० सहाव्या शतकांतील
### ग्रीक लोकांच्या रीतीभाती.

ह्या वेळीं ग्रीक लोकांची सुधारणा विशेषशी झाली नव्हती. आथेन्स शहर विद्येचें माहेरघर, व कॉरिन्थ शिल्पादि कलांचें आदि-स्थान झालें, तें ह्यापुढें पुष्कळ काळानें झालें. तथापि होमरच्या काळीं ग्रीक लोकांची स्थिति होती, त्याहून ते ह्या वेळेस बरेच सुधारलेले होते. लोकांच्या रीतीभाती व एकंदर देशाचा नूर होम-रच्या वेळेपासून पुष्कळ पालटला होता. त्यांचीं शहरें पुष्कळ सुरेख झालीं. लोक विटांचीं व दगडांचीं घरें बांधूं लागले, व छप-रांवर कौलें घालूं लागले; तसेंच आंत ऐसपैस जागा करून चांगलें सामानसुमान ठेवूं लागले. जमिनीस दगडाची फरशी करून, भिंतीस पांढरा रंग लावूं लागले; तरी चित्रविचित्र रंग देऊन घरांस शोभा आणणें त्यास ह्या वेळीं ठाऊक नव्हतें. घरांतील खोल्यांचे दोन पृथक् भाग असत. एक पुरुषांसाठीं व दुसरा बायकांसाठीं. त्या वेळीं आपल्याइकडील रिवाजाप्रमाणें स्त्रिया पुरुषांपासून अलग राहत. स्त्रियांस विशेष सन्मान देण्याचा प्रघात नव्हता. नवरा आपल्या बायकोस सहचारिणी समजे, पण आपल्याहून तिची योग्यता तो कमी मानी. कुटुंबाची देखरेख एवढेंच स्त्रियांचें काम असे. म्हणून स्त्रियांस शिक्षण देऊन त्यांचें मन सुसंस्कृत करण्याची चाल नव्हती. त्या सर्वथैव अशिक्षितच असत.

परपुरुषास भेटण्याची तरुण स्त्रियांना मनाई असे. फक्त बाप आणि भाऊ ह्यांस भेटण्यास हरकत नव्हती. तथापि मोठमोठ्या समारंभ-प्रसंगीं पुरुषांच्या मेळ्यांत बायका बाहेर येत असत. अशा मेळ्यांच्या प्रसंगीं तरुण पुरुष आपल्या बायका पसंत करीत. मुलीच्या आई-

बापास वर पसंत पडला तर त्याचा विवाह होत असे. त्यांत मुलीची पसंती मात्र कोणी विचारीत नसे. स्पार्टा प्रांतांत स्त्रियांस ज्यास्त मोकळीक होती. तेथें तरुण मुलींना पडदा नसून स्वतंत्रपणें फिरण्याची मुभा असे, व त्या सार्वजनिक खेळांत उघडपणें बाहेर येत. तथापि स्पार्टांत सुद्धां विवाहित स्त्रियांना बाहेर पडण्याची मोकळीक नव्हती; अविवाहित मात्र बाहेर पडत.

आथेन्सच्या लोकांस इतर संस्थानांतील स्त्रियांशीं लग्न करण्याची मनाई होती. लग्नें एकाच कुटुंबांत जुळविण्यांत येत; कारण एका कुटुंबांतील मुलीनें परक्या कुटुंबांतील पुरुषाशीं लग्न केल्यास, तिला स्वतःच्या हक्कानें प्राप्त झालेली मिळकत नवऱ्याचे कुटुंबांत जाण्याचा संभव होता. अशा प्रकारें एका कुटुंबाची मिळकत दुसऱ्या कुटुंबांत जाऊं नयें, म्हणून मुलीला जवळच्या नातेवाइकाशीं लग्न लावणें भाग पडे; मात्र तो इसम तिच्याशीं लग्न लावण्यास खुषी नसेल तर, तिच्याशीं लग्न लावण्याचा हक्क दुसऱ्या नजीकच्या पुरुषास प्राप्त होई. हा कायदा इतका कडक असे कीं, एखाद्या स्त्रीचें एकवार लग्न झाल्यावरही, जर जवळचा नातेवाईक तिच्याशीं लग्न करण्याचा हक्क सांगू लागला, तर पहिल्या नवऱ्यास ती आपली बायको व तिची संपत्ति खऱ्या हक्कदारास द्यावी लागे.

कुटुंबांतील संपत्ति सर्व मुलांस सारखी विभागून मिळे; मात्र त्यांत बहिणी असल्यास, त्यांचा लग्नखर्च करणें व त्यांचें लग्न जवळच्या नातेवाइकांशीं जुळवून देणें, ह्या गोष्टी त्या भावांस कराव्या लागत. एखादी मुलगी लहानपणापासून पोरकी असून तिला भाऊ नसले व तिजपाशीं द्रव्य नसलें तर, तिचा जो कोणी जवळचा नातेवाईक असे, त्यानें स्वतः तिच्याशीं लग्न लावावें, अगर तिचा हुंडा भरून तिला नवरा पाहून द्यावा, असा कायदा होता. ही हुंडा देण्याची चाल लायकरगस ह्यानें स्पार्टांतून अजीबात काढून टाकिली. त्यामुळें मुलगी कितीही गरीब असली, तरी तिचें लग्न होण्याची अडचण पडत नसे.

ग्रीक लोकांत विवाहविधि असा होता कीं, वधूवरांचे नातेवाईक एकत्र जमवून, त्या ठिकाणीं वधूवरांच्या देखत लग्नाचा ठराव होई, त्यांतच हुंडा व मुहूर्त ह्यांचा निश्चय होत असे. लग्नाच्या दिवशीं सकाळीं होमहवन व धर्मविधि होऊन, संध्याकाळीं वराची स्वारी वधूच्या घरीं तिला घेण्याकरितां येई. नंतर वरात निघे. त्यांत वधूस सुंदर शालू नेसवीत. वराच्या अंगावरही चित्रविचित्र रंगांचा सुंदर पोषाख असे. उभयतांच्या मस्तकांवर शोभिवंत पुष्पमालांचे मुगुट असत. वधूस एका सुंदर रथांत बसवून, तिच्या एका बाजूस वर, व दुसऱ्या बाजूस वधूचे नातेवाईक बसत. वरातीच्या पुढें सुस्वर तालांत वाद्यें वाजवून देवतांचीं स्तोत्रें म्हणत. गृहप्रवेशाचें द्वार लतापल्लवांच्या गुच्छांनीं शृंगारलेलें असून, तेथें वधूवरांचा प्रवेश होतांच त्यांजपुढें जमिनीवर मिठाई टाकीत. तदनंतर मेजवानी होऊन समारंभ पुरा होई. दुसऱ्या दिवशीं स्नेही मंडळीकडून नजरनजराणे येत, व कुटुंबाच्या नांवनिशींत वधूचें नांव लिहिण्यांत येई.

मुलाचा जन्म झाल्यावरही तत्प्रीत्यर्थ त्याचे आईबाप एक मोठा समारंभ करीत, व आपल्याकडील बाळंतविड्याप्रमाणें कुटुंबाच्या हितचिंतकांकडून मुलास भेटी येत. मुलगा झालेला असला तर घराला ऑलिव्ह नामक वृक्षांच्या शाखांनीं शृंगार करीत, व मुलगी झाली असली तर तो शृंगार लोकरीचा करीत. संध्याकाळीं एक मेजवानी होई. त्या प्रसंगीं होमशाळेंत अग्नीची पूजा करून, जन्मलेल्या मुलास हातांत घेऊन दाई त्या अग्नीस प्रदक्षिणा घाली; व त्याच वेळीं मुलाचें नांव ठेवीत. हें मूल ह्या कुटुंबांतून देवास अर्पण करण्यांत येत आहे, असा ह्या विधीचा अर्थ होता. हा विधि यथासांग झाला ह्याची साक्ष ठेवण्याकरितां, जमलेले सर्व गृहस्थ त्या होमास प्रदक्षिणा घालीत. मुलाचें फक्त एकच नांव ठेवण्यांत येई. ख्रिस्ती लोकांत अनेक नांवें ठेवण्याची चाल आहे, ती ग्रीक लोकांत नव्हती. तें नांव बाप आपल्या पसंतीनें ठेवी; व पुढें कधीं तें फिरवून दुसरें नांव ठेवावेंसें वाटल्यास बापास तसें करतां येत असे.

ग्रीक लोक प्रेतें पुरीत असत. प्रेतसंस्काराचा विधि महत्त्वाचा असे. मनुष्य मेल्यावर तिसऱ्या दिवशीं सूर्योदयाचे अगोदर हा विधि करीत. उघड्या तिरडीवर प्रेत शुभ्र वस्त्रानें गुंडाळून तें स्मशानांत नेत. प्रेताच्या मस्तकावर फुलांचे गुच्छ घातलेले असत. पुरुष असत ते प्रेताच्या पुढें चालत व बायका मागें चालत; शिवाय वाजंत्रीं वाजवून शोकदर्शक भजन म्हणण्याकरितां मुद्दाम बोलवून आणलेले पुष्कळ लोक स्मशानयात्रेबरोबर असत. कधीं कधीं ग्रीक लोक प्रेतें चितेवर जाळीत; व त्यांची रक्षा एका भांड्यांत भरून त्यावर थडगीं बांधीत. तसेंच प्रेतें पुरतांना तीं ते एका मातीच्या पेटींत घालून त्यांचें तोंड पूर्वेकडे करून पुरीत. थडगीं बहुधा शह-राच्या वेशीजवळ रस्त्याचे बाजूस असत. सुतकाचा पोषाख काळा असून तें एक महिनाभर पाळीत. त्या महिन्यांत कुटुंबांतील माणसें एकांतांत राहत; बाहेर समाजांत येत नसत.

ह्या वेळचा ग्रीक लोकांचा पोषाख पहिल्यासारखाच होता; त्यांत विशेष फरक झाला नव्हता. आथेन्स व दुसऱ्या कित्येक शहरांतील उंच प्रतीचे लोक बाह्यांचा लांब अंगरखा अंगांत घालून त्यावर धोतर लपेटून घेत. पण सर्वसामान्य पोषाख म्हणजे आंखूड बिन-हाताचें जाकिट असे; त्यास चिटन असें नांव आहे. पुरुषांचें मुख्य वस्त्र धोतर असे. बायका शालू नेसत, ते पुरुषांच्याहून मोठे लांबलचक व बारीक असत. त्यांवर कधीं कधीं कशीद्याचें किंवा जरीचें काम केलेलें असे. तसेंच बायकांचीं जाकिटें सुंदर पातळ वस्त्राचीं असून, त्यास कोंपरापर्यंत बाह्या असत; म्हणजे त्या एक प्रकारच्या आपल्याकडील चोळ्याच होत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

वस्त्रें विणण्याची कला ग्रीक लोकांस पूर्वीपासून येत होती. प्रत्येक कुटुंबांत माग असे; त्यावर कुटुंबास पुरे इतकें कापड ते गुलामां-कडून विणवून घेत. तसेंच सुटी लोकर सारखी दाबून बुरणुसा-सारखें कापड करणें त्यांस ठाऊक होतें. अशा प्रकारच्या दाबीव लोकरीच्या बुरणुसाच्या टोप्या प्रवासी लोक, गुराखी, व शेतकरी वापरीत असत.

ग्रीक लोक आपल्या जमिनी वर्षांतून तीन वेळ नांगरीत. त्यांचे नांगर अनेक तऱ्हेचे पण साधे असत. शेतावरच एक उंचवट्यावर खळी करून त्यांत ते सर्व धान्य मळीत. धान्य मळण्याचें काम केव्हां केव्हां यंत्रानें करीत, व केव्हां केव्हां गुरांच्या पायांखालीं मळीत. धान्य दळणें तें दगडी उखळांत कुटून बारीक करीत, किंवा दगडी जांतींही त्यांजपाशीं असत. ह्या जांत्यांवर दळण्याचें काम स्त्रीजातीच्या गुलामांकडून करवीत.

ॲटिका प्रांताची जमीन गव्हांच्या पिकास योग्य नव्हती. व्यापार मुख्यतः धान्याचा चाले, व त्यापासन सरकारसाऱ्याची बरीच प्राप्ति होई. धान्यसंबंधीं कायदे मोठे कडक असत. धान्यविक्रीचे दर सरकार ठरवी. त्या दरांहून महाग दरानें धान्य विकून ज्यास्त फायदा व्यापाऱ्यांनीं केल्यास, त्यांस मरणाची शिक्षा होत असे. ॲटिका प्रांतांत जेवढें धान्य उत्पन्न होई, तेवढें सर्व आथेन्स येथेंच आणून विकावें लागे; व परदेशाहून आणलेल्या धान्यापैकीं निदान दोन-तृतीयांशाची विक्री आथेन्स येथेंच करावी, असा कायदा होता. ॲटिकांतले उत्पन्नाचे मुख्य जिन्नस तेल आणि दारू हे असत. द्राक्षांचे मळे व ऑलिव्ह नांवाच्या तेलफळाचीं शेतें ह्यांनीं सर्व प्रांत भरलेला असे. बागाईत त्यांस ठाऊक नव्हतें; तसेंच सुंदर बागा करण्याची त्यांस माहिती नव्हती. मात्र सार्वजनिक उत्सवप्रसंगीं पुष्पमाळा करण्यासाठीं गुलाब, कमळें व इतर सुवासिक फुलझाडें ते लावीत असत.

अपॅटयूरिया नांवाचा एक उत्सव दरसाल आथेन्स येथें होत असे. वर्षांत जन्मलेल्या सर्व मुलांस नागरिकत्वाचे हक्क देण्यासाठीं हा उत्सव करीत. तो तीन दिवस चाले. पहिल्या दिवशीं सर्व लोक एकत्र जमून सायंकाळीं ग्रामभोजन घालीत. दुसऱ्या दिवशीं मंदिरांत जाऊन बळी वगैरे देत. तिसऱ्या दिवशीं सर्व भाईबंद ( गोत्रज ) एकत्र जमत. तेथें बाप आपलें नवीन मूल हातांत घेऊन आपल्या गोत्रजांपुढें आणी; व 'ह्यास नागरिकाचें स्वातंत्र्य देण्यास हरकत आहे काय?' असा प्रश्न विचारी. त्यावर कोणीं हरकत घेतली

नाहीं तर, त्या मुलाचें नांव नागरिकांच्या पटांत दाखल करीत. तसेंच कुळदेवतेस बकरा किंवा मेंढा बळी देत. अशा प्रकारें हा उत्सव तीन दिवस मोठ्या थाटानें चाले; त्यांत मुलांकडून सुस्वर पदें म्हणवीत; व ज्यांचें गायन उत्तम ठरे, त्यांस बक्षिसें देत. आथेन्सचा नगरवासी होण्यांत ग्रीक लोकांस केवढें भूषण वाटे हें ह्या उत्सवावरून व्यक्त होतें.

ह्यांशिवाय ग्रीक लोकांचे धार्मिक महोत्सवही अनेक होते. त्यांत सर्व राष्ट्राचे असे चार मुख्य उत्सव असून, त्या सर्वांत, ऑलिंपिया येथील कसरतीचे खेळ, हा अत्यंत महत्त्वाचा होता. हा उत्सव चार वर्षांतून एकवार एलिसच्या मैदानांत ऑलिंपिया येथें जुपिटरच्या प्रीत्यर्थ होत असे. ह्या महोत्सवावरूनच चार वर्षांची कालगणना ग्रीक लोकांत सुरू झाली; तीस 'ऑलिंपियाड' असें नांव आहे. एलिसचा राजा व स्पार्टाचा कायदेपंडित लायकरगस ह्या दोघांनीं इ. स. पू. ७७६ ह्या वर्षी, मध्यंतरीं बरेच दिवस बंद पडलेले हे ऑलिंपियाचे खेळ पुनरपि सुरू केले, त्या वेळेपासून ही वर्षगणना सुरू झाली. ह्यावरून पहिला ऑलिंपियाड इ. स. पू. ७७६ च्या ग्रीष्मऋतूपासून ७७२च्या ग्रीष्मऋतूपर्यंत समजला जातो.

ऑलिंपियाचा व इतर महोत्सव राष्ट्रदृष्ट्या ग्रीक लोकांस फार महत्त्वाचे वाटत. ह्या उत्सवासाठीं निरनिराळ्या संस्थानांतील लोक एकत्र जमत, त्यायोगें त्यांमध्यें एक प्रकारचा ऐक्यभाव कायम राहत असे. युद्ध चालू असलें तरी, ह्या उत्सवाच्या वेळेस तें तहकूब राहत असे; व उत्सवांची जागा पवित्र समजल्यामुळें तेथें युद्धसंपर्क पोंचत नसे. उत्सव संपल्याशिवाय युद्धासाठीं उत्सवाच्या प्रांतांत शिरण्याची उभय पक्षांस मनाई असे.

ग्रीस देशांतील निरनिराळ्या संस्थानांतून ह्या उत्सवांस प्रतिनिधि पाठविण्यांत येत असत. ते प्रतिनिधि अशा प्रसंगीं मोठी चढाओढ करून विशेष थाट करीत, व मौल्यवान नजराणे आणीत. ऑलिंपिया येथील मुख्य मंदीर एटिस नांवाच्या पवित्र राईत होतें. उत्सवास आलेला प्रत्येक इसम तेथील देवापुढें आपापली भेट आणून ठेवी,

व पुजाऱ्यांस दक्षणा देई. एक पुजारी देवद्वारीं उभा राहून दर्शनास आलेल्या प्रत्येक यात्रेकरूवर लॉरेलच्या पानांनीं अभिषिंचन करी. ऑलिंपियाच्या खेळांत प्रथम फक्त पायीं धांवण्याच्या शर्यती होत; पुढें पुढें कुस्त्या, उड्या मारणें, कडीचे खेळ, वज्रमुष्टी, सांग ( फेंकून मारण्याचा भाला ) फेंकणें, रथांच्या व गाड्यांच्या शर्यती, इत्यादि खेळ सुरू झाले. इराणी लोकांनीं ग्रीस देशावर प्रथम स्वारी केली, त्यापूर्वीं हा उत्सव एकच दिवस चाले; त्या स्वारीनंतर तो पांच दिवसांचा झाला. ऑलिंपियाचे खेळांत मोठमोठ्या दर्जाचे लोक सामील होत. जय मिळविण्याविषयीं मोठी स्पर्धा चाले, व विजय संपादणारास नाना तऱ्हेने बहुमान मिळत. देवाच्या पवित्र राईतील ऑलिव्ह झाडाची फांदी तोडून तिचा तुरा शिरोभूषण म्हणून त्यास देण्यांत येई; आणि ज्याप्रमाणें राजाच्या नांवाचा जयघोष करीत चोपदार ललकारतात, त्याप्रमाणें विजय संपादणाऱ्याचा जयघोष करीत. एखाद्या मोठ्या बादशहाप्रमाणें त्याची स्वारी काढून त्यास आपल्या नगरास पोंचवीत.

ऑलिंपियाप्रमाणेंच पायथियन खेळही प्रसिद्ध होते. ते डेल्फाय येथें दर तीन वर्षांनीं होत, व त्यांची रचना बहुतेक ऑलिंपियाप्रमाणेंच असे. मात्र पुढें पुढें ह्या उत्सवांत गायनकलेचीही परीक्षा घेऊन बक्षिसें देण्याचा प्रघात पडला.

ह्यांशिवाय नीमियन नांवाचा राष्ट्रीय उत्सव दर ऑलिंपियाडच्या दुसऱ्या व चवथ्या वर्षीं, आणि इस्थमियन नांवाचा उत्सव ऑलिंपियाच्या पहिल्या व तिसऱ्या वर्षीं होत असे. नीमियन उत्सव पिलॉपोनिशन संस्थान आर्गॉस यांतील नीमिया शहरीं व इस्थमियन उत्सव कॉरिन्थ येथें होई. ह्या ठिकाणच्या खेळांत अनेक मेळे जमून त्यांची गाणीं होत असल्यामुळें, मोठी गंमत उडे; आणि मेजवान्या, बळी, स्वाऱ्या व मेळे इत्यादि सर्व सामाजिक प्रकारांनीं त्यांस मोठें महत्त्व आलेलें होतें. सर्व प्रकारच्या उत्सवांत मोठमोठ्या जत्रा भरत, त्यांत नाना प्रकारचे जिन्नस विक्रीसाठीं मांडलेले असून, शिवाय सर्व लोकांच्या करमणुकीचेही अनेक प्रकार चालत.

उदाहरणार्थ, एक बकऱ्याचें कातडें पसरून त्यावर तेल ओतून तें सुळसुळीत करीत, व त्याजवर न पडतां जो नाच करून दाखवील त्यास तें कातडें बक्षीस मिळत असे.

ह्यांशिवाय लहान लहान उत्सव अनेक होते. डायोनिशिया नांवाचा एक उत्सव सर्व खेडेगांवांतून वर्षांतून चार वेळां होत असे. तो बॅकस म्हणजे काम-देवाच्या सन्मानार्थ होता. ह्या उत्सवांत मद्यपान व दंगा अतोनात चालू झाला. अशा प्रकारच्या तमाशांत अनेक गांवढळ लोक नानाप्रकारचीं सोंगें घेऊन नाचत. कांहीं लोक वनदेवांचीं सोंगें घेत, व कांहीं स्त्रियांचीं सोंगें घेऊन वनदेवता होत. ह्या डायोनिशिया उत्सवाची उत्पत्ति मद्य तयार करण्याच्या कामामुळें झाली; व तो धान्य कापण्याच्या दिवसांत होत असून, त्यांत गुलाम व सर्व लोक सामील होत असत. हा आपल्याकडील शिमग्यासारखाच असे.

ग्रीक लोकांत अनेक गुप्त मंत्र व पूजाविधि चालू असत. असले प्रकार रात्रीच्या वेळीं एकांत जागेंत करण्यांत येत. त्यांत थोड्याच लोकांचा प्रवेश असे; व त्यांस सर्व प्रकार गुप्त ठेवण्याची शपथ घ्यावी लागे. अशा प्रकारचे विशेष प्रसिद्धीस आलेले प्रकार म्हटले म्हणजे, ॲटिकांतील इल्युसिस शहरचे होत. डोरियन लोकांचा प्रवेश ग्रीस देशांत झाला, तेव्हांपासून हे गुप्त पूजेचे प्रकार सुरू झाले असें म्हणतात. त्या लोकांत प्राचीन काळीं जे धर्मप्रचार होते, ते पुढें सतत चालू ठेवण्याच्या उद्देशानें हे गुप्त प्रकार सुरू झाले. पुढें पुढें त्यांच्या देवता ठरल्या, व त्या देवतांची पूजा ह्या गुप्त विधीनें होऊं लागली. परंतु ज्यांचा त्या अंतर्मंडळांत प्रवेश असे, तेवढ्यांसच त्यांतील इंगित कळे. त्यांतील एकंदर प्रकार इतका गुप्त ठेवण्यांत येत असे कीं, त्यांचा खरा उद्देश व खरा विधि ह्यांविषयीं कांहींच माहिती उपलब्ध नाहीं.

# प्रकरण सहावें.

## सोलनपासून इराणी युद्धापर्यंत.

( इ० स० पू० सहावें शतक. )

सोलननें राज्यकारभार सोडल्यावर तीन गृहस्थ त्याकरितां भांडूं लागले. त्या भांडणांत पिझिस्ट्रेटस ह्यास जय मिळून तो कारभार पाहूं लागला. हा पूर्वी सोलनचा दोस्त असून अत्यंत लोकप्रिय होता. त्यानें आथेन्स शहराची पुष्कळ सुधारणा केली; व नाना तऱ्हेच्या भव्य व सुंदर इमारती बांधून शहरास शोभा आणिली. ह्या इमारतींत अपॉलोचें देऊळ व लायसियम नांवाची कसरतशाळा ह्या दोन विशेष प्रसिद्ध होत्या. ग्रीक लोकांत कसरतीचें माहात्म्य विशेष असून, तिचें शिक्षण सर्वांस देण्यांत येत असे. लायसियम शाळेचे अनेक मोठमोठे भाग होते. सभोंवार झाडी व बागा होत्या. त्या ठिकाणीं आथेन्सचीं मुलें कसरतीचे खेळ व व्यायाम करण्याकरितां येत. पुढें कांहीं शतकांनीं लायसियमच्या इमारतींत विद्वान तत्त्ववेत्ते व कवि वगैरे राहूं लागल्यामुळें, तें विद्यापीठ बनलें.

आथेन्स येथें पिझिस्ट्रेटसनें नवीन सुधारणा केल्या, त्यांकरितां त्यास लोकांवर कर बसवावा लागला. हा कर जमिनींतील उत्पन्नाच्या एकदशांश असून, त्यामुळें लोकांत पुष्कळ असंतोष उत्पन्न झाला. उदाहरणार्थ, एकदां पिझिस्ट्रेटस खेडेगांवांतून फिरत असतां, एक शेतकरी कांहीं नापीक जमिनींत काम करतांना त्यास दिसला. त्याजला आपल्या नोकराकरवीं पिझिस्ट्रेटसनें विचारिलें, 'ह्या जमिनीचें उत्पन्न काय आहे?' त्यावर शेतकरी रागावून बोलला, 'उत्पन्न होय! श्रम व त्रास; पिझिस्ट्रेटसचा कर मिळाला म्हणजे झालें; मग मला काय पर्वा?' त्याचें हें चोख उत्तर ऐकून पिझिस्ट्रेटसनें त्यास कर माफ केला.

ग्रीक इतिहासांत पिझिस्ट्रेटस ह्यास आथेन्सचा 'टायरंट' म्हणतात. टायरंट शब्दाचा अर्थ हल्लीं 'क्रूर व जुलमी राज्यकर्ता' असा आहे. तो त्या वेळीं नव्हता. ग्रीक भाषेंत टायरंट 'म्हणजे स्वतःच्या हुशारीनें सर्व राज्यसत्ता संपादन करून स्वतःच्याच इच्छेनें राज्य कारभार हांकणारा गृहस्थ' असा होता. म्हणजे ग्रीक लोकांचा टायरंट सज्जन व परोपकारी असूं शके; व पिझिस्ट्रेटस तशा प्रकारचा होता हें इतिहासावरून व्यक्त होत आहे. पिझिस्ट्रेटसनें असा एक कायदा केला कीं, युद्धांत पंगू झालेल्या सर्व लोकांस सरकारानें पोसावें. पिझिस्ट्रेटसनें विद्येच्या प्रसारार्थ पुष्कळ यत्न केले. ग्रीस देशांतील पहिलें वाचनालय त्यानेंच स्थापिलें. होमर आशिया खंडाच्या पश्चिम किनाऱ्यावर निपजला, त्याचीं कवनें त्या ठिकाणीं प्रचलित होतीं; तीं ग्रीक लोक तेथें वसाहत करण्यास आले, त्यांनीं आपल्याबरोबर स्वदेशीं परत आणिलीं. तीं सर्व एकत्र करून लिहून ठेवण्याचें काम पिझिस्ट्रेटस ह्यानें केलें. ग्रीक लोकांनीं आशियाच्या किनाऱ्यावर जाऊन निरनिराळ्या वेळीं वसाहती केल्या, हा प्रकार मागें आलाच आहे. आशियांतील ह्या वसाहतींस आयोनिया अशी संज्ञा होती. आयोनियांत तेरा ग्रीक नगरसंस्थानांचा समावेश होता. त्याचप्रमाणें इटलीच्या दक्षिणकिनाऱ्यावर व सिसिली बेटाच्या किनाऱ्यावर ग्रीक लोकांनीं वसाहती केल्या होत्या. तथापि हे सर्व लोक आरंभीं ग्रीस देशांतून बाहेर गेले. ग्रीक लोकांनीं इजिप्त देशांतही आपल्या वसाहती केल्या होत्या.

चित्रकला व मातीचे पुतळे करण्याची कला प्रथम कॉरिन्थच्या लोकांनीं विशेष प्रसिद्धीस आणिली असें म्हणणात. पण कॉरिन्थबरोबरच आर्गॉस, ईजीना, ऱ्होड्स आणि क्रीट ह्या ग्रीक संस्थानांत वरील कलांची अभिवृद्धि झालेली होती ह्यांत संशय नाहीं.

पिझिस्ट्रेटस कारभार करीत असतां, डेल्फायचें मंदीर जळून गेलें. तें पुनरपि बांधण्यासाठीं डेल्फायच्या लोकांनीं वर्गण्या गोळा करण्यास सर्व ग्रीक संस्थानांत आपले वकील पाठविले; व स्वतः एकचतुर्थांश खर्च सोसण्याचें कबूल केलें. सर्व संस्थानांतून पुष्कळ

वर्गणी जमा झाली. इजिप्टचा राजा अमासिस ह्यानें सुद्धां वर्गणी पाठविली. अशा रीतीनें डेल्फायचें मंदीर पहिलें साध्या दगडाचें होतें, तें आतां आरसपानी दगडाचें झालें. ह्या मंदिरास तीनशें टॅलेंट म्ह० पंधरा लाख रुपये खर्च झाला. पिझिस्ट्रेटस इ. स. पू. ५२७ वे वर्षी मरण पावला.

तदनंतर पिझिस्ट्रेटसचे दोन मुलगे हिपियास आणि हिपार्कस (Hippias and Hipparchus) हे कारभार पाहूं लागले. ह्या दोघां भावांनीं बापाचाच कित्ता वळवून लोकोपयोगी कामें केलीं व विद्याकलांस उत्तेजन दिलें. अनाक्रिऑन (Anacreon) व सायमोनाइड्स (Simonides) ह्या कवींस त्यांनीं आथेन्स येथें मुद्दाम आणून ठेविलें. दोन वर्षे कारभार केल्यानंतर ह्या दोघां बंधूंस ठार मारण्याचा एक गुप्त बेत आरिस्टोजिटन (Aristogiton) आणि हार्मोडियस ह्या दोघांनीं केला. तो सिद्धीस गेला तर राज्यकारभार स्वतःचे हातीं घेण्याचा त्यांचा विचार होता. आथेन्स येथें मिनर्व्हा देवीच्या सन्मानार्थ पॅनाथिनी (Panathenæ) नांवाचा उत्सव होत असे, त्याप्रसंगीं सर्व लोक भाले व ढाला घेऊन मेळ्यांत येत. त्या उत्सवांत हा वरील बेत उरकून घ्यावयाचा होता. त्यांत हिपार्कस ठार झाला, पण हिपियस वांचला; आणि त्यानें मुख्य मुख्य कटवाल्यांस पकडून ठार मारिलें. ह्यापुढें त्यानें चार वर्षे कारभार केला, तो लोकांस नापसंत होऊन त्यांनीं त्यास अधिकारावरून काढिलें आणि सर्व कुटुंबासह हद्दपार केलें.

तदनंतर क्लाइस्थेनिस ( Cleisthenes ) हा राज्यकारभार पाहूं लागला. त्यानें पुष्कळ सुधारणा केल्या, त्यांत विशेषतः बड्या लोकांचें वजन मोडून मध्यम व कनिष्ठ वर्गाच्या लोकांस वर आणण्याचा त्याचा रोख होता. प्राचीन काळचे लोकांचे चार वर्ग होते, ते त्यानें मोडून दहा नवीन वर्ग बांधिले. ह्या दहांपैकीं प्रत्येकाचे आणखी दहा दहा पोटविभाग करून त्यांस डेमीस अशी संज्ञा दिली. डेमींत नगर किंवा खेडें यांचा समावेश होत असे. प्रत्येक डेमीवर डेमार्क ( Demarch ) नांवाचा एक अंमलदार त्यानें नेमिला.

सर्व डेमीची सभा भरवून सार्वजनिक प्रश्नांचा निकाल करणें, आपापल्या हद्दींत बंदोबस्त ठेवणें, व सर्वांनीं आपल्या जमिनीचा सारा वेळच्या वेळीं भरला कीं नाहीं हें समजण्याकरितां खातेदारांची नोंद ठेवणें, हीं कामें डेमार्कचीं होतीं.

सर्व प्रकारच्या करांचा इजारा किंवा मक्ता एका इसमास देण्याची आथेन्स येथें वहिवाट होती. एक इसम किंवा अनेक इसमांचें एक मंडळ मक्तेदार ठरवून, त्यांजपासून ठरीव रक्कम घेऊन कराचा वसूल करण्याचा संपूर्ण मक्ता त्यांस देण्यांत येत असे. रस्त्यांची दस्तुरी, मालावरील जकात वगैरे झाडून साऱ्या उत्पन्नाच्या बाबी मक्त्यानें देत असत. जमीनमहसुलाचा मात्र मक्ता नव्हता. वरच्या शिवाय सर्व प्रकारच्या आयात व निर्गत मालावर शेंकडा दोन टक्के जकात होती; व गुलामांवर एक कर होता. परस्थांस आथेन्स येथें येऊन राहवयाचें असल्यास त्याबद्दल त्यांस कर द्यावा लागे; तसेंच सार्वजनिक बाजारांत मालाची विक्री करण्याबद्दलही कर होता.

नगरवासी म्हणून ग्रीक लोकांचे हक्क होते, त्यांत क्लाइस्थेनिसनें पुष्कळ बदल केला. सर्व स्वतंत्र लोक, बरेचसे परदेशी, व वरच्या दर्जाचे गुलाम, ह्या सर्वांस त्यानें नगरवाशांचे हक्क दिले. राज्य-कारभार हांकणारी सेनेट सभा होती, तींत, प्रत्येक जातीचे पन्नास ह्याप्रमाणें नवीन केलेल्या दहा जातींचे मिळून पांचशें सभासद असावे, अशी व्यवस्था केली. या पांचशें असामींपैकीं प्रत्येक पन्नासांनीं छत्तीस दिवस काम करावें; व त्यानंतर दुसऱ्या पन्नासांनीं, ह्या प्रमाणें वर्षभर कारभार चालावयाचा होता. ग्रीक लोकांचें वर्ष चांद्रमानाचें म्हणजे ३५४ दिवसांचें होतें, त्यास अनुसरून वर्षाचे दहा भाग करून हे दिवस ठरविलेले होते.

ह्या पन्नास सभासदांस प्रायटेन्स अशी संज्ञा होती. खजिन्याची व्यवस्था, व परराष्ट्रीय वकिलांशीं वाटाघाट करून तह वगैरे ठरविणें, हीं ह्या प्रायटेन्सचीं मुख्य कामें होतीं. पण युद्ध सुरू करणें व चाललेलें युद्ध बंद करणें, असलीं महत्त्वाचीं कामें प्रायटेन्स हे राष्ट्रीय

सभेकडे पाठवीत असत. राष्ट्रीय सभेंतील गरीब सभासदांस पगार देण्याचा सोलननेंच कायदा केला होता.

जुलमी व दुष्ट लोकांस हद्दपार करण्याचा एक चमत्कारिक प्रकार ह्या वेळीं चालू झाला. कोणीही इसम स्वराष्ट्रद्रोही आहे असा वहीम आल्यावर, त्याचा तपास न करितां किंवा त्यास गुन्ह्याची वर्दी न देतां, ह्या कायद्यानें त्यास हद्दपार करणें सुलभ पडत असे. त्यासाठीं राष्ट्रीय सभेचें आवार कठडा घालून बंद करीत. ह्या कठड्यास दहा जातींच्या लोकांस आंत येण्याकरितां दहा दारें ठेवीत. त्यांतून सर्व जातींचे लोक आंत गेले, म्हणजे प्रत्येकानें ज्यास हद्दपार करावयाचें असेल, त्याचें नांव एका शिंपीवर लिहून, ती शिंप एका मोठ्या भांड्यांत टाकावयाची, असा निर्बंध होता. संध्याकाळीं सर्व लोकांच्या शिंपा जमा झाल्या, म्हणजे त्या मोजीत, व त्यांची संख्या सहा हजार भरली तर त्या इसमास दहा वर्षें पावेतों हद्दपार करण्यांत येत असे. हा प्रकार क्लाइस्थेनिसनेंच प्रथम सुरू केला असें म्हणतात. ह्या शिक्षेची बजावणी प्रथम क्लाइस्थेनिसवरच झाली.

क्लाइस्थेनिस कारभार पाहत असतां आथेन्स आणि स्पार्टा ह्यांचें युद्ध जुंपलें. क्लिओमेनिस नांवाचा स्पार्टाचा राजा होता, त्यानें मोठी फौज घेऊन आथेन्सवर स्वारी केली, आणि तेथील किल्ला हस्तगत केला. तेव्हां आथेन्सच्या लोकांनीं निकरानें लढून तीन दिवसांत किल्ला परत घेतला. म्हणून क्लिओमिनिस यास परत जावें लागलें. पुढें क्लिओमिनिस ह्यानें कॉरिन्थियन व बिओशियन लोकांची मदत घेऊन दुसऱ्या बाजूनें आथेन्सवर स्वारी केली. त्याजबरोबर लढण्यासाठीं आथेन्सचे लोक तयार होऊन आले. इतक्यांत स्पार्टन लोकांनीं चालविलेलें हें युद्ध गैर आहे, असें कॉरिन्थियन लोकांस वाटून, त्यांनीं स्पार्टाचा पक्ष सोडिला. तेव्हां एकट्या बिओशियन लोकांचा आथिनियन फौजेनें तेव्हांच पराभव केला. बिओशियन लोकांस चाल्सिडियन लोकांची मदत होती. त्यांचाही पराभव होऊन, त्यांस आपला बराच मुलूख आथेन्सला द्यावा लागला. त्या

मुलखांत आपल्या लोकांची वसाहत करण्याकरितां ॲटिका प्रांतांतून चार हजार कुटुंबें च्यालिसिडियांत पाठविण्यांत आलीं. ग्रीस देशांत ग्रीक संस्थानानें स्थापिलेली पहिली वसाहत हीच होय.

आथेन्सचा कारभार क्लाइस्थेनिस पाहत होता, त्यास काढून हिपियस यास पुनः कारभार देण्याची खटपट स्पार्टाचा राजा क्लिओमिनीस ह्यानें केली. पण ह्या कामीं त्यास इतर संस्थानांचें साह्य हवें होतें तें मिळालें नाहीं. तेव्हां हिपियस ह्यानें इराणचा राजा डरायस हिस्टास्पिस ह्याजकडे संधान बांधून त्याची मदत मागितली; व आपणास आथेन्सचा कारभार मिळाल्यास, आपण हें सर्व संस्थान इराणचे स्वाधीन करूं असें हिपियसनें कबूल केलें. त्यावरून डरायसनें आथेन्सच्या सरकारास असा हुकूम पाठविला कीं, 'आथेन्सचा कारभार एकदम हिपियसचे हवालीं करावा.' आथीनिअन लोकांनीं हा हुकूम गुंडाळून ठेवून इराणशीं लढण्याची तयारी केली.

---

# प्रकरण सातवें.

## इराणी युद्ध.

### आरंभापासून सलामिसच्या लढाईपर्यंत.

### ( इ. स. पू. ४९२–४८० ).

इराणांत जे पराक्रमी राजे झाले त्यांत डरायसची गणना आहे. त्याच्या राज्याचा विस्तार पश्चिमेस ईज्यनसमुद्र व पूर्वेस सिंधुनद, तसेंच उत्तरेस सिथियन मैदान व दक्षिणेस इजिप्तची नीलनदी, एवढा होता. त्याच्या राज्याचे एकंदर वीस सुभे किंवा प्रांत होते. प्रत्येक प्रांतांवर सत्रप नांवाचा एक अधिकारी असे. ह्या सत्रपाची राहणी व अम्मल एखाद्या स्वतंत्र राजासारखा होता. आशियाच्या पश्चिम किनाऱ्यावर ग्रीक लोकांच्या वसाहती होत्या. त्या वसाहतींच्या

प्रदेशास आयोनिया असें म्हणत. तेथचें मुख्य शहर मायलिटस म्हणून होतें. ह्या वसाहतींवर वस्तुतः डरायसचाच ताबा होता. वसाहतींतील ग्रीक लोकांस खुष ठेवण्यासाठीं तेथचा सत्रपही डरायसनें ग्रीक जातीचाच नेमिला होता; परंतु एवढ्यानें ग्रीक लोक संतुष्ट होणारे नव्हते. त्यांस इराणचा अंमल नको होता. अरिस्टागोरास नामक मायलिटसचा ग्रीक सत्रप होता, त्यासच मुख्य करून, आशियांतील सर्व ग्रीक लोकांनीं डरायसचा अंमल झुगारून देण्याच्या हेतूनें बंड सुरू केलें.

अरिस्टागोरास स्पार्टाचा राजा क्लिओमिनिस याजकडे मदत मागण्याकरितां गेला. डरायसच्या राज्यविस्ताराविषयीं क्लिओमिनिसची खात्री करण्याकरितां अरिस्टागोरासनें आपल्याबरोबर एक पृथ्वीचा नकाशा तयार करून नेला होता. हा नकाशा कांसधातूच्या पटावर ओबडधोबडच काढलेला असून, त्यावर नद्यांचे प्रवाह व समुद्राचे आकार त्या वेळच्या माहितीनुरूप दाखविलेले होते. डरायसच्या राज्याचा विस्तार व त्यांची शक्ति ह्यांची क्लिओमिनिसला बरोबर कल्पना यावी एवढाच ह्या नकाशाचा उद्देश होता. युरोपांत झालेला पहिला नकाशा हाच होय.

अरिस्टागोरासला क्लिओमिनिसची मदत मिळाली नाहीं. त्यानें क्लिओमिनिसला ह्या मदतीबद्दल अडीचलाख रुपये देऊं केले, तथापि उपयोग झाला नाहीं. उलट त्यास राजानें स्पार्टातून घालवून दिलें. असें सांगतात कीं, अरिस्टागोरासनें पैशाची लालूच दाखवितांच क्लिओमिनिसचा निश्चय डळमळूं लागला होता; इतक्यांत गोर्गो ( Gorgo ) नांवाची क्लिओमिनिसची आठ वर्षांची मुलगी होती, ती बापास म्हणाली, " बाबा, चला येथून निघून जा, नाहीं तर आपणास पाप लागेल. " हे शब्द ऐकतांच क्लिओमिनिस उठून चालता झाला.

अरिस्टागोरासनें आपला वकील आथेन्स येथेंही पाठविला होता. हिपियस यास आथेन्सचा कारभार द्यावा असा इराणी राजाचा हुकूम आथेन्सला येऊन पोंचला, त्याच वेळेस हा वकीलही

येऊन पोंचला. तेव्हां आयोनियाच्या ग्रीक लोकांस मदत करण्याचा आथेन्सच्या लोकांनीं एकदम निश्चय केला; व अत्यंत त्वरा करून वीस लढाऊ जहाजें तयार केलीं. यूबिया बेटांत इरिट्रिया नांवाचें संस्थान होतें, तेथून पांच जहाजें आलीं. ह्या सर्व आरमारानें मिळून इराणी मुलखावर हल्ला करून सार्डिस शहर जाळून टाकिलें. पुढें एक लढाई झाली, तींत इराणी लोकांस जय मिळाला, व आथीनियन लोक युद्ध सोडून परत स्वदेशीं आले.

आयोनियन लोकांबरोबर डरायस सहा वर्षें लढत होता. अखेरीस त्यानें ग्रीक लोकांचें मुख्य शहर मायलिटस हस्तगत केलें; व जे ग्रीक लोक त्याच्या हातांत जिवंत सांपडले त्यांस पकडून त्यानें तैग्रीसनदीच्या मुखाशीं नवीन वसाहत करण्यास पाठविलें. त्यानंतर आशियांतील सर्व ग्रीक शहरें एकामागून एक इराणच्या हस्तगत झालीं. तेणेंकरून आशियांतील ग्रीक लोकांस जिंकण्याचा डरायसचा संकल्प पुरा झाला.

पण एवढ्यानेंच डरायस स्वस्थ बसला नाहीं. सार्डिस शहर जाळ-ल्याबद्दल आथिनियन व इरिट्रियन लोकांचा सूड घेण्याकरितां आथेन्सवर स्वारी करण्याची त्यानें तयारी केली. "आमचा ताबा तुम्हांस कबूल आहे याची खूण म्हणून आलेल्या जासुदा-बरोबर माती आणि पाणी पाठवून द्या," असे निरोप डरायस यानें सर्व ग्रीक संस्थानांस पाठविले. थीब्स आणि ईजीना ह्यांनीं ही बेअदबी सहन करून, इराणी राजाचें मागणें कबूल केलें; पण आथेन्स आणि स्पार्टा ह्यांनीं तें जुमानलें नाहीं. क्लिओमिनिस आपली फौज घेऊन एकदम ईजीनावर आला; तें संस्थान जिंकून त्यानें आपल्या हस्तगत केलें, आणि तेथील लोकांपासून असें वचन घेतलें कीं, आपण शत्रूंस जाऊन मिळणार नाहीं. ह्या ईजीनाशीं लढतांना क्लिओमिनिसनें अत्यंत क्रूरपणाचें आचरण केलें. तेथची राजधानी आरगॉस येथील देवाच्या राईंत कांहीं लोक भिऊन लपून बसले होते, सबब क्लिओमिनिसनें ती राई जाळून टाकिली. पुढें लवकरच वेड लागून क्लिओमिनिसनें आत्महत्या केली. देवाची राई जाळल्याबद्दल

देवास राग येऊन त्यानें अशा प्रकारें क्लिओमिनिस ह्यास शिक्षा केली, असें ग्रीक लोक म्हणू लागले.

इकडे इराणी लोकांनीं मोठें आरमार घेऊन ग्रीसवर स्वारी केली. रस्त्यांत त्यांनीं अनेक बेटें हस्तगत केलीं; व यूबिया येथें येऊन इरिट्रियाला वेढा घातला. नंतर तें शहर हस्तगत करून इराणी लोकांनीं जाळून टाकिलें. पुढें इराणी लोक जहाजांतून ॲटिका प्रांतांत येऊन मारेथानच्या मैदानांत तळ देऊन राहिले. त्यांजबरोबर सामना देण्यास प्लॅटियांतले ग्रीक लोक आले. स्पार्टाची मदत मागण्याकरितां त्यांनीं धांवते जासूद पाठविले. हे जासूद दोडशें मैल अंतर ४८ तासांत चालून गेले. निरनिराळ्या ग्रीक संस्थानांत एकमेकांशीं दळणवळण ठेवण्याचें साधन धांवणारे जासूद एवढेंच असल्यामुळें, जलद धांवण्याची शक्ति लोकांच्या अंगीं त्या वेळीं उत्कृष्ट होती. मारेथानपासून स्पार्टापर्यंतचा प्रवास जासुदांनीं इतक्या लवकर केला, ह्यावरून ग्रीक लोकांची शक्ति दिसून येते.

ग्रीक फौजेवर दहा सेनापति होते. त्यांपैकीं दररोज एक असामी फौजेचा मुख्य होत असे. इराणी फौज अतिशय मोठी होती, म्हणून ग्रीक सेनापतीस तिजवर हल्ला करण्याची छाती होईना. तेव्हां मिल्टियाडिस (Miltiades) नांवाचा धाडशी व युद्धकलेंत प्रवीण असा एक गृहस्थ होता, तो ग्रीक फौजेचा मुख्य झाला. त्यानें इराणी लोकांशीं लढून त्यांचा संपूर्ण पराभव केला. ही मारेथानची लढाई इ. स. पू. ४९० ह्या वर्षीं झाली.

ह्या लढाईचीं वर्णनें अतिशयोक्तिनें भरलेलीं आहेत; तरी पण ग्रीक लोकांहून इराणी लोकांची संख्या अतिशय मोठी होती. ग्रीक फौजेंत गुलामांची भरती विशेष असून, त्यांस युद्धशिक्षण मिळालेलें नव्हतें. तथापि, जय मिळाल्यास तुम्हांस स्वातंत्र्य मिळेल, असें वचन त्यांस दिलेलें असल्यामुळें, त्यांनीं लढण्याची शिकस्त केली. ह्या विजयामुळें मिल्टियाडिसचा लौकिक अतिशय वाढला. लोकांनीं आथेन्स येथें महोत्सव करून नाना प्रकारें आनंद प्रगट केला. त्यांनीं लढाईत पडलेल्या आथीनियन लोकांचीं प्रेतें मोठ्या

थाटानें पुरून, त्यांवर एक भव्य इमारत बांधिली. ह्या इमारतीला दहा प्रचंड खांब असून, त्यांवर दहा जातींच्या लोकांचीं नांवें खोदलेलीं होतीं. गुलाम आणि प्लॅटियाचे लोक ह्यांच्या प्रेतांवरही दुसरी एक अशीच इमारत बांधिली.

हल्लीं मॅरेथानचें मैदान उघडें व ओसाड आहे. त्या ठिकाणीं मनुष्यवस्ती नाहीं. समुद्रापासून सुमारें अर्ध्या मैलावर लाल मातीचा एक ढीग आहे. त्याची उंची ३० फूट व घेर ६०० फूट असून, जवळच एका चौकोनी आरसपानी मनोऱ्याचे अवशिष्ट भाग एकत्र होऊन पडले आहेत. हा मनोरा मिल्टियाडिसच्या सन्मानार्थ आथीनियन लोकांनीं बांधिला होता.

ह्या पराजयानें डरायसला फार वाईट वाटलें; व पुन: पांच वर्षें सतत खपून त्यानें ग्रीसदेशावर स्वारी करण्याची जंगी तयारी केली. पण ती पूर्ण होण्यापूर्वींच तो मरण पावला; तेव्हां त्याचा मुलगा क्झर्क्झीस ह्यानें ग्रीस देश जिंकण्याचा पक्का निश्चय करून, तत्प्रीत्यर्थ ज्यास्तच जोरानें सर्व सिद्धता केली.

ह्या वेळीं थेमिस्टॉक्लिस हा आथेन्सचा कारभार पाहत होता. तो घरंदाज व सधन असून, त्यानें आरमाराच्या योगानें आथेन्सचें सामर्थ्य पुष्कळ वाढविलें. ॲटिकाप्रांतांत लॅरियम येथें चांदीच्या खाणी होत्या, त्यांचें उत्पन्न त्यानें दरसाल वीस जहाजें नवीन बांधण्याकडे लावून दिलें. ह्या कामाची सर्व व्यवस्था नीट ठेवण्याकरितां त्यानें एक स्वतंत्र कमिटी नेमिली. थेमिस्टॉक्लिसनें बांधलेलीं जहाजें तिमजली असून, प्रत्येकावर दोनशें खलाशांची सोय होती. त्यांचा वेग हल्लींच्या आगबोटींच्या जवळ जवळ होता. त्यांच्या पुढील चोंचीच्या वरच्या अंगास रंगीत चित्रें काढिलेलीं असून, खालीं आलेल्या टोकांस लोखंडी भाला ठोकलेला होता, तेणेंकरून तें टोंक शत्रूंच्या जहाजांत एकदम शिरत असे. शत्रूंचे बाण आंतील लोकांस लागूं नयेत, म्हणून कातड्याचे किंवा टोपलीच्या विणीसारखे कठडे त्या जहाजांच्या सभोंवार लावीत. त्यांजवर

वल्हीं मारणारे बहुतेक गुलामच असत; पण खलाशी मात्र खालच्या वर्गांतील स्वतंत्र लोक असत.

मॅरेथानच्या लढाईनंतर दहा वर्षांनीं क्झर्क्झीस युरोपांत आला. त्याच्याबरोबर एवढी मोठी फौज होती कीं, पूर्वीं कधीं कोणीं अशी फौज युरोपांत आलेली पाहिली नव्हती. तींत निरनिराळ्या राष्ट्रांचे लोक असून, त्या सर्वांनीं आपापल्या राष्ट्रांचे पोषाख व हत्यारें धारण केलीं होतीं. एवढ्या फौजेस धान्यसामुग्री वगैरे पुरविण्याकरितां पुरुष, बायका, गाडे वगैरेंचे तांडेच्या तांडे त्या फौजेबरोबर होते. बादशहा आपल्या सुंदर रथांत बसून चालत होता; त्याच्या बंदोबस्तास निवडक पहारा असून, जेथें जेथें मुक्काम होई, तेथें तेथें स्वतःच्या राजवाड्यासारखी त्याच्या जेवणाखाणाची सर्व तजवीज लागत असे.

आथोस पर्वतापासून मुख्य महाद्वीपास जोडणारी एक अरुंद संयोगिभूमि आहे, तीवरून फौज जाण्यास अडचण पडूं नये, म्हणून त्यानें ती संयोगिभूमि खणून तेथें एक कालवा केला. तसेंच मार्मोराचा समुद्र व ईज्यन समुद्र यांस जोडणारी हेलेस्पांट नांवाची अरुंद सामुद्रधुनी आशिया व यूरोप यांजमध्यें आहे, त्या सामुद्रधुनीवर त्यानें होड्यांचा एक पूल बांधिला. हा पूल बांधणारे लोक इजिप्शन व फिनिशियन होते. पूल तयार झाल्यावर वादळ होऊन तो तुटून गेला. तेव्हां त्यानें होड्यांच्या दुहेरी रांगा एकास एक लावून, पुनः दुसरा मजबूद पूल तयार केला. त्या सर्व होड्या दोरखंडांनीं जखडून टाकिल्या; व प्रत्येक होडीचा नांगर पाण्यांत टाकून ती हालेनाशी केली. नंतर त्या होड्यांवर आडव्या फळ्या टाकून त्यांवर माती घातली व दोनही बाजूंस कठडा उभा केला; तेव्हां हा पूल उत्कृष्ट रस्त्यासारखाच झाला. हें काम करण्यास क्झर्क्झिसनें वेठीचे लोक धरून आणिले, त्यांजकडून काम घेण्याकरितां स्वतःच्या खात्रीचे मुकादम नेमलेले होते. ह्या पुलावरून सात अहोरात्रपर्यंत क्झर्क्झिसची फौज पलीकडे जात होती. खुष्कीची फौज थ्रेसप्रांतांतून गेली, तेव्हां त्या प्रांतांतील प्रत्येक शहराला एक दिवसाची सामुग्री ह्या फौजेस द्यावी लागली. ह्या जबरदस्तीनें कांहीं शहरें तर कायमचीं

नाश पावलीं; कारण एवढ्या मोठ्या फौजेचें एक दिवसाचें अन्न कांहीं थोडें नव्हतें.

ह्या भयंकर अरिष्टाशीं सामना करण्याकरितां आथेन्स आणि स्पार्टा हीं संस्थानें एक झालीं. दुसरीं कांहीं संस्थानें त्यांस प्रथम मिळालीं होतीं, पण त्यांनीं भावी परिणामावर नजर देऊन आपला पाय आरंभींच जुटींतून काढून घेतला. अशा प्रकारचा स्वदेशद्रोह करण्यांत अग्रगण्य संस्थान थेसली होय. थेसलीचे लोक क्झर्क्झिस ह्यास नुसते शरण जाऊन स्वस्थ बसले नाहींत, तर उलट त्याच्या फौजेंत सामिल होऊन आथेन्सबरोबर लढण्यास आले. थेसली, आणि ग्रीस देशाचे इतर प्रांत, ह्यांमध्यें मोठमोठे उंच पर्वत आहेत. त्यांवरून ग्रीस देशांत फौज उतरण्याची एकच अरुंद वाट आहे. तिला थर्मापिली असें म्हणतात. हिच्या एका बाजूस ईटाचा डोंगर व दुसऱ्या बाजूस समुद्र आहे. इराणी फौजेस प्रतिबंध करावयाचा म्हणजे ह्या वाटेच्या पुढें तीस येऊं द्यावयाचें नाहीं. इराणी फौजेस अडविण्याचें हें काम स्पार्टाचा राजा लिओनिडास ह्यानें पत्करिलें. तो आपले लोक घेऊन ही अरुंद वाट अडवून बसला. इराणी लोकांनीं ह्या वाटेनें आंत शिरण्याचे अनेक प्रयत्न केले; पण ते सफळ झाले नाहींत. शेवटीं एफिऍल्टिस नांवाचा ट्राकिनिया प्रांतांतला एक ग्रीक गृहस्थ फितूर होऊन शत्रूंस मिळाला. त्यानें पर्वतांवरून आंत येण्याची एक लहानशी वाट क्झर्क्झीस ह्यास दाखविली. त्या वाटेनें थोडीशी इराणी फौज लिओनिडासच्या पिछाडीस येऊं शकली.

लिओनिडास पळून गेला असता, तर त्याचा बचाव झाला असता. पण स्पार्टाचा कायदा असा होता कीं, स्पार्टन लोकांनीं रणांगणांतून पळ काढतां नये, अशा कचाट्यांत सांपडून त्यानें ह्या बिकट प्रसंगीं शूर पुरुषास शोभणारें निश्चयाचें वर्तन केलें. तीनशें स्पार्टन, सातशें थेस्पियन आणि चारशें थीबन इतके लोक त्यानें आपल्याजवळ ठेविले, आणि बाकीच्यास रजा दिली. ही लहानशी फौज त्यानें क्झर्क्झीसच्या प्रचंड सेनासमूहाशीं टक्कर देण्याकरितां सज्ज केली.

पैकीं चारशें थीबन लोक होते ते आरंभींच रणांगण सोडून चालते झाले. बाकीचे मात्र सर्व अशा निकरानें लढले कीं, त्यांपैकीं एकही इसम जिवंत राहिला नाहीं.

ह्याप्रमाणें ती अरुंद वाट ताब्यांत येतांच इराणी फौज फोसिस प्रांतांतून जाळपोळ व लुटालूट करीत पुढें आली. बिओशियांतील लोकांनीं तिचा प्रेमानें सत्कार केला. एक इराणी तुकडी डेल्फायवर आली; पण डेल्फायच्या लोकांनीं निकरानें लढून तीस परत घालविलें.

तथापि आथेन्सच्या बाजूचे लोक इतके सोडून गेले, कीं आथि-नियन लोकांचा नाइलाज झाला; तेव्हां ते आथेन्स शहर सोडून व बायकामुलें आणि घेतां आली तेवढी मालमत्ता घेऊन, जहाजांत बसून निघून सलामिस व ईजीना ह्या बेटांत निघून गेले. फक्त थोडे लोक मागें राहिले, त्यांनीं किल्ल्यांत जाऊन दरवाजे बंद केले. त्यावर शत्रूंनीं हल्ला केला. तथापि सर्व असामी पडले, तेव्हांच आथेन्सचा किल्ला इराणी लोकांच्या हातीं आला.

पुढें सलमिस बेट आणि ग्रीस देश यांजमध्यें अरुंद समुद्र आहे, त्यांत इराणी आरमार आलें. ह्या ठिकाणीं मात्र ग्रीक लोकांचें दैव उदयास आलें. ग्रीक आरमारावर थेमिस्टॉक्लिस हा मुख्य होता. त्यानें इराणी आरमारावर हल्ला करून त्या सर्वांचा फन्ना उडविला. ह्या समुद्रावरील झुंजास सलामिसची लढाई असें म्हणतात. ह्या लढाईनें युद्धाचा शेवटच झाला. समुद्रांत आरमारांची लढाई चालली होती ती पाहत क्झर्क्झीस किनाऱ्यावर आपली फौज सज्ज करून बसला होता. डोळ्यांसमोर आपलें सर्व आरमार गडप झालेलें पाहून त्याचा धीर सुटला; आणि त्यास मोठी दहशत पडली. आरमाराशिवाय युद्ध चालविणें शक्य नव्हतें; तेव्हां झालें इतकेंच पुरे असें समजून, तो तसाच त्वरेनें परत स्वदेशीं निघाला. त्याची फौज मागें राहिली, तीवर मार्डोनियस ह्यास त्यानें मुख्य सेनापति नेमिलें.

आथेन्स शहरांत जें कांहीं उरलें होतें, तें सर्व मार्डोनियस ह्यानें जाळून नाहींसें केलें. पुढें बिओशिया प्रांतांत प्लाटिया ( Plataea ) येथें इराणी फौजेची व ग्रीक फौजेची लढाई होऊन मार्डोनियस

मारला गेला. त्याच दिवशीं आशियामायनरांत मायकेल येथेंही इराणी लोकांचा पराभव झाला. ग्रीक लोकांनीं इराणी फौजेचा थेट त्यांच्या छावणीपर्यंत पाठलाग करून बहुतेकांस कापून काढिलें. नंतर थीब्सचे लोक आरंभींच इराणी लोकांस मिळाले होते, त्यांचें पारिपत्य करण्याकरितां ग्रीक फौज थीब्स शहरावर आली; व तेथच्या पुढाऱ्यांस पकडून त्यांनीं कॉरिन्थ येथें पाठविलें. तेथें स्वराष्ट्रद्रोहाबद्दल त्या सर्वांचा शिरच्छेद करण्यांत आला. ह्याप्रमाणें क्झर्क्झीसची स्वारी संपली.

ह्या युद्धांत आथेन्सचें सर्वस्वी नुकसान झालें. घरेंदारें शेतेंभातें वगैरे सर्व उद्ध्वस्त झालीं. तथापि आथेन्सचे लोक न डगमगतां दृढनिश्चयानें पुनरपि सर्व जमवाजमव करूं लागले; व पहिल्यापेक्षांही जास्त टुमदार शहर त्यांनीं उठविलें. ह्या नवीन शहराचा तट सात मैल परीघाचा होता; परंतु एवढा विस्तार इमारतींनीं कधींच भरून आला नाहीं. आंत पुष्कळ रिकामी जागा होती, तींत परचक्र आलें असतां बाहेरच्या खेड्यांतील लोकांस आपली मालमत्ता घेऊन राहतां येत असे. बाहेरच्या लोकांची ही मोठी सोय झाली; कारण आथेन्सचे पुष्कळ धनाढ्य लोक बाहेरच्या खेड्यांतील आपल्या मालकीच्या जमिनीवर बंगले बांधून राहत असत, त्यांस युद्धप्रसंग आला असतां शहरांत येऊन राहण्याची सोय झाली.

मारेथॉनच्या लढाईनंतर लवकरच आथेन्सचा शूर सेनापति मिल्टियाडिस ह्याजवर राजद्रोहाचा आरोप येऊन त्याजला अडीचलाख रुपये दंड करण्यांत आला. तो त्यानें न दिल्यामुळें त्यास कैदेंत टाकिलें. तेथेंच तो मृत्यु पावला. पण आथेन्सचा कायदा असा होता कीं, बापाची शिक्षा मुलानें भोगावी. तदनुसार मिल्टियाडिसचा मुलगा सायमन ( Cimon ) ह्यास, दंड न भरल्यामुळें, कैदेंत जावें लागलें. पुढें कल्यास नांवाच्या आथेन्सच्या एका सावकारानें सायमनचा दंड भरून त्यास बंधमुक्त केलें; त्याबद्दल सायमननें आपली बहीण कल्यास ह्यास देण्याचें वचन दिलें. कालांतरानें सायमन ह्यास वडिलोपार्जित जिंदगी मिळाली, व युद्धांतील लूटही पुष्कळ प्राप्त झाली. तेणेंकरून तो मातबर बनला.

# प्रकरण आठवें.

—:०:—

## सायमन व पेरीक्लीज.

क्झर्क्झिसचा पराभव झाला तरी युद्ध थांबलें नाहीं. पूर्वेकडील ग्रीक प्रदेशांत उभय पक्षांची झटापट चाललीच होती. थेमिस्टॉक्लीवर देशद्रोहाचा आरोप येऊन त्यास देशत्यागाची शिक्षा झाली असल्यामुळें, सायमन हा सेनापती झाला होता. त्यानें समुद्रावर व जमिनीवर इराणी फौजेशीं लढून अनेक विजय संपादिले. इ. स. पू. ४६६ ह्या वर्षी आशियामानयरच्या किनाऱ्यावर युरिमिडॉन येथें त्यानें इराणी फौजेचा पुरा फन्ना उडविला, इराणी आरमार नाहींसें केलें, व पुष्कळ लूट सपादन केली.

ह्यामुळें सायमनचा लौकिक मोठा वाढला; आणि आथेन्सचा राज्यकारभार आपल्या हातीं असावा अशी त्यास इच्छा उत्पन्न झाली. पण पेरिक्लीज म्हणून त्यास एक प्रतिस्पर्धी होता. तो प्रजापक्षाचा मुख्य असून सायमन हा सरदार लोकांचा मुख्य होता. सायमन मोठा पैसेवाला होता. त्यानें अनेक प्रकारचा दानधर्म व खर्च करून लोकांची प्रीति संपादन केली. त्यानें आपल्या बागा व फळांचे मळे सर्व लोकांस खुले केले. त्याच्या पंक्तीस सर्व जातभाईस भोजन मिळे. तो बाहेर पडे तेव्हां त्याचे नोकर गरीबांस पैसे व कपडे वांटीत त्याजपुढें चालत. त्यानें बागा तयार केल्या, धर्मशाळा बांधिल्या, आणि दुसरीं पुष्कळ सार्वजनिक कामें केलीं, त्यांचा लोकांस मोठा उपयोग झाला. थीसियसच्या मोठ्या देवळाचा कांहीं पडका भाग अजून दृष्टीस पडतो. तें देऊळ सायमननें बांधिलें. आथेन्स शहर व त्याचीं दोन बंदरें ह्यांजमध्यें त्यानें दोन मोठ्या भिंती बांधून त्यांजमधून दोहोंस जोडणारा चांगला सुरक्षित रस्ता नवीन बांधिला.

इतकीं कामें केलीं तरी त्याचा हेतु सिद्धीस गेला नाहीं. थेमिस्टॉक्लीसप्रमाणें त्यासही शिक्षा झाली. त्यास देशत्याग करावा लागला. तेव्हां अर्थात् आथेन्सचा सर्व कारभार पेरिक्लीजच्या हातीं आला.

इराणी फौजेचा पराभव करण्यांत आथेन्स आणि स्पार्टा हीं दोन संस्थानें प्रमुख होतीं. ह्यापुढें दोघांनाही ग्रीस देशांत प्रमुख होण्याची संधि आली होती. त्यांत स्पार्टाचें वर्चस्व थोडेसें ज्यास्तच होतें. परंतु तेथील लोकांच्या अंगीं बादशाही पद. धारण करण्यास लागणारा जोम नव्हता. त्यांना आरमार नको होतें, व आरमाराशिवाय दूरदूरचे प्रदेश ताब्यांत ठेवणें शक्य नव्हतें. तसेंच परिस्थिति बदलेल त्याप्रमाणें स्पार्टन लोकांस आपली व्यवस्था बदलतां येत नसे. त्यांना नवीन सुधारणा नको होत्या. कोणी एकादा अक्कलवान पुरुष पुढें येऊन नवीन व्यवस्था करूं लागला, कीं तो त्यांस अप्रिय होई. आहे तेवढ्यांत आपला बचाव करावा, उगाच बाहेरच्या भानगडींची उठाठेव करूं नये, असें स्पार्टाचें धोरण होतें. अमुक एक ठरीव पद्धत कायमची न स्वीकारतां, ऐन प्रसंगीं एकदम कांहीं तरी निश्चय करून त्याप्रमाणें वागणें ही स्पार्टाची पद्धत होती. स्वतःच्या संस्थानापलीकडे इतर ग्रीक संस्थानांची त्यास परवा वाटत नसे.

पण आथेन्सचें धोरण निराळें होतें. इराणी युद्धांत मिळालेल्या विजयाचा फायदा घेऊन आथेन्सनें बहुतेक ग्रीक संस्थानांची एक जूट जमविली; आणि स्वतः पुढाकार घेऊन एक प्रकारची नवीन बादशाही स्थापन केली. म्हणजे पूर्वीं प्रत्येक ग्रीक संस्थान स्वतंत्र व विसकळित होतें; पण आतां परशत्रूच्या हल्ल्यानें उत्पन्न झालेल्या अडचणींमुळें, बहुतेक संस्थानें एक झालीं, आणि त्यांचें प्रमुखपण आथेन्सला प्राप्त झालें. इराणी लोकांचा पराभव झाला तरी ठिकठिकाणीं इराणचीं ठाणीं होतीं. त्यामुळें आयोनिया वगैरे दूरदूरच्या संस्थानांस स्वतःच्या बचावासाठीं एक जूट करणें जरूर वाटलें. इराणच्या जुलमापासून ग्रीक संस्थानांचा बचाव करणें, आणि इराणी मुलखांवर ताव मारून आपली संपत्ति वाढविणें, हे ह्या जुटीचे मुख्य

उद्देश होते. डेलॉस म्हणून एक बेट होतें, त्या ठिकाणीं ह्या जुटींतील संस्थानांनीं आपला मुख्य खजिना ठेविला, आणि तेथेंच व्यवस्थापक सभाही भरूं लागली. त्यावरून ह्या जुटीस ' डेलॉसची जूट ' असें नांव पडलें.

ह्या जुटींत समुद्रकांठीं असलेलीं सर्व ग्रीक संस्थानें सामील झालीं. सर्वांनीं शक्त्यनुसार मदत करून एक मोठें आरमार तयार केलें. कित्येक संस्थानें अगदींच लहान व गरीब होतीं. त्यांस सबंध जहाजें देण्याची ऐपत नसल्यामुळें, त्यांनीं थोडीबहुत रोख रकम द्यावी असा ठराव झाला. अशा प्रकारें ह्या संस्थानांचे प्रथम दोन वर्ग झाले: एक सबंध जहाजें देणारांचा, व एक रोख रकमा देणारांचा. दुसरा वर्ग मोठा होता. ॲरिस्टायडिस म्हणून आथेन्सचा एक हुशार मुत्सद्दी होता, त्यानें ही जूट जमवून आणिली. निरनिराळ्या संस्थानांची ऐपत ठरवून, कोणी किती मदत करावी, हें त्यानेंच ठरवून दिलें, म्हणून ॲरिस्टायडिस ह्यास ह्या जुटीचा संस्थापक असें म्हणतात. ॲरिस्टायडिसबरोबर थेमिस्टॉक्लिसही तेंच काम करीत होता. ह्या दोघांनीं डेलॉसच्या जुटींत आथेन्सला प्रमुख पद मिळवून दिलें. पैशाची व आरमाराची सर्व व्यवस्था आथेन्सच्याच हातांत होती. त्यामुळें लवकरच सर्व संस्थानांचें स्वातंत्र्य हिरावून त्यांजवर आथेन्सनें आपलें स्वामित्व बसविलें. हें स्वामित्व स्थापन करणारा पुरुष सायमन होय. जुटीनें स्थापन केलेलें मोठें आरमार घेऊन त्यानें प्रथम इराणच्या ताब्यांतील कांहीं प्रदेश काबीज केले; आणि पुढें त्याच आरमाराच्या जोरावर, कित्येक ग्रीक संस्थानें जुटींत सामील होण्यास नाखुष होतीं, त्यांस जिंकिलें. येणेंकरून जुटींतील संस्थानांची संख्या दोनशेंवर झाली. इतकी शक्ति येतांच डेलॉस येथील खजिना आथेन्स येथें आणिला. तेव्हांपासून आथेन्स येथील ग्रीक बादशाहीचा आरंभ धरितात. ( इ. स. पू. ४५४ ). ह्याप्रमाणें आथेन्सची सत्ता ईज्यनसमुद्रांतील बहुतेक बेटांवर आणि थ्रेस व मासिडोनिया यांतील ग्रीक शहरांवर पसरली. हें आथेन्सचें वर्चस्व सुमारें पन्नास वर्षें टिकलें. तें फार दिवस टिकलें

नाहीं ह्याचें कारण, एकानें दुसऱ्यांच्या ताब्यांत राहवें असा मुळीं ग्रीक लोकांचा स्वभावच नव्हता. आपणास पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे असें प्रत्येक शहरास वाटत होतें. परकीय शत्रु आला असतां सर्व शहरें एकी करण्यास कबूल झालीं तरी, तो शत्रु नाहींसा होतांच, प्रत्येकास स्वतंत्रता हवीशी वाटली. आथेन्सचा दिमाख त्यांस सहन झाला नाहीं. स्पार्टा व त्याच्या लगामांतील इतर संस्थानें डेलॉसच्या जुटींत कधींच सामील झालीं नाहींत.

आथेन्सची ही वाढती सत्ता स्पार्टास खपली नाहीं. त्या दोघांत युद्ध जुंपलें; पण पांच वर्षेपावेतों तह होऊन तें थांबलें. सायमनची शिक्षा रद्द होऊन तो परत आला होता, तो ह्या वेळेस मरण पावला; आणि तहाचीं पांच वर्षें भरण्यापूर्वीं आथेन्स व स्पार्टा ह्यांजमध्यें पुनः समुद्रावर युद्ध जुंपलें. त्याचें कारण असें झालें कीं, डेल्फायचें देऊळ व त्यांतील देवाची सर्व मालमत्ता संभाळण्याचें काम डेल्फाय येथील लोकांच्या हातांत होतें. देवपूजेचें कामही तेथच्याच कित्येक मोठमोठ्या कुटुंबांकडे वंशपरंपरेनें चालू होतें. डेल्फाय शहर फोसिस संस्थानाच्या ताब्यांतलें असून, फोसिसचे अधिकारी डेल्फायच्या मंदिरांतील वरील हक्कांकरितां भांडूं लागले. ह्या भांडणांत आथेन्सनें फोसिसला मदत केली. इकडे स्पार्टानें डेल्फायचा पक्ष स्वीकारिला, व सर्व मंदिर परत तेथील लोकांच्या ताब्यांत दिलें. स्पार्टानें केलेल्या ह्या मदतीबद्दल डेल्फायच्या लोकांनीं स्पार्टाला असा एक हक्क दिला कीं, ज्या वेळेस पुष्कळ संस्थानांचे वकील भविष्य वर्तविण्यास येतील, त्या वेळेस स्पार्टाचा कौल सर्वांच्या अगोदर लावावा. डेल्फायच्या लोकांनीं ह्या हक्काचा मजकूर एका दगडी खांबावर खोदून ठेविला. पुढें स्पार्टाच्या फौजा परत गेल्या, तेव्हां पेरिक्लीज आथेन्सची फौज घेऊन डेल्फायवर चालून आला. त्यानें डेल्फायचें मंदिर काबीज करून, तेथचे सर्व हक्क फोसिसच्या लोकांस दिले; आणि प्रथम कौल घेण्याचा हक्क आथेन्सचा ठरवून, तो, स्पार्टाचा हक्क ज्या खांबावर खोदला होता त्याच खांबावर खोदून ठेविला. हें एक कारण आथेन्स व स्पार्टाच्या

वैमनस्यास झालें, व आणखीही कित्येक कारणें झालीं. त्यामुळें युद्ध जुंपून तें तीन वर्षं चाललें. त्यांत स्पार्टाचा जय होऊन अनेक अटी कबूल करून आथेन्सला तह करणें प्राप्त झालें. इ. स. पू. ४४५ ह्या वर्षी दोघांचा तीस वर्षंपावेतों सलोख्याचा तह ठरला.

इ० स० पू० ४६० पासून ४३० हीं तीस वर्षं पेरिक्लीजच्या कारभाराचीं म्हणून प्रसिद्ध आहेत. पेरिक्लीजचा लौकिक फार मोठा आहे. त्या वेळच्या सर्व मुत्सद्यांत पेरिक्लीज अग्रगण्य असून त्याची राज्यकारभार करण्याची कुशलता, त्याची विद्वत्ता, व आथेन्स येथें मोठमोठीं कामें करून त्यानें केलेली सुधारणा, ह्यांविषयीं त्याची मोठी ख्याति आहे. त्यानें सर्व सुधारणा लोकांच्या पैशांतूनच केल्या, व लोकांनीं खर्च करण्यास नाखुषी दाखवूं नये म्हणून सार्वजनिक पैशांतून गरीबांस अन्न व करमणुकीचीं साधनें करून दिलीं. त्यानें सार्वजनिक सणांची संख्या वाढविली; नाटकगृहें दररोज खुलीं ठेविलीं; व ज्यांस नाटकाचें तिकीट घेण्याची ऐपत नव्हती, त्यांस सरकारी खजिन्यांतून पैसा देण्याची त्यानें सोय केली. तसेंच कोर्टांत लोकांस जूरर नेमीत, त्यांस कामाच्या दिवसांचा पगार देण्याचा पेरिक्लीजनें ठराव केला. येणें करून तो फार लोकप्रिय झाला. दुसरा एक कायदा पेरिक्लीजनें असा केला कीं, ताब्यांतील संस्थानांचे सर्व खटले शेवटीं निकालास आथेन्स येथें यावे. त्यायोगें आथेन्सचें काम आणि महत्त्व फार वाढलें.

जुटींतील संस्थानांकडून आथेन्सला करभार येत असे, तो पेरिक्लीजनें वाढविला. पूर्वी तो ४६० टॅलॅंट म्हणजे २३ लक्ष रुपये होता, तो आतां ६०० टॅलॅंट म्हणजे ३० तीस लक्ष रुपये झाला. अशा रीतीनें ज्यास्त आलेला पैसा खर्च करून त्यानें आथेन्स येथें मोठमोठे सुंदर वाडे बांधिले, आणि दुसरीं कलाकौशल्याचीं कामें तयार केलीं. सायमननें सुरू केलेले लांब तट पेरिक्लीजनें पुरे केले; इराणी लोकांनीं पाडिलेलीं देवळें दुरुस्त केलीं, आणि नवीन भव्य मंदिरें बांधिलीं, त्यांपैकीं पार्थिनॅान नांवाचें आथिनी देवीचें मंदिर विशेष प्रसिद्ध आहे. तें किल्ल्याच्या आंत शहराचे मध्यभागीं होतें.

त्यांतील कित्येक कसबाचीं कामें अत्यंत प्रेक्षणीय होतीं. त्यावर फिडियास नांवाचा मुख्य कारागीर असून त्यानें केलेले कित्येक पुतळे हल्लीं ब्रिटिश म्यूझियममध्यें आहेत, तेथें त्यांस 'एल्जिन आरसपान' असें नांव आहे. आथिनी देवीचा पुतळा सुमारें ४० फुट उंच, हस्तिदंताचा व सोन्याचा केलेला होता: म्हणजे मूळ सर्व पुतळा लांकडी करून, त्यावर सर्वत्र हस्तिदंत जडवून वस्त्राचे भाग सर्व सोन्याचे केलेले होते.

ह्याशिवाय प्रोपिली (Propylæ) व ओडियम (Odeum) हीं दोन उत्कृष्ट कामें पेरिक्लीजचीं आहेत. किल्ल्यांत जाण्याचा रस्ता होता, त्याच्या दोहों बाजूंस भिंतीवर खोदीव नक्शीचें व चित्रांचें काम केलेलें होतें; व आंत शिरण्याच्या मुख्य द्वाराला पांच मोठाले धातूचे दरवाजे व सहा आरसपानी भव्य खांब होते. ह्या रस्त्याला प्रोपिली असें नांव होतें. ओडियम म्हणून एक सुंदर व भव्य नाटकगृह असून, त्यांत लोकांच्या करमणुकीसाठीं गायनाचे समारंभ होत असत. ह्या इमारतींच्या योगानें शहरांतील सुतार, लोहार, सोनार, गंवडी, पाथरवट म्ह० पुतळे खोदणारे, चित्रकार वगैरे अनेक प्रकारच्या कारागिरांस मुबलक काम मिळालें.

प्निक्स म्हणून एक खुली जागा होती तेथील भव्य इमारतींत लोकनियुक्त सभेची कचेरी भरत असे. ती शहरांतील आगोरा नांवाच्या मुख्य चौकाजवळ होती. रोमचें जसें फोरम तसें आथेन्सचें आगोरा, म्हणजे शहरचा मुख्य चौक होय. ह्या सभागृहाची बांधणी वर्तुलाकार असून त्यांतील एका बाजूस न्यायाचीं कोर्टें असत. सभेचा मुख्य दिवाणखाना पांचशें सभासद बसण्यास पुरेसा होता. प्निक्सच्या पाठीमागें मूळचेंच एक लांबच्या लांब दगडी टेंकाड असून, त्यामुळें त्याच्या एक बाजूचा बंदोबस्त झाला होता. इमारतीच्या मध्यभागीं दगडांत कोरलेलें उंच व्यासपीठ होतें, त्यावर चढण्याच्या पायऱ्याही दगडांतच कोरून केलेल्या होत्या. जेव्हां सभेंत बोलण्याचा कोणास प्रसंग येई, तेव्हां त्यानें त्या पायऱ्या

चढून व्यासपीठावर जाऊन बोलावें असा निर्बंध होता. ह्यामुळें सार्वजनिक प्रश्नांची चर्चा सर्व लोकांस कळे, व सर्व लोक आपले हात उचलून मतें देत.

आथेन्स व स्पार्टा ह्यांजमधील मागें सांगितलेला तह होऊन सुमारें चौदा वर्षे झालीं; तोंच त्यांजमध्यें पुनरपि भांडणें उपस्थित झालीं, त्यामुळें पुनः युद्ध सुरू झालें.

---

## प्रकरण नववें.

## पेरिक्लीजच्या वेळच्या ग्रीक लोकांच्या रीतिभाती.

( इ. स. पू. ४८०–४३१ ).

इराणी युद्धानंतर ग्रीक लोकांची घरें बांधण्याची पद्धत पुष्कळ बदलली. खासगी घरें विस्तृत व मोठीं होऊन, सार्वजनिक इमारती भव्य व सुंदर बनूं लागल्या. देवळांच्या सभोंवार उंच खांबांचे व कमानीचे नकशीदार कठडे होऊन, खालीं लोकांस बसण्याकरितां बांकांसारखे दगडी ओटे बांधण्याचा प्रघात पडला. चहूंकडे रंगित चित्रांनीं शोभा आणीत असत. ह्या ठिकाणीं विश्रांतीच्या वेळीं सर्व प्रकारचे लोक जमत व विद्वान लोक येऊन व्याख्यानें देत.

ग्रीक लोक आपलीं घरें दगड, विटा व लांकडें ह्यांचीं बांधीत. तळमजल्यावर सर्व लोक राहत. वरती एक लहानसा माळा नोकर लोकांसाठीं व गुलामांसाठीं करीत; त्याचे जिने घराच्या बाहेरून असत, दरघरास दोन भाग असत, एक बायकांचा व दुसरा पुरुषांचा. मोठमोठ्या घरांस रस्त्यापासून आंत येण्यास एक बोळ ठेविलेला असे. तोंडाशींच एक दरवाजा असे, त्यांतून बोळानें आंत गेल्यावर पुरुषांचा उघडा चौक लागे. ह्या चौकांत देवपूजा व अग्निपूजा होत असे. ह्या चौकाभोंवती पुरुषांच्या राहण्याच्या खोल्या असत; त्यांत मेजवानीचें दालन, माजघर, वाचनगृह, चित्रगृह व बसण्या-

निजण्याच्या खोल्या, अशा जागा असत. चौकाचे आंत येण्याच्या दारासमोर पलीकडेस दुसरें दार असे, त्यांतून आंत गेल्यावर बायकांचा चौक लागे. त्याचे सभोंवार स्त्रियांच्या जेवणाच्या व काम करण्याच्या खोल्या असत. ह्या खोल्यांस दरवाजे नव्हते. दारांवर नुसते पडदे लावीत; व धन्याच्या ऐपतीप्रमाणें हे पडदे भारी किंमतीचे व कशिद्याचें काम केलेले असत. ही सामान्यतः श्रीमंतांच्या घरांची ठेवण झाली. पण सामान्य व गरीब लोकांचीं घरेंही ह्याच फर्म्याचीं असत; मात्र त्यांतील खोल्या थोड्या व बांधणी साधी असे.

ग्रीक लोकांच्या घरांत बैठ्या चुली होत्या, कीं विलायती चालीच्या चिमण्यांच्या चुली होत्या, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. खोलात गरमावा येण्याकरितां शेगडींत निखारे घालून ती आंत ठेवीत. आथेन्स येथील बहुतेक मोठमोठ्या लोकांचे हवा खाण्याचे बंगले खेड्यांतून असत. त्या बंगल्यांच्या सभोंवार बागा असून, त्यांत पुतळे व दुसरे ऐषआरामाचे पदार्थ ठेवलेले असत. मुख्य खोल्यांची जमीन लहान लहान दगडी तुकडे बसवून शोभिवंत केलेली असे. वरील छतें आरंभीं फक्त पांढऱ्या रंगाचीं असत. पुढें पुढें भिंती व छतें रंगविण्याचा प्रघात पडला.

आथेन्स शहरांत उतारूंच्या जागा पुष्कळ होत्या. तेथें बाहेरचे व्यापारी व इतर कामासाठीं येणारे लोक भाड्यानें राहत. कोर्टी-तील सेशनच्या प्रसंगीं व सार्वजनिक समारंभांच्या वेळेस आथेन्स शहरांत बाहेरचे लोक अतोनात येत, त्यामुळें घरवाल्या लोकांस चांगली किफायत होई; व पुष्कळ लोक भाड्याचीं घरें बांधण्यांत आपला पैसा घालीत.

आथेन्स शहरांत परकी लोकांचा भरणा बराच मोठा असे. हे बहुतेक लोक इतर ग्रीक संस्थानांतून येत असत. ह्या लोकांस आथेन्स शहरांत घर बांधण्याची किंवा जमीन घेण्याची मनाई असे, अशा बाहेरच्या लोकांस आथेन्सच्या लोकांशीं व्यापार

वगैरे करणें झालें तर, त्यांस आथेन्सचा रहिवाशी असलेला एखादा इसम जामीन म्हणून द्यावा लागे; व जामीन राहण्याबद्दल ह्या बाहेरच्या व्यापाऱ्यांकडून तो नफ्यावर शेंकडा कांहीं ठरीव रक्कम स्वतःला मागून घेत असे. बाहेरून आलेल्या अशा प्रत्येक कुटुंबाला दरसाल बारा ड्रॅक्मा (Drachmae) सरकारास कर द्यावा लागे; तसेंच, आथेन्सच्या रहिवाशांप्रमाणें त्यांस आथेन्सच्या लष्करांत किंवा आरमारांत नोकरी करावी लागे, आणि सार्वजनिक सणांच्या दिवशीं कांहीं ठरीव कामें करावीं लागत. ह्या गोष्टी त्यांनीं न केल्यास, आथेन्सकडून त्यांचें संरक्षण न होतां त्यांस गुलाम म्हणून विकण्याचा आथेन्सच्या सरकारास अधिकार होता.

ग्रीक लोक मोठे शोकीन असत. ज्यांस सामर्थ्य असे ते मोठ्या थाटानें राहत. त्यांच्या भोजनाच्या जागेंत मऊ गाद्यांचे कोच असत. व त्यांवर पडल्या पडल्या ते भोजन करीत. रोमन लोकांचें रात्रीचें भोजनही पुढें अशाच प्रकारें होऊं लागलें. आथेन्सच्या लोकांस मंडळीचा मोठा शोक असून, श्रीमंतांच्या घरीं हरहमेश मोठ्या मेजवान्या होत. वाढदिवसानिमित्त मोठी मेजवानी देण्यांत येई. कार्यप्रसंगीं पाहुण्यांचे बूट काढून त्यांचे हातपाय धुणें वगैरे कामें करण्यासाठीं गुलाम ठेविलेले असत.

ग्रीक लोकांचें भोजन रोमन लोकांच्या इतकें चैनीचें नसे. तथापि ग्रीस देशांत सूपशास्त्राचा अभ्यास बराच वृद्धिंगत झाला होता. मेजवानीच्या प्रसंगीं लोक शिकलेले स्वयंपाकी आणीत. सिसिली बेटांतील आचाऱ्यांचा लौकिक मोठा असे. जेवणास बहुधा सूप, शिकार, कोंबडी व मिठाई इतके पदार्थ असत. जेवण संपलें म्हणजे आंचवण्यासाठीं प्रत्येकापुढें पाणी आणून देत. ते हातानेंच जेवीत, म्हणून जेवल्यानंतर हात धुतल्याशिवाय चालत नसे. आंचवल्यानंतर सुगंधी अत्तरें व फुलांचे हारतुरे वांटीत. एवढें झाल्यावर मग मद्यप्राशनाचा विधि चाले. दारूचा एक मोठा लोटा भरून पुढें आणीत; त्यांतील थोडा अंश देवास नैवेद्य म्हणून

जमिनीवर ओतीत; नंतर तें भांडें प्रत्येकापुढें नेत; व मर्जीप्रमाणें लोक त्यांतील मद्य पीत. हा विधि आटपल्यावर पाव्याच्या तालावर ईशस्तवन चाले.

रात्रीं भोजनोत्तर मद्यपान, गाणें, नाच, खेळ वगैरे सडकून चालत. मद्याबरोबर फळफळावळ व मेवाही असे. मद्यांत नेहमीं पाणी मिसळीत व बर्फ घालून घेत. मद्यपान करितांना थोडेंबहुत भाषण करून एकमेकांचें आरोग्य इच्छिण्याचा प्रघात होता. आथेन्स येथें दारू फार स्वस्त असे, म्हणून मोठी मेजवानी करण्याची ज्यांना शक्ति नसे, ते आपल्या स्नेही मंडळीस मद्यपान-समारंभास तरी बोलावीत. अशा समारंभांत लोक बहुधा मोठमोठ्या कोचावर पडून पान करीत; व यजमान त्यांच्या गळ्यांत पुष्पहार घालीत. त्या प्रसंगीं करमणुकीकरितां गाणारणी व नाचणारणी बाया पैसे देऊन आणीत. सर्व करमणुकीवर देखरेख ठेवणारा एक संगीत-वेत्ता असे. तो सांगेल तितकें मद्यप्राशन प्रत्येकास करावें लागे. 'प्या नाहींतर चालते व्हा,' असा शिरस्ता असल्यामुळें ह्या मद्यप्राशनाच्या समारंभांत गोंधळ व गोंगाट उडाल्याखेरीज राहत नसे.

समारंभ चालू असतां जमलेले लोक अनेक प्रकारच्या मौजा करीत. उदाहरणार्थ, एखाद्या अविवाहित गृहस्थास मद्यानें भरून एक प्याला देत; व समोर एक लहानसें दुसरें भांडें रिकामें ठेवीत; आणि दूर उभें राहून प्याल्यांतील दारू बाहेर न सांडतां त्या भांड्यांत ओतण्यास त्यास सांगत. ही दारू ओततांना त्याच्या प्रीतिपात्र स्त्रीचें नांव घेण्यास त्यास सांगत. जर सर्व दारू बरोबर भांड्यांत गेली व बाहेर सांडली नाहीं, तर ह्या उभयतांचें लग्न जुळेल, पण जर दारू बाहेर पडली तर हें लग्न जुळावयाचें नाहीं, असा समज होता. उखाणे घालण्याची व कोडीं विचारण्याची दुसरी एक मौज होती. ज्याचें उत्तर बरोबर येई त्यास कांहीं खाऊ बक्षीस देत; पण ज्याचें उत्तर चुके त्यास दारू आणि मिठाचें पाणी पाजीत, त्यामुळें मोठी गंमत उडे.

ह्यांशिवाय बुद्धिबळांसारखे दुसरे नाना प्रकारचे खेळ प्रचारांत होते.

ग्रीस देशांत तरुण लोक हरहंमेश वनभोजनें करीत. प्रत्येकानें आपली शिदोरी आणावी, किंवा प्रत्येकानें वर्गणीचे पैसे देऊन, एकानें सर्व व्यवस्था करावी; अशा रीतीनें पुष्कळ लोक बाहेर जाऊन वनभोजनें करीत.

आथेन्सच्या बाजारांत सर्व कांहीं मिळे. लोक स्वतः बाजारांत जाऊन जिन्नस खरेदी करीत. बाजारांत भाकर विकत मिळे. श्रीमंत लोक गव्हांची भाकर घेत. गरीबांकरितां जवसाची भाकर मिळत असे. भाकर विकणाऱ्या बाया असत. सौद्याच्या वेळेस त्यांचा मोठा गोंगाट चाले. मांसाहारांत डुकराचें मांस सर्वसामान्य असे. त्याचप्रमाणें साधी किंवा खारी मासळीही ग्रीक लोक पुष्कळ वापरीत. घेवड्या, वालपापडी, कोबी, पालेभाज्या भोंपळे, इत्यादि भाज्या त्या वेळीं प्रचारांत होत्या. बाजारांत देखरेख ठेवणारे अधिकारी असत, ते बंदोबस्त ठेवीत, व लबाडी होऊं देत नसत; तथापि वाणी लोक लबाडी केल्याशिवाय राहत नसत.

ग्रीक लोकांत दररोज तीन जेवणें असत. सकाळच्या पहिल्या जेवणास दारूंत शिजविलेली भाकर असे. कोर्ट सुटल्यावर दुपारीं थोडा अल्पाहार होऊन, संध्याकाळीं सूर्यास्तानंतर मोठें जेवण होई. ताटें, बशा, प्याले वगैरे भांडीं बहुधा मातीचीं असत; तरी श्रीमंतांच्या घरीं चांदी सोनें व कांसें ह्यांचीं भांडीं वापरीत. कुंभारांची वस्ती मोठी असून त्यांजकरितां शहरांत एक निराळाच भाग तोडून दिलेला होता. आथेन्स येथील मातीच्या भांड्यांची सर्व ग्रीस देशांत मोठी ख्याति होती. भांड्यांचा रंग लाल, सफेत, व पिवळसर असून कित्येक उंची भांड्यांवर काळें रोगण चढविलेलें असे.

चादरी, पांघरुणें, कांबळ्या व दुसरीं नाना प्रकारचीं कापडें आथेन्स येथें पुष्कळच तयार होत. शहरांत कापडाचा बाजार म्हणून वेगळाच होता. कोष्टी बहुधा गुलाम असत. ज्या ग्रीक शहरांत मोठा व्यापार असे, तेथील सर्व प्रकारच्या कारागिरीचीं व कोष्टीलोकांचीं कामें गुलामांकडून करवीत. गुलामांचे मोठमोठे धनी

असत. दरएक गुलामास कांहीं तरी काम करून दररोज कांहीं ठरीव रक्कम आपल्या धन्यास आणून द्यावी लागे. तसेंच गुलामांचे मालक आपले गुलाम, खासगी लोकांचीं किंवा सरकाराचीं कामें करण्याकरितां भाड्यानें देत असत.

गुलामांचे मोठमोठे लिलांव होत. ज्यांस कांहीं कसबाचें काम येत असे, त्यांची किंमत मोठी येई. प्रसिद्ध वक्ता डेमॉस्थेनिस ह्याच्या बापाजवळ तरवारी तयार करणारे कारागीर २० व बग्या करणारे सुतार २० होते; ही मोठीच जिंदगीची बाब समजत. सरकारही लहान मुलगे विकत घेऊन त्यांस शिक्षण देऊन, कारकून, चोपदार व दुसरे लहान लहान नोकर तयार करी. हे जरी पुढें गुलाम म्हणूनच समजले जात, तरी त्यांचा दर्जा व अधिकार बरेच मोठे असत. घरांत सर्व नोकर गुलामच असत. प्रत्येक कुटुंबांत कांहीं गुलाम खरेदी केलेले व कांहीं कुटुंबांतच जन्मलेले असत. आपल्या ताब्यांतील प्रत्येक गुलामाबद्दल धन्याला सरकारास कांहीं कर द्यावा लागे. केव्हां केव्हां हे मालक आपल्या गुलामांस गुलामगिरींतून मुक्त करून स्वतंत्रता देत. मात्र अशा रीतीनें स्वतंत्र झाल्यावर धन्यानें सरकारास द्यावयाचा कर स्वतंत्र झालेल्या गुलामाला भरावा लागे.

ग्रीस देशांतील प्रत्येक कुटुंबांत मुलांस संभाळण्याकरितां शिकलेला गुलाम ठेविलेला असे. ह्यास पंतोजी म्हणजे पेडागोगो म्हणत. त्याचें काम मुख्यत: मुलांच्या वर्तनावर नजर ठेवण्याचें व त्यांस वाईट संगत न लागूं देण्याचें असे. तो नेहमीं मुलांबरोबर बाहेर जाई; व मुलें शाळेंत गेलीं तरी त्यांजबरोबर तो शाळेंत जाई. शाळेंत मुलांस व्याकरण, गाणें, व कसरत हे विषय शिकवीत.

पेरिक्लीजच्या वेळेस ग्रीक देशांत अनेक ग्रंथकार निपजले, त्यांत सोफोक्लीज व एश्चिलस ह्या नाटककारांची विशेष प्रसिद्धी आहे. रंगभूमीवर येऊन नाटकें करण्याची रीति त्या वेळीं फारशी प्रचारांत नव्हती. जे कवी नाटकें लिहीत, तेच स्वत: रंगभूमीवर आपले खेळ करून दाखवीत. मोठमोठे नामांकित ग्रंथकार रंगभूमीवर येत असत. बॅकसच्या उत्सवांत अशा नाटकांस सुरुवात झाली. प्रथमत: थोडी

गाणार मंडळी बरोबर घेऊन एकच इसम रंगभूमीवर येई; व मर्दांनी गाण्यांत एखादें आख्यान म्हणून दाखवी. पेरिक्लीजच्या वेळेपासून दोन तीन पात्रांचीं संभाषणाचीं आख्यानें प्रचारांत आलीं. त्यांत स्त्रियांचे पार्ट पुरुषच करीत. ह्या खेळांस 'दुःखपर्यवसायी नाटकें' असें नांव मिळालें. हळू हळू हास्यरसप्रधान खेळ व तमाशे सुरू झाले. ह्या तमाशांत तत्कालीन रीतीभातींवर हास्यकारक टीका केलेली असे. त्यांची उत्पत्ति बॅकसच्या उत्सवांत मद्यपानाच्या समारंभामुळें झाली. त्या समारंभांस कोमस (Comus) म्हणजे तमाशे करणारी गंमतीची तरुण मंडळी असें नांव होतें. ते सोंगें घेऊन व बुरखे घालून गांवोगांव फिरत; आणि नाच व गाणें करून लोकांस गंमत करून दाखवीत. शोकपर नाटकांतील गायक मंडळीस कोरस म्हणतात, आणि आनंदपर नाटकांतील गायक मंडळीस कोमस म्हणतात.

बायका बहुधा नाटकास जात नसत. त्यांचा बहुतेक वेळ घरांत जाई. त्या पडद्यांत असल्याप्रमाणें घरांत राहत. त्यांस शिक्षण देऊन विद्वान करण्याचा प्रघात नव्हता. तथापि कांहीं स्त्रिया मोठ्या विद्याविभूषित व सुसंस्कृत असत. उत्सवप्रसंगीं विद्वान लोकांच्या परीक्षा होऊन बक्षिसें वांटीत, त्यांत कधीं कधीं स्त्रिया पुढें येत असत. पेरिक्लीजची बायको आस्पेशिया मोठी विदुषी होती. त्या वेळच्या मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांचा व विद्वानांचा तळ तिच्या घरीं असे. सर्व प्रकारचे बुद्धिमान व सुसंस्कृत लोक आस्पेशियाची ओळख करून घेण्यास झटत असत.

पेरिक्लीज व आथेन्सची भरभराट समकालीन आहेत. पेरिक्लीजसारखे पुरुष थोडेच होतात. त्याचा अंतकाळ दुःखांत गेला. त्याचे दोन मुलगे प्लेगनें मेले; व त्याजवर लांच खाल्याचा आरोप येऊन, त्याचा छल झाला. तो इ. स. पू. ४२९ त मरण पावला. 'माझ्या कृत्यामुळें कोणाही आथेन्सच्या गृहस्थास दुःख करण्याचा प्रसंग आला नाहीं,' हे त्याचे शेवटचे शब्द होते. असा बाणा कितीसे सत्ताधारी पुरुष बाळगूं शकतील बरें!

# प्रकरण दहावें.

## पेलापोनेसियन युद्ध.

( इ० स० पू० ४३१–४२१. )

आथेन्सची सत्ता व संपत्ति वाढून जी जोराची भरभराट झाली तिजमुळें स्पार्टाला अत्यंत वैषम्य वाटलें. स्पार्टानें कांहीं तरी कुरापत काढून तीस वर्षांचा तह मोडिला; डेल्फायचा कौल घेऊन युद्धाचा निकाल आपणास फलद्रूप होईल असें आश्वासन देवीकडून मिळविलें; आणि खालीं लिहिलेलीं कारणें दाखवून आथेन्सला युद्धास पाचारण केलें.

बिओशिया संस्थानांत प्लॅटिया नामक शहर होतें, तें आथेन्सच्या ताब्यांत होतें. प्लॅटियाच्या बहुतेक लोकांस आथेन्सचा अंमल पसंत होता. पण कांहीं थोडे लोक आथेन्सच्या विरुद्ध होते. त्यांनीं आथेन्सचा ताबा झुगारून देऊन थीब्सच्या ताब्यांत जाण्यासाठीं एक गुप्त कट केला. थीब्सच्या सरकारानें ह्या कटास उत्साहपूर्वक मदत केली. थीब्सचे दोन सेनापति कांहीं फौज बरोबर घेऊन एका रात्रीं प्लॅटिया शहरांत आले. शहराचे दरवाजे त्यांजकरितां उघडे ठेवण्याची अगोदरच तजवीज झालेली होती. ते मुख्य बाजारांत आले. तेथें कटवाले त्यांस येऊन मिळाले. नंतर त्यांनीं स्वतंत्रता देवीचा मोठ्यानें जयघोष केला. त्यांस वाटत होतें कीं, अशानें पुष्कळ लोक येऊन आपणास मिळतील. पण तसें कांहीं झालें नाहीं. नगरवासी लोक सशस्त्र होऊन बाहेर आले. त्यांनीं प्रथम शहराचे दरवाजे बंद करून थीबन लोकांवर हल्ला केला; व बहुतेकांस ठार मारून बाकीच्यांस कैद केलें. हा प्रकार स्पार्टाला आवडला नाहीं. स्पार्टाची व थीब्सची दोस्ती होती, व थीब्सचा अपमान तो आपलाच अपमान असें स्पार्टाला वाटलें. तेव्हां स्पार्टाला दुखवूं नये म्हणून, थीबन कैद्यांस चांगल्या रीतीनें वागवावें असा निरोप आथेन्सच्या सरकारानें प्लॅटियाकडे

पाठविला. पण निरोप घेऊन येणारे वकील येऊन पोंचण्यापूर्वीच थीब्रन वैद्यांचा प्लॅटियन लोकांनीं शिरच्छेद केला होता. त्यामुळें इ. स. पू. ४३१त स्पार्टानें आथेन्सशीं युद्ध सुरू केलें.

स्पार्टा व आथेन्स हीं ग्रीस देशांत दोन मुख्य संस्थानें असल्यामुळें, इतर सर्व संस्थानें ह्या दोघांपैकीं कोणा एकाच्या तरी लगामीं असत. म्हणून त्या बहुतेकांस ह्या युद्धांत सामील होणें भाग पडलें. स्पार्टाचा अंतस्थ उद्देश आथेन्सचा पाडाव करून स्वतःचें वर्चस्व ग्रीस देशांत स्थापावें असा होता. पण स्पार्टानें हा उद्देश बाहेर न दाखवितां, आपण ग्रीक लोकांची स्वतंत्रता कायम राखण्यासाठीं झगडत आहों, असा पुकारा केला. त्यामुळें स्पार्टाचा पक्ष बहुतेकांस आवडूं लागला. आर्किडेमस नांवाचा स्पार्टाचा एक राजा मोठी फौज घेऊन ॲटिका प्रांतांत शिरला.

स्पार्टन लोकांशीं तोंड देऊन उघड सामना केला असतां, आथेन्सचा टिकाव न लागतां पराभव होईल असें पेरिक्लीजला वाटलें. म्हणून खेड्यांतील सर्व लोकांनीं आपलीं सर्व मुलेंमाणसें व संपत्ति घेऊन शहरांत येऊन राहवें असा पेरिक्लीजनें हुकूम सोडिला. पुष्कळांचीं सुंदर घरें व मोलवान बागबगीचे बाहेर होते, ते सोडून देऊन शहरांत येणें त्यांच्या जिवावर आलें. तरी पण सर्व लोक ताबडतोब शहरांत आले, आणि त्यांनीं आपलीं बाहेरचीं घरें ह्या क्रूर शत्रूस उघडीं करून दिलीं. कित्येकांनीं आपले बंगले पाडून टाकिले, तट जमीन दोस्त केले, व शेतेंही न नांगरतां सोडून दिलीं. त्यांनीं आपलीं गुरेंढोरें मात्र शेजारच्या बेटांत पाठवून दिलीं. ह्याप्रमाणें बाहेरची लोकवस्ती सर्व मालमत्ता घेऊन शहरांत आल्यामुळें तेथें अतिशय गर्दी झाली; लोकांस राहण्यास जागा मिळेना; कांहीं देवळांतून राहिले; कांहीं तटांतील बुरुजांत राहिले, व जराशी रिकामी जागा दिसली कीं, लगेच तेथें बरें वाईट घर उभारून कित्येकांनीं गुजरण केली.

ह्यामुळें पुष्कळ श्रीमंत लोक भिकारी झाले. सर्वांवरच मोठें संकट ओढवलें. तरी सर्वांनीं कंबर बांधून युद्धाची तयारी केली. थोड्याच वेळांत आथेन्सनें एक मोठें आरमार युद्धाकरितां तयार केलें. आर्थानियन लोकांची भिस्त आरमारावर होती, लष्करावर तितकी नव्हती.

आर्किडेमस ॲटिकाचा सुपीक व सुंदर प्रदेश जाळून लुटून फस्त करीत आथेन्सपासून सहा मैलांवर आला. आथेन्स येथील लोकांचें मत किल्ल्यांतून एकदम बाहेर पडून आर्किडेमसशीं लढावें असें होतें; पण पेरिक्लीजचें मत निराळें असल्यामुळें, त्यानें फक्त स्वारांच्या लहान लहान टोळ्या पाठवून, स्पार्टन टोळ्या मुख्य फौज सोडून लुटीसाठीं दूर जात, त्यांजवर छापे घालण्याचा क्रम चालविला. ह्याप्रमाणें एकसारख्या झटापटी चालू होत्या. पण समोरासमोर मोठी लढाई अशी झाली नाहीं. पुढें हिंवाळा आल्यामुळें स्पार्टन फौज स्वदेशीं परत गेली.

युद्धांत पडलेल्या शूर गृहस्थांचा अंत्यविधि मोठ्या समारंभानें करण्याची चाल आथेन्स येथें होती, ती ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. पतन पावलेल्या सर्व मंडळींचीं प्रेतें एका मोठ्या मंडपांत जमवीत; त्या ठिकाणीं मृतांचे नातेवाईक व दोस्त जमत. पुढें दहा जातींकरितां दहा मोठ्या पेट्या करीत; व दरएक जातीचीं प्रेतें एक एका पेटींत घालीत; मग त्या पेट्या गाड्यांवर घालून त्या मोठ्या समारंभानें पुरण्याचे जागीं नेत. ज्यांचीं प्रेतें सांपडत नसत, त्यांजकरितां रिकामी तिरडी नेण्यांत येई. मृतांचे नातेवाईक सर्वांपुढें चालत व त्यांच्यामागें शहरांतले सर्व नामांकित लोक जात. प्रेतविधि करितांना कोणी तरी वक्ता स्मशानांत भाषण करून, मयताच्या गुणांचें वर्णन करीत असे. पेरिक्लीजनें असें भाषण केलें होतें. मृतांचीं मुलें वयांत येईपर्यंत त्यांचा संभाळ सरकार करीत असे, व ती वयांत आल्यावर त्यांस एक एक चिलखत बक्षीस देऊन त्यांचा सन्मान करीत.

दुसऱ्या वर्षीं स्पार्टन फौजा पुनः ॲटिकावर आल्या. त्या वर्षीं आथेन्स येथें प्लेग सुरू झाला आणि तो बाहेरच्या भागांतही पुष्कळ पसरला. अशा संकटसमयीं आथीनियन सरकारानें स्पार्टाशीं तहाचें बोलणें लाविलें; पण तें स्पार्टानें मान्य केलें नाहीं. आर्चिडेमसची फौज ॲटिका प्रांतांत धुमाकूळ उडवीत असतां, तिकडे आथेन्सच्या आरमारानें पेलापोनेसस प्रांतावर हल्ला केला, आणि स्पार्टन लोकांचा चांगलाच सूड घेतला.

युद्धास तिसरें वर्ष लागलें, तेव्हां पेरिक्लीज मरण पावला. पेरिक्लीज फार शहाणा व हुशार होता; म्हणून त्याच्या मृत्यूनें आथेन्सचें फार नुकसान झालें. त्याच्यासारखा कारभार हांकणारा दुसरा हुशार गृहस्थ आथेन्सकडे नव्हता. हें युद्ध सर्व ग्रीस देशभर ज्यास्त ज्यास्तच पसरत चाललें होतें. दोनही पक्षांस मोठा त्वेष चढला असून, हातांत जिवंत सांपडलेल्या लोकांचे हाल करण्यांत दोघांनींही क्रूरपणाची कमाल केली. सबंध शहराचे लोक तलवारीनें कापून काढावे किंवा गुलाम म्हणून विकावे, असा सपाटा चालला. प्लॅटिया शहर स्पार्टन फौजेनें काबीज केलें, तेव्हां त्यांनीं तेथील लोकांची वर सांगितल्याप्रकारची गत केली. प्लॅटिया शहर थीबन प्रांतांत सामील करून तेथचा सर्व मुलूख थीबन लोकांस लागवडीसाठीं दिला.

आथेन्सच्या ताब्यांतील पुष्कळ संस्थानांनीं बंडें केलीं; तेव्हां त्यांस आथेन्सच्या लोकांनीं क्रूरपणानें जबर शिक्षा केल्या. कांहीं ठिकाणीं सबंध तटबंदी पाडून टाकणें, कांहींचीं जहाजें जप्त करणें व कांहींची राज्यपद्धति मोडून टाकणें, असले प्रकार चालले. कित्येक लहान लहान जातींच्या सबंध ग्रीक जमातीस बहिष्कार घालण्यांत आले.

आथेन्स येथें आलेला प्लेग सात वर्षें चालला. शेवटीं दोनही पक्षांस लढण्याचा कंटाळा येऊन त्यांनीं पन्नास वर्षें पावेतों टिकणारा तह

केला ( इ. स. पू. ४२१ ). त्यांत असें ठरलें कीं, दोनही पक्षांनीं एकमेकांचे जिंकलेले मुलूख परत द्यावे, व उभयतांनीं पकडलेले कैदी सोडून द्यावे. ह्यांशिवाय आणखी कांहीं किरकोळ कलमें होतीं. सर्व देशभर एवढा रक्तपात व नासधूळ झाली, पण त्यांचे बदल्यांत म्हणण्यासारखा फायदा एकाही पक्षास झाला नाहीं.

ह्या तहास निसियासचा तह असें म्हणतात. निसियास हा त्या वेळीं आथेन्सचा मुख्य सेनापति असून त्यानें हा तह केला होता.

---

# प्रकरण अकरावें.

## आल्सिबियाडीज.

( इ. स. पू. ४२०–४०४. )

ह्या वेळीं आल्सिबियाडीज नांवाचा एक विलक्षण गृहस्थ आथेन्स येथें होता. तो थोर कुळांतला असून श्रीमंत व जबरदस्त महत्त्वाकांक्षी होता. लहान असतां तो मुलांच्या टोळ्या करून वाटेल तो दंगा करीत असे; त्यांत न्यायान्याय किंवा युक्तायुक्तता तो मुळींच पाहत नसे. मोठें कुल व अपार संपत्ति ह्यामुळें त्याच्या सभोंवार तोंडपुजे लोक जमा झाले. ते त्याचे शब्द झेलण्यास व त्याची हरएक प्रसंगीं स्तुति करण्यास सदा तत्पर असत. त्यामुळें न्यायाबाईटाचा विधिनिषेध त्यास वाटेनासा झाला. पेरिक्लीजचा तो आप्त होता व निसियासनें तह केला, त्या वेळीं त्याचें वय सुमारें तीस वर्षांचें असून, तो आथेन्स येथें प्रमुख होता.

सॉक्रेटीस व आल्सिबियाडीज हे दोस्त होते. त्या थोर साधूचा उपदेश आल्सिबियाडीजनें मानला असता, तर तो पेरिक्लीजच्या तोडीचा थोर मुत्सद्दी झाला असता. बाकी सॉक्रेटीसविषयीं त्याच्या मनांत अतिशय पूज्यबुद्धि वागत होती; आणि त्याच्या उपदेशाची थोरवी तो कबूल करी. तरी सभोंवतालच्या तोंडपुजे मंडळीच्या स्तुतिपाठापुढें सॉक्रेटीसचा

उपदेश त्याच्या मनांत ठसला नाहीं. उत्तरोत्तर त्यास सॉक्रेटीसचा कंटाळा आला, आणि तो त्यास भेटेनासा झाला.

पोषाखाच्या व ऐषआरामाच्या बाबतींत आल्सिबियाडीज पूर्ण तज्ज्ञ आहे असें आथेन्सचे लोक समजत. आथेन्स येथें सर्वोत्कृष्ट म्हणून जे जोडे होते त्यांस आल्सिबियाडीजचें नांव मिळालें होतें. पाठीमागें जमिनीवर लांब सोगा लोळत येणारा दुपट्टा अंगावर घेण्याचा आल्सिबियाडीजनें प्रघात घातला, तो पुष्कळ श्रीमंत व मोठ्या गृहस्थांनीं उचलिला. ग्रीसमधील अत्यंत श्रीमंत घराण्यांतील एका मुलीशीं त्यानें लग्न केलें, त्यामुळें त्याची संपत्ति व वजन ज्यास्तच वाढलीं. आलिंपियन खेळांतील शर्यतींत तीनदां त्याची मोठी वाहवा झाली, आणि त्याचा लौकिक वाढला. त्या प्रसंगीं त्यानें सर्व प्रेक्षकांस एक मोठी मेजवानी दिली.

मेजवान्या व थाट करण्यांत आल्सिबियाडीस अतोनात पैसा खर्च करी. ह्यांत त्याचा उद्देश लोकप्रीति संपादन करण्याचा होता असें नाहीं; आपला मोठेपणा लोकांस दाखवावा एवढीच त्याची इच्छा असे. तथापि तो लोकप्रिय होताच; आणि धाडशी असल्यामुळें ह्या लोकप्रीतीचा त्यानें दुरुपयोग केला. सरकारचे कायदे व सामाजिक चालीरीती तो धाब्यावर बसवीत असे; जणूं काय आपणास कशाचीही भीति नाहीं व कायदा मोडल्याबद्दल इतरांस शिक्षा झाल्या, तरी आपणस शिक्षा करणारा कोणी नाहीं, असें त्याच्या वर्तनावरून लोकांस वाटे.

निसियासनें केलेला तह आल्सिबियाडीज यास पसंत नव्हता; व कौन्सिलनें तो पाळूं नये एतदर्थ त्यानें हरतऱ्हा केल्या. वास्तविक दोनही पक्षांनीं व विशेषतः आथीनियन सरकारानें तहाचीं कलमें पाळलीं नाहींत. स्पार्टाशीं दोस्ती असलेल्या शहरांवर हल्ला करून तीं काबीज करावीं, असा क्रम आथीनियन सरकारनें चालविला; शेवटीं सिसिली बेट काबीज करण्यासाठीं आरमार पाठविण्याची वाटाघाट चालली. सिसिलींतील सर्व मोठमोठीं शहरें स्पार्टन लोकांनीं वसाविलेलीं असल्यामुळें, तीं आथेन्सला काबीज करूं देणें

स्पार्टानें कधीं मानिलें नसतें. निसियास ह्या स्वारीच्या विरुद्ध होता. पण आल्सिबियाडीजनें विशेष आग्रह धरल्यामुळें सिसिलीवर स्वारी करण्याचा निश्चय ठरला आणि युद्धाची सिद्धता झाली. रीतीप्रमाणें डेल्फाय येथील देवीचा कौल आथेन्सनें आणविला. देवीनें ह्या स्वारीस अनुमोदन दिलें नाहीं. तथापि आथीनियन लोकांचा ह्या कौलावरील भरंवसा बहुतेक उडाला होता. युद्ध सुरू झाल्यापासून बहुतेक सर्व भविष्यें स्पार्टाच्या मनाप्रमाणें सांगितल्यामुळें आथेन्सचे लोक डेल्फायवर चिडले होते. वास्तविक डेल्फायच्या देवीचें राज्यकारभारांतील महत्त्व ह्या वेळेपासून बहुतेक नाहीसें होऊं लागलें. बाकी ग्रीस देश रोमन लोकांनीं जिंकला, तोंपर्यंत व पुढेही पुष्कळ लोक खासगी रीतीनें तेथील देवीचा कौल घेण्यासाठीं जात असत. सार्वजनिक कामांत मात्र त्याचें महत्त्व लोक मानीतनासे झाले.

सिसिलीवर आरमार रवाना होणार इतक्यांत आल्सिबियाडीजवर कांहीं भयंकर आरोप आले. हर्मीज ऊर्फ मर्क्युरी म्हणून ग्रीक लोकांचा एक देव होता. तालमींत व शाळागृहांत ह्या देवाची पूजा करीत; आणि सामाजिक गोष्टींत त्याचें प्रस्थ मोठें असे. देवळें, तालमी, कचेऱ्या, शाळा वगैरे इमारतींच्या समोर शिलासनांवर ह्या देवाचे छातीच्या वरचे पुतळे ठेवलेले होते. एके दिवशीं सकाळीं पाहतात, तों आथेन्स येथें ह्या सर्व पुतळ्यांचा चकाचूर झालेला दिसला. त्यामुळें लोकांत मोठा गहजब उडाला. हें दुष्ट कृत्य करणारे कोण ह्याचा पुष्कळ तपास करण्यांत आला; पुष्कळांस कैदेंत टाकिलें व पुष्कळांस फांशी दिलें; तरी खरा प्रकार बाहेर आला नाहीं. आल्सिबियाडीजवरही आरोप ठेवण्यांत आला. तसेंच, कित्येक धर्मविधींच्या गूढ चालींचा उघड उपमर्द आल्सिबियाडीजनें केला, असा एक जबर आरोप एका गुलामानें त्याजवर उघडपणें आणिला. तेव्हां आपला न्याय व्हावा अशी आल्सिबियाडीजनें मागणी केली; पण सिसिलीवरील स्वारीची तयारी झाली असल्यामुळें, त्या स्वारीवरून आल्सिबियाडीज परत येईपर्यंत त्याजवरील खटले तहकूब ठेवण्यांत आले.

एवढें मोठें आरमार ग्रीस देशांतून पूर्वी कधींच बाहेर पडलें नव्हतें. आरमारास निरोप देण्यासाठीं झाडून सारे आथेन्सचे लोक किनाऱ्यावर जमा झाले. प्रत्येक गलबतावर सोन्याचांदीच्या भांड्यांतून देवास नैवेद्य अर्पण करण्यांत आला; व आरमार निघालें तेव्हां त्यास सुरक्षित परत आणावें म्हणून सर्वांनीं भक्तीनें देवाची प्रार्थना केली. पण ही सफर आथेन्सला फलप्रद झाली नाहीं. इटली व सिसिली ह्यांजमध्यें पुष्कळ शहरें होतीं, तीं आपणास मदत करितील अशी आथेन्सला आशा वाटत होती. पण ह्या शहरांनीं मदत तर केली नाहींच; उलट आथीनियन लोकांस आंत येण्याची बंदीकरून, त्यांस आपल्या बाजारांत खाण्यापिण्याचें सामान सुद्धां मिळूं नये, असा बंदोबस्त केला.

सिसिलींतील काम फत्ते होत नाहीं असें दिसून आल्यावर, आथेन्स येथील कारभाऱ्यांनीं आल्सिबियाडीजचा न्याय करण्याकरितां त्यास आथेन्सला आणण्यासाठीं सिसिलीस सरकारी गलबत पाठविलें. आथेन्स येथें राज्यक्रांति घडविण्याची खटपट आल्सिबियाडिज करीत आहे, असाही त्याजवर आणखी एक आरोप होता, व त्याच्या मसलतींत सामील असल्याच्या वहिमावरून त्याच्या अनेक साथिदारांस कैदेची शिक्षा झाली होती. कित्येकांस देहांत शिक्षाही झाल्या होत्या; आणि कित्येक शिक्षा चुकविण्याकरितां आथेन्स सोडून पळून गेले होते. आल्सिबियाडीजला ही सर्व हकीकत समजली. आपण आथेन्सला गेलों तर आपणास मरणाची शिक्षा खास होणार, असें समजून तो पळून स्पार्टा येथें गेला; व तेथें देशद्रोह करून त्यानें आथेन्सच्या शत्रूस सल्लामसलत देऊन आथेन्सचा सूड उगविला. इकडे आथेन्स येथें त्यास मृत्यूची शिक्षा होऊन त्याची सर्व जिंदगी सरकारांत जप्त झाली. ह्या पाप्यास देवतांनींही आश्रय देऊं नये अशा हेतूनें त्यास भ्रष्ट समजण्यास धर्मगुरूंनाही सरकारानें हुकूम केला. वास्तविक ही शिक्षा मृत्यूपेक्षांही घोर समजली जात असे. धर्मगुरूंनीं यज्ञयाग करून लाल निशाणें हातांनीं हालवून आल्सिबियाडीजला ‘ तूं भ्रष्ट हो ’ असा शाप दिला.

आल्सिबियाडीज स्पार्टास गेल्यावर निसियास व लॅमाकस ह्यांजकडे आरमाराचें आधिपत्य आलें, तेव्हां आथेन्सच्या जहाजांस बराच विजय प्राप्त झाला. सायराक्यूझ येथें विजय मिळवून आथेन्सच्या लोकांनीं त्या शहरास वेढा घातला. सायराक्यूझच्या लोकांनीं स्पार्टा आणि कॉरिंथ ह्यांजकडे मदतीकरितां वकील पाठविले. इकडे कार्थेजिनियन लोकांची मदत मागण्याकरितां आथेन्सनें आपले वकील कार्थेजला पाठविले. स्पार्टा येथें आल्सिबियाडीज होता त्याच्या सल्ल्यानें स्पार्टन लोकांनीं ठिकठिकाणाहून घाईनें लोक जमवून ते गिलिपसच्या हाताखालीं देऊन सिसिलीस पाठविले. वाटेंत त्यांस कॉरिंथची मदतही येऊन मिळाली. इकडे सायराक्यूझ येथें आथेन्सहून ज्यास्त कुमक आली; तेव्हां तें शहर आथेन्सच्या हातांत पडण्याचा अगदीं प्रसंग आला होता, इतक्यांत गिलिपसही येऊन पोंचला आणि सायराक्यूझचा बचाव झाला.

तिकडे ग्रीस देशांत स्पार्टाच्या फौजेनें ॲटिका प्रांतांत प्रवेश केला, आणि आथेन्सपासून पंधरा मैलांवर एका उंच टेकडीवर डिसीलिया येथें लष्करी ठाणें बसविलें; तेथें स्पार्टाचा एक राजा एजिस हा मुद्दाम बंदोबस्तासाठीं स्वतः येऊन राहिला. त्यामुळें आथेन्सचा अगदीं कोंडमारा झाला; शहरांतील सर्व लोकांस रात्रंदिवस पाहाऱ्यांवर बसणें भाग पडलें. बाहेरच्या प्रदेशांतून आथेन्स शहरांत धान्यसामुग्री येत असे, ती स्पार्टन लोक मध्येंच लुटून घेऊं लागले, म्हणून शहरांत सामुग्रीचा तोटा पडूं लागला. आथेन्समधून नाराज झालेले हजारों गुलाम वगैरे लोक येऊन स्पार्टन फौजेस मिळूं लागले. त्यामुळें आथेन्सच्या सर्व मुलखाची अत्यंत नासाडी झाली.

तथापि आथेन्सचें सर्व लक्ष सिसिलींतील विजयाकडे होतें. आथेन्सच्या सरकारानें यूरिमिडोन व डेमास्थेनीस ह्या आणखी दोन सेनापतींस कुमक घेऊन सिसिलीस पाठविलें. तेथें जमिनीवर व समुद्रावर अनेक लढाया झाल्या. बहुतेकांत स्पार्टन लोकांच्या मदतीनें सायराक्यूझच्या फौजेस जय मिळाले. शेवटीं आथीनियन लोकांचा पराभव झाला.

त्यांचीं सर्व गलबतें शत्रूंनीं काबीज केलीं. जे सैनिक समरांगणांतून बचावले ते सर्व शत्रूच्या हातांत पडून कैदी झाले. त्यांत निसियास व डेमास्थेनीस हे होते. त्या दोघांसही शत्रूंनीं ठार मारिलें; व बाकीच्या पैकीं कांहीं कैदेंत मेले व कांहींना गुलाम म्हणून शत्रूंनीं निरनिराळ्या ठिकाणीं विकलें.

ह्या अपजयाच्या बातमीनें आथेन्स येथें हाहाःकार उडाला. आथेन्सचा सर्व प्रकारचा आधार तुटला. खजिन्यांत शिल्लक नाहीं, किनाऱ्याचें संरक्षण करणारीं जहाजें बंदरात नाहींत, अशा स्थितींत आथेन्सचे लोक निराश होऊन स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं नवीन जहाजें बांधण्यास सुरुवात केली; व पुनरपि भाग्योदय होईपर्यंत तमाशे व समारंभ ह्यांजमध्यें पैसा खर्चेण्याचें बंद केलें. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं सर्व नगरवाश्यांची सामान्य सभा बोलविण्याची चाल असे. त्याप्रमाणें सभा भरवून सर्व प्रकार लोकांस समजून देण्यांत आले. तेव्हां स्वदेशाभिमानी लोक सरकारच्या मदतीस आले. त्यांनीं हां हां म्हणतां पैसा जमा केला; गलबतें व शस्त्रें तयार केलीं; आणि नवीन आरमार उभारण्याची सर्व प्रकारची सिद्धता झाली.

ह्या वेळेच्या सुमारास स्पार्टा येथें आल्सिबियाडीजचा बेबनाव झाला. स्पार्टाचा राजा एजिस ह्याजबरोबर भांडून तो आशियामायनरचा इराणी सुभेदार (Satrap) टिसाफर्निस याजकडे गेला. ह्या उभयतांची लगेच चांगली दोस्ती जमली. तेथून त्यानें आथेन्सच्या सरकारास असें सांगून पाठविलें कीं, " मजला झालेली शिक्षा रद्द कराल, तर मी आथेन्सला परत येऊन टिसाफर्नीसची मदत मिळवून देईन. "

ह्या सूचनेवर आथेन्सच्या कौन्सिलांत कडाक्याचा वादविवाद झाला; आणि शेवटीं आल्सिबियाडिजचें म्हणणें कबूल करून त्यास परत बोलावण्याचें ठरलें. पण इराणच्या सुभेदारानें आथेन्सला मदत करण्याचें कबूल केलें नाहीं; तेव्हां आल्सिबियाडीजला कांहीं दिवस तसेंच बाहेर राहवें लागलें. पुढें लवकरच आथेन्थ येथें राज्यक्रान्ति झाली. राज्यकारभार पाहणारी प्रजासत्ताक मंडळी होती ती मोडून अल्प-

सत्ताक राज्यव्यवस्था चालू झाली. त्या वेळीं आल्सिबियाडीसला परत बोलाविलें. नवीन राज्यव्यवस्था लोकांस आवडली नाहीं. त्यांनीं बंड केलें; आणि अल्पसत्ताक मंडळी नवीन झाली होती, ती मोडून पहिल्याप्रमाणें प्रजासत्ताक मंडळी स्थापन केली. पुष्कळ नवीन कायदे केले व एकंदरींत पेरिक्लीजच्या पूर्वीं जशी राज्यव्यवस्था चालू होती, तशी पुनः चालू झाली. ह्या घालमेलींत विरुद्ध पक्षाचे लोक होते ते आथेन्स सोडून गेले, आणि डिसीलिया येथें स्पार्टन लोकांस जाऊन मिळाले ( इ. स. पू. ४११ ).

पुढें आल्सिबियाडीजची नेमणूक आरमारावर होऊन त्यानें स्पार्टन लोकांशीं अशा निकरानें युद्ध केलें, कीं लवकरच आथेन्सचा अंमल बहुतेक पूर्वीप्रमाणें पुन: बसला. नानाप्रकारचे विजय संपादून, पूर्वीं हद्दपार झालेल्या आल्सिबियाडीजनें विजयानंदाच्या समारंभांत मोठ्या थाटानें आथेन्स शहरांत प्रवेश केला. त्याची स्वारी रस्त्यानें चालली असतां, लोकांनीं त्याचा अतिशय जयजयकार केला. त्याच्या स्नेह्यांनीं त्याजला समारंभानें सभागृहांत आणिलें. आणि तेथें त्यास पूर्वींच्या सर्व अपराधांतून विधिपूर्वक मुक्त केलें. त्यानें राष्ट्राची उत्कृष्ट कामगिरी बजावली, त्याबद्दल त्यास सुवर्णमुगुट बक्षीस देऊन त्याची जिंदगी सरकारांत आली होती, ती त्यास परत दिली; तशीच त्यास सर्व लष्कराच्या व आरमाराच्या मुख्य सेनापतीची जागा देण्यांत आली.

आल्सिबियाडीजच्या हातांत ही जी सत्ता आली, तिचा त्यानें प्रथम चांगला उपयोग केला, त्यामुळें लोकांची त्याजवर विशेष भक्ति बसली. स्पार्टन लोकांचें ठाणें डिसीलिया येथें बसल्यामुळें, आथेन्स येथें होणारा एक मोठा उत्सव बंद पडला होता. कारण ह्या उत्सवांत आथेन्सचे लोक बायका बरोबर घेऊन स्वारीच्या थाटानें आथेन्सहून इल्यूसिस येथें जात असत. दुसऱ्या कोणत्याही उत्सवांत आथेन्सच्या बायका सामील होत नसत. रस्त्यांत शत्रूंचें ठाणें बसल्यामुळें बायका बरोबर नेण्याची सोय नव्हती. म्हणून तो उत्सव बंद पडला होता. पण आल्सिबियाडीजनें आपली फौज

बरोबर घेऊन सर्व स्वारी सुरक्षितपणें नेऊन परत आणिली. त्यामुळें लोकांच्या मनांतील फार दिवसांचा उद्वेग नाहींसा होऊन त्यांस समाधान वाटलें.

पण लवकरच आल्सिबियाडीजवरील लोकांची भक्ति उडाली. त्यास एकामागून एक अपजय येत गेले; आणि त्यास सेनापतीच्या जागेवरून दूर केलें. तेव्हां हेलेस्पाँटच्या किनाऱ्यावर त्याच्या सत्तेची एक जागा होती तेथें जाऊन तो कांहीं वर्षें राहिला. तेथून पुढें तो आशियांत गेला असतां तिकडे त्याचा खून झाला (इ. स. पू. ४०४).

---

## प्रकरण बारावें.

### आथेन्सच्या सत्तेचा ऱ्हास.

(इ. स. पू. ४०७–३९९).

आथेन्स व स्पार्टा ह्यांचें युद्ध चालूच होतें. उभय पक्षांकडे क्रूरपणाची कमाल होत होती. स्पार्टाला इराणचा राजा सायरस ह्याची मदत होती. त्या राजापाशीं द्रव्यसंचय विपुल असल्यामुळें शिपायांस आणि खलाशांस पैसे देण्यास अडचण नव्हती. प्राचीन काळीं ग्रीक लोक पगार घेतल्याशिवाय सरकारची नोकरी करीत असत, तसा प्रकार ह्या वेळेस नव्हता. ह्या वेळेस त्यांस सरकारांतून ठरीव पगार मिळे, तेव्हांच ते नोकरी करीत.

आल्सिबियाडीज गेल्यावर आथेन्सच्या कारभारावर कॅनन (Canon) ह्याची नेमणूक झाली. हा गृहस्थ मोठ्या कुळांतला व हुशार होता. त्यानें आणखी नऊ शूर गृहस्थ आपल्या मदतीस घेतले, आणि आरमार घेऊन शत्रूंवर मोठा विजय संपादन केला. ह्या वेळीं एका क्षुल्लक कारणावरून आथेन्सच्या सरकारानें मोठी चूक केली, नाहीं तर स्पार्टाचा नाश कायमचा झाला असता. वर सांगितलेली लढाई आशियाच्या किनाऱ्यावर आर्गिन्यूझी नांवाचीं

तीन बेटें आहेत तेथें झाली, आणि स्पार्टांच्या आरमाराचा विध्वंस झाला. लढाई चालू असतां, कांहीं आथिनियन जहाजें जायां झालीं; त्यांजवरील खलाशी मोडक्या लाकडांचा आश्रय करून जीव धरून होते; त्यांस आशा होती कीं, लढाई आटपल्यावर आपणास सोडविण्याकरितां गलबतें येतील. पण लढाई संपतांच एक मोठें वादळ झालें, त्यामुळें त्या निराश्रित लोकांस सोडवून आणणें अशक्य झालें आणि ते सर्व लोक प्राणांस मुकले. जर सवड झाली असती तर आरमारावरील अधिकाऱ्यांनीं जाऊन त्यांस सोडवून आणिलें असतें. तथापि आथेन्सच्या सभेंत त्या अधिकाऱ्यांचा न्याय झाला; आणि स्वदेशबंधूंचा बचाव करण्याची हयगय केल्याबद्दल दहाही अधिकाऱ्यांपैकीं आठ असामींस मृत्यूची शिक्षा झाली. सहा असामीं मारले गेले व दोघे पळून गेले. अशा रीतीनें अत्यंत आणीबाणीच्या वेळीं आठ उत्कृष्ट लढवय्ये नाहींसे झाल्यामुळें, आथेन्सचें मोठें नुकसान झालें. आथेन्स येथें दुफळी होती, तिचा हा परिणाम होय. अशा प्रकारचे पक्ष आथेन्सच्या कारभारांत नेहमीं असत.

सायरसच्या मदतीनें स्पार्टन लोकांनीं आपलें आरमार चांगलें दुरुस्त केलें; आणि त्याजवर लिसांडर नांवाचा मुख्य अधिकारी नेमिला. त्यानें हेलेस्पांटवर जाऊन लांप्सेकस शहर एकदम हल्ला करून काबीज केलें. हें शहर आशियामायनरांत असून आथेन्सच्या दोस्तींतलें होतें. आथीनियन लोकांनीं लिसांडरवर आपलें आरमार रवाना केलें, तें ज्या ठिकाणीं येऊन उतरलें, तेथें समोर किल्ल्यांत आल्सिबियाडीज राहत असून, तो दोनही पक्षांच्या हालचाली लक्षपूर्वक अवलोकन करीत होता. लिसांडर आथीनियन आरमारावर हल्ला करण्याची संधि पाहत आहे असें पाहून, आल्सिबियाडीज खालीं किनाऱ्यावर आला आणि त्यानें आरमाराच्या अधिकाऱ्यांस समजून सांगितलें कीं, 'तुम्ही आपल्या लोकांस गलबतावर तयार ठेवा; गलबतें सोडून बाहेर जाऊं देऊं नका.' ही सूचना अधिकाऱ्यांनीं मानली नाहीं, तेणेंकरून त्यांचा घात झाला. एके दिवशीं गलबतावरचे बहुतेक लोक बाहेर गेले आहेत अशी पाळत राखून, लिसांडरनें आथिनि-

यन आरमारावर एकदम छापा घातला, आणि बहुतेक सर्व जहाजें काबीज केलीं. कांहीं स्पार्टन शिपाई आथीनियन खलाशांस हुड-कीत बाहेर पडले. त्यांनीं बहुतेकांस पकडून कैद केलें. कॅनन आठ जहाजांनिशीं पळून सायप्रस येथें गेला. तेव्हां इकडे लिसां-डरनें आथेन्सच्या ताब्यांतील बहुतेक सर्व प्रदेश, शहरें व बेटें काबीज करून स्पार्टाचे ताब्यांत आणिलीं. अखेरीस प्रत्यक्ष आथेन्सला समुद्र व जमीन दोनही बाजूंनीं स्पार्टन लोकांनीं वेढा घातला.

असा वेढा पडेल अशी आथेन्सला मुळींच अटकळ नसल्यामुळें, मोठी त्रेधा उडाली. शहरांत धान्यसामुग्री येण्याची बंदी झाली. चार महिने वेढा पडल्यावर वाटेल त्या शर्ती कबूल करून तह करणें प्राप्त झालें. त्यासाठीं आथेन्सनें आपले वकील स्पार्टाला पाठविले. स्पार्टानें अटी घातल्या, त्या अशा: आथेन्सचे मोठे तट व किल्ले पाडून टाकावे; बारा जहाजांपेक्षां ज्यास्त असलेलीं सर्व जहाजें स्पार्टाच्या स्वाधीन करावीं; हद्दपार केलेल्या सर्व लोकांस परत येऊं द्यावें; आणि आथेन्सनें स्पार्टाचा ताबा कबूल करावा. ह्या अटी आथेन्सला मोठ्या कठीण वाटल्या; पण कठीण असल्या तरी त्या कबूल करणें भाग पडलें. येणेंप्रमाणें हें युद्ध संपलें (इ. स. पू. ४०४).

तह झाल्याबरोबर लिसांडर आथेन्सची तटबंदी पाडूं लागला. निरुपयोगी असलेलीं गलबतें त्यानें जाळून टाकिलीं. हद्दपार केलेले सर्व लोक परत आले, त्यांस हा प्रकार पाहून अत्यंत समाधान झालें. ते लोक व स्पार्टन वगैरे परकी लोक आथेन्सच्या ह्या दुर्दे-शेची मजा मोठ्या कौतुकानें पाहत बसले. त्यांनीं आपल्या मस्त-कावर पुष्पमाळा धारण केल्या; आणि बँडच्या चालीवर पाडापाडीचें काम चालू ठेविलें. आथेन्सच्या अभिमानी लोकांस हा देखावा पाहून किती हळहळ वाटली असेल ह्याची कल्पना करावी! पण ह्याही-पेक्षां अनिष्ट प्रकार पुढेंच होता. लिसांडरनें अथेन्स येथील पूर्वीची राज्यकारभाराची पद्धत मोडून, तीस गृहस्थांची एक नवीन मंडळी स्थापन केली. त्यांनीं आथेन्स येथें जे अनुचित प्रकार केले, त्या व-रून त्यांस 'तीस जुलमी कारभारी' अशी संज्ञा मिळाली. ह्या

तिसांपैकीं कित्येक हद्दपार होऊन परत आलेले देशद्रोही लोक होते. त्यांनीं ही संधि साधून पूर्वीच्या आपल्या शत्रूंचा वाटेल तसा सूड घेतला. लिसांडरनें नेमलेल्या मंडळीनें आठ महिने कारभार केला; पण तेवढ्या अवधींत अब्रूदार किंवा धनाढ्य इसम कोणीही सुरक्षित राहिला नाहीं. पुष्कळांस कैदेंत टाकिलें आणि पुष्कळांस मृत्यूची शिक्षा दिली. तपास वगैरे कांहीं नाहीं. खोटेच्या खोटे आरोप आणून पुष्कळांस देशत्याग करावयास लाविलें; आणि त्यांची संपत्ति ह्या तीस अधिकाऱ्यांनीं बळकाविली. त्यांनीं आपसांतही एकमेकांविरुद्ध असलींच कृत्यें करण्यास अनमान केला नाहीं. एका अधिकाऱ्यास तर त्यांनीं भरसभेंत विष पाजून ठार मारिलें. त्याचा अपराध काय, तर त्यानें सभेच्या बैठकींत दोघां श्रीमंत गृहस्थांची तरफदारी केली.

ह्या जुलमास त्रासून पुष्कळ लोक थीब्स व इतर ठिकाणीं गेले, तेव्हां त्यांस आपली जिंदगी आथेन्स येथेंच सोडून द्यावी लागली; त्यामुळें त्यांचें मोठें नुकसान झालें. अशा पळून गेलेल्या लोकांमध्यें थ्रॅसिब्यूलस नांवाचा एक जुना आथीनियन सेनापति होता. तो धाडसी व शूर होता. आपल्या देशबांधवांस वरील क्रूर जुलमांतून सोडविण्याच्या हेतूनें त्यानें ॲटिका प्रांताच्या हद्दीवरील एक किल्ला हस्तगत केला. तेथें आथेन्सहून पळून आलेले पुष्कळ लोक त्यास मिळाले, आणि बरीच फौज जमली. ती घेऊन त्यानें आथेन्सवर हल्ला केला, आणि कारभाऱ्यांनीं त्याजवर पाठविलेल्या फौजेचा पराभव करून तीस पिटाळून लाविलें. ही बातमी आथेन्स येथें समजतांच राज्यक्रान्ति झाली, तीस असामींची सभा मोडून दुसरी एक दहा गृहस्थांची सभा स्थापन झाली. हे दहा गृहस्थ थ्रॅसिब्यूलसला येऊन मिळतील अशी आशा होती. पण तसा प्रकार झाला नाहीं. उलट त्यांनीं स्पार्टाकडे वकील पाठवून मदत मागितली; आणि पहिल्या तीस असामींच्या मंडळाप्रमाणेंच त्यांनींहीं लोकांवर जुलूम चालविले.

पुढें लिसांडर एक फौज घेऊन आथेन्सवर आला. आपण कल्पिली राज्यव्यवस्था पुनरपि आथेन्स येथें चालू करण्याचा त्याचा विचार

होता. पण स्पार्टाचा राजा पॉझेनियस ह्यास हा जुलूम आवडला नाहीं. तो मागाहून लगोलग दुसरी फौज घेऊन आला; आणि सर्व लोकांची समजावणी करून, युद्ध सुरू होण्यापूर्वी आथेन्स येथें जी राज्यपद्धति होती, तीच त्यानें पुनरपि तेथें चालू केली.

ह्याप्रमाणें आथेन्स येथें स्वस्थता झाली खरी, पण ग्रीस देशांत आथेन्सला जो पूर्वी भाग्यकाल आला, तसा त्यास पुनः कधीं आला नाहीं. त्याचे अनेक प्रांत ताब्यांतून गेल्यामुळें द्रव्यप्राप्तीचीं साधनें नाहींशीं झालीं, आणि दरसाल खंडणीच्या रूपानें येणारा वसूल बंद पडला. आथेन्सच्या न्यायकोर्टांत न्याय मिळण्याकरितां बाहेरच्या शहरांतून हजारों लोक येत असत, ते येईनातसे झाले. न्यायाचीं कोर्टें बसत, तेव्हां आथेन्स येथें लोकांची अतिशय गर्दी होई ती बंद झाली. घरवाल्यांस भाड्यांच्या घरांचें मोठें उत्पन्न असे, तें नाहींसें झालें. बाजार ओस पडले. परदेशाशीं चालणारा सर्व व्यापार युद्धाच्या योगानें बुडाला. परदेशचे श्रीमान व्यापारी आथेन्स येथें राहत होते, त्यांस आपली दौलत सरकार हरण करील अशी भीति पडून, ते देश सोडून गेले. त्यामुळें जिकडे तिकडे पैशाची हाकाटी झाली. सार्वजनिक उत्सव बंद पडले, आणि वाडे, मोठमोठ्या इमारती व एकंदरींत सर्व शहर, दुरुस्ती न झाल्यामुळें, निकृष्ट स्थितीस येऊन पोंचलें.

ग्रीस देशाचा प्रसिद्ध साधु व त्या वेळचा विद्वान तत्त्वज्ञ सॉक्रेटीस ह्याच वेळेस होऊन गेला. धर्माच्या विरुद्ध लोकांस उपदेश केल्याबद्दल त्यास मृत्यूची शिक्षा झाली. तो वृद्ध झाला होता; आणि शिक्षा चुकविण्यासाठीं त्यास पळून जातां आलें असतें. पण त्यानें तसें केलें नाहीं. तो म्हणाला, 'मला आतां केव्हां तरी लवकरच मरावयाचें आहे, मग येथेंच राहून मेलेला काय वाईट!' तुरुंगांत असतां त्याची स्नेही मंडळी त्यास जाऊन भेटत असे. त्यास विषाचा प्याला पिण्यास दिला, तेव्हां त्याचे पुष्कळ स्नेही त्याच्या जवळ बसले होते. तहान लागल्यावर जसें पाणी प्यावें, तितक्याच शांतपणानें तो तें विष प्याला, आणि तें अंगांत भिनेपर्यंत स्नेही मंडळीशीं तो

गोष्टी बोलत होता. सॉक्रेटीसनें स्वतः कधीं ग्रंथ लिहिला नाहीं; पण प्लेटो आणि झेनोफन हे त्याचे दोन शिष्य होते, त्यांनीं आपल्या ग्रंथांत सॉक्रेटीसचे वादविवाद व संभाषणें लिहून ठेविलीं आहेत.

सॉक्रेटीस मोठा तत्त्ववेत्ता होता. तरी त्यानें कांहीं तत्त्व-ज्ञानाचे ग्रंथ लिहिले नाहींत. स्वतःची बुद्धि चालवून एखाद्या गो-ष्टीचा विचार कसा करावा, व सत्य कसें शोधून काढावें, हें त्यानें लोकांस शिकविलें. तो कांहीं एकादी मोठी शाळा भरून लोकांस शिकवीत नसे. आथेन्सचे अनेक तरुण व बुद्धिमान लोक त्यास भेटण्यास येत. त्यांजला उलट सुलट प्रश्न विचारून व त्यांजबरोबर संभाषण करून तो त्यांस सत्य व नीति ह्यांचें शिक्षण देत असे. तो म्हणे, आपणास पुष्कळ गोष्टी समजल्याशा वाटतात; पण त्यांचें यथार्थ ज्ञान आपणांस मुळींच झालेलें नसतें. केवळ शब्दांच्या अवडं-बरांत आपण गोंधळलेले असतों. उदाहरणार्थ, मुत्सद्दी म्हणजे काय? उ० मुत्सद्दी म्हणजे पेरिक्लीजसारखा गृहस्थ. पण 'पेरिक्लीज उंच होता, वक्ता होता, म्हणून प्रत्येक मुत्सद्दी उंच व वक्ता असलाच पाहिजे काय? नाहीं. तर मुत्सद्दी या शब्दाचा अर्थ काय? सर्व मुत्सद्यांचे अंगीं अवश्य पाहिजेत असे गुण कोणते, आणि मुत्सद्यांचे ठिकाणीं असून शिवाय इतरांच्या ठिकाणींही आहेत असे गुण कोणते? अशा रीतीनें प्रश्न करून शब्दाचा खरा अर्थ सॉक्रेटीस शिष्यांच्या तोंडून काढून घेई, आणि पृथक्करण करून प्रश्नांच्या रूपानें तो लोकांच्या मनांतील घोटाळे काढून टाकी. येणेंकरून प्रचलित धर्म किंवा प्रचलित राज्यपद्धति वगैरे कोणत्याही प्रस्तुत विषयाशीं संबंध न ठेवितां, त्यानें लोकांस केवळ बुद्धीच्या जोरावर स्वतंत्रपणें विचार करण्यास शिकविलें.

अशा प्रकारें स्वतंत्र विचार करण्यास शिकविणारा पहिला मोठा पुरुष सॉक्रेटीस होय. राज्यकर्त्यांनीं अमुक कायदे केले, किंवा अमुक धर्मप्रचार पुरातन काळापासून सुरू आहेत, म्हणून तेवढ्यानेंच ते चांगले आहेत असें होत नाहीं. प्रत्येकानें आपली बुद्धि स्वतंत्रपणें चालवून विचार करावा, आणि मग ते बरे आहेत कीं

वाईट आहेत हें ठरवावें. अशा प्रकारें लोकांस शिकवितांना तो कोणाचीच भीड ठेवीत नसे. कोणी वृद्ध असो, कीं अधिकारारूढ असो, त्याची तो बिलकुल परवा करीत नसे. वृद्धांस मान द्यावयाचा तो त्यांच्या वृद्धपणासाठीं नव्हे, तर त्यांच्या अंगीं शहाणपण असेल तर. बापाची आज्ञा मुलांनीं पाळावी ही गोष्ट खरी, पण बाप जर अज्ञानानें मुलांस भलतेंच सांगेल, तर तें मुलांनीं बिलकुल मानतां कामा नये. सारांश, सत्य आणि ज्ञान हींच सॉक्रेटीसच्या मतें सर्व मान्य होत.

अशा प्रकारें सॉक्रेटीसनें नीतिशास्त्राचा तपास चालविला, आणि असा सिद्धांत काढिला कीं, ज्यांत लोकांचें कल्याण तें चांगलें. सद्गुण म्हणजेच सुख. सुख हें प्रत्येकास पाहिजे. म्हणून मनुष्य दुर्गुणी होतो, तो केवळ त्याच्या अज्ञानामुळें, कारण जाणून बुजून आपलें सुख बुडविणारा असा कोणी नाहीं. हीच स्वतंत्र विचारणा त्यानें धर्माचारांसही लागू केली. तेव्हां त्याचे विचार तत्कालीन धर्ममतांविरुद्ध असल्यामुळें, लोकांस आवडले नाहींत. सॉक्रेटीस हा आपल्या शिकवणानें लोकांस धर्मभ्रष्ट आणि नीतिभ्रष्ट करतो, असें अधिकाऱ्यांस वाटून, त्यांनीं त्याचा छळ केला, आणि शेवटीं त्यास मृत्यूची शिक्षा दिली. सॉक्रेटीसच्या पश्चात् त्याचा शिष्य प्लेटो हा मोठा तत्त्ववेत्ता झाला. प्लेटोचा शिष्य ॲरिस्टॉटल हा अलेक्झांडर बादशहाचा गुरु होय.

---

## प्रकरण तेरावें.

### इराणी युद्धें.

(इ. स. पू. ३९९–३८७).

इराणचा राजा डरायस ह्यानें आथेन्सबरोबर लढण्यांत स्पार्टाला मदत केली होती, तो त्या युद्धाच्या शेवटीं मरण पावला. पश्चात् त्याचा वडील मुलगा आर्टाझर्क्सिस मेम्नॉन हा त्याच्या गादीवर

बसला, आणि आशियामायनरच्या किनाऱ्यावरील इराणी राज्याचे सर्व प्रदेश डरायसचा दुसरा मुलगा सायरस ह्यास मिळाले.

हा सायरस हुशार व पाणीदार होता. त्याची महत्त्वाकांक्षा जबर होती. स्पार्टाशीं सख्य ठेवावें अशी त्याची फार इच्छा होती. स्पार्टाला पैशाचा पुरवठा करून आथेन्सशीं लढण्यांत त्यानें मदत केली होती. पण ह्यांत त्याचे हेतु शुद्ध नव्हते. आपल्या भावाचा पाडाव करून इराणचें तख्त बळकावण्याची त्याची इच्छा असून, त्या कामीं त्यास स्पार्टाची मदत पाहिजे होती. ह्याच बुद्धीनें त्यानें स्पार्टाला एवढी मदत करून त्याशीं सख्य ठेविलें होतें.

आर्टाझर्क्सिस गादीवर बसल्याबरोबर सायरसनें त्याजवर फौज घेऊन चाल केली. ह्या स्वारींत सायरस ह्यास दहा हजार ग्रीक लोकांची कुमक मिळाली होती. बाबिलोनच्या नजीक क्युनाक्झा येथें दोघां भावांची मोठी लढाई होऊन, सायरस मारला गेला, आणि त्याचें सर्व राज्य आर्टाझर्क्सिस ह्यास प्राप्त झालें. आर्टाझर्क्सिस हा मोठा खुनशी व लहरी होता.

ग्रीक फौज परत फिरली, इतक्यांत तिचा सूड घेण्याच्या इराद्यानें आर्टाझर्क्सिसनें आपल्या अधिकाऱ्यांस सांगून सर्व ग्रीक अंमलदारांस भेटीस बोलाविलें, आणि विश्वासघातानें त्या सर्वांची कत्तल केली, त्यामुळें ग्रीक फौज निराश्रित होऊन संकटांत सांपडली. तिजपाशीं धान्यसामुग्री नव्हती. परंतु सॉक्रेटीसचा शिष्य झेनोफन हा त्या फौजेंत स्वयंसेवक म्हणून गेलेला होता, त्यानें मोठ्या युक्तीनें फौजेचा बचाव करून तीस परत आणिलें; नाहीं तर ती सर्व प्राणांस मुकली असती. शत्रूंच्या मुलखांत नानाप्रकारचीं संकटें सोसून दहा हजार फौजेस झेनोफन ह्यानें सुरक्षित परत आणिलें, त्यावरून हा 'दहा हजारांचा प्रवास' इतिहासांत चिरस्मरणीय झाला आहे, आणि त्यामुळें झेनोफनची कीर्ति अजरामर झाली आहे. देशांत रानटी लोकांची वस्ती, थंडीचा कडाका, अन्नवस्त्र पुरेसें नाहीं, अशा अडचणींतून हजार मैल प्रवास करून हे लोक बायझांटियम येथें सुखरूप आले. तेथून झेनोफन फौजेस सोडून

एकटाच पेलापोनेससमध्यें परत आला. पुढें त्यानें आपलें आयुष्य विद्याव्यासंगांत घालविलें. त्याचें घर आलिंपियानजीक सिलस येथें होतें.

ग्रीक लोक हातचे सुटून गेल्यामुळें आर्टाझर्झिस ह्यास फार संताप आला. विशेषतः सायरला मदत केल्यामुळें स्पार्टन लोकांबद्दल त्याच्या मनांत द्वेष उत्पन्न होऊन त्यानें स्पार्टाशीं युद्ध सुरू केलें. ह्या युद्धांत टिसाफर्निस हा इराणी फौजेचा मुख्य सेनापति होता. ह्या टिसाफर्निसनेंच राजाच्या सांगण्यावरून ग्रीक अंमलदारांस कपटानें ठार मारिलें होतें.

ह्या वेळचा स्पार्टन लोकांचा राजा अजेसिलॉस हा शूर व पराक्रमी पुरुष होता. राज्यकारभारांतही तो चांगला निपुण होता. त्याचा बांधा मध्यम व चर्या सामान्य होती. तो पायानें लंगडा होता; पण स्वभावानें आनंदी व मनमिळाऊ होता. त्याचें लहानपणचें शिक्षण सामान्य स्पार्टन मुलाप्रमाणें झालें होतें. राज्यावर आल्यावर तो फार काटकसरीनें वागून छानछोकींत पैसा खर्चीत नसे. मुलांवर त्याचें प्रेम अतिशय असल्याचें सांगतात. एकदां त्याजकडे त्याचा एक स्नेही आला, तेव्हां काठीचा घोडा करून मुलांशीं तो खेळत होता, त्याचें त्या स्नेह्यास आश्चर्य वाटलें, तेव्हां त्यास राजा म्हणाला, 'तुम्हांस मुलें झाल्यावर मग मजकडे येऊन काय वाटतें तें सांगा.'

लायकरगस ह्यानें स्पार्टाचे कायदे केले तेव्हांपासून आतांपावेतों स्पार्टाच्या राज्यव्यवस्थेंत अनेक रूपांतरें झालीं होतीं. जुनीं घराणीं बहुतेक नाहींशीं होऊन लॅकोनियन लोकांशीं शरीरसंबंध झाल्यानें नवीन प्रजा उत्पन्न झाली होती. मंत्रिसभेचे सभासद निवडण्याचा अधिकार ज्यास्त फैलावला होता; आणि गुलामांस स्वतंत्रता मिळाल्यामुळें सामान्य वर्गाची संख्या पुष्कळ वाढली होती. पूर्वी डोरियन लोकांचे गर्विष्ठ वंशज ज्या लोकांस केवळ आपले गुलाम किंवा ताबेदार समजत, तेच आतां सधन व अमूदार बनले होते. अजून सुद्धां मूळचे अस्सल स्पार्टन लोक स्वतःस अमूदार

व बडे समजत आणि इतरांस हलके व तुच्छ मानीत; आणि त्यांची संख्या जसजशी कमी होत गेली, तसतसा स्पार्टन लोकांचा हा ताठा ज्यास्तच वाढत गेला. ह्या वेळीं सुद्धां राज्यपद, मंत्रिसभेच्या सभासदाचा मान, आणि लष्करी अंमलदारीच्या जागा, डोरियन लोकांच्या अस्सल वंशजांसच मिळत. तसेंच ईफोर नांवाचे पांच न्यायाधीश दरसाल नवीन निवडले जात, तेही डोरियन कुटुंबांतलेच निवडीत. ह्या पांच ईफोर न्यायाधीशांस राजापासून तों रंकापर्यंत सर्वांच्या गुन्ह्यांचा तपास करून शिक्षा करण्याचा अधिकार होता.

स्पार्टाच्या राज्यव्यवस्थेंत असले बदल होत गेले, तरी शिक्षणाच्या बाबतींत लायकरगसचेच कायदे चालू होते. इतर ग्रीक लोकांहून स्पार्टन लोकांची शिस्त व राहणी अतिशय कडक म्हणून नांवाजलेली होती, तशीच ती अजूनही चालू होती. पुरुषांच्या वर्तनाचे नियम कडक असून, त्यांस जाड्याभरड्या अन्नावर राहवें लागे. मात्र स्त्रियांच्या संबंधानें पैसे भरून ह्या कडक शिस्तीची माफी मिळविण्याची ज्यांस ऐपत असे, त्यांच्या स्त्रिया सुखांत राहून चैन करीत.

आशियांतील इराणी लोकांशीं टक्कर देण्याकरितां स्पार्टन फौजेवर अजेसिलॉसची नेमणूक झाली. त्यानें सार्डिस येथें इराणी लोकांवर मोठा जय मिळविला. आर्टाझर्झिस यास असें कळलें कीं, टिसाफर्निसनें कुचराई केल्यामुळें स्पार्टन लोकांस हा जय मिळाला. त्यावरून त्यानें टिसाफर्निस ह्यास ठार मारिलें, आणि दुसरा सेनापति नेमिला. त्या नव्या सेनापतीच्या मनांत स्पार्टन लोकांशीं सख्य करावेंसें होतें; पण आर्टाझर्झिसला तें पसंत पडलें नाहीं. तेव्हां इराणी सेनापतीनें स्पार्टन फौज परत जाण्यासाठीं एक युक्ति केली. त्यानें कित्येक ग्रीक संस्थानांकडे वकील पाठवून स्पार्टाशीं युद्ध करण्याची त्यांस भर दिली. थीब्स, कॉरिंथ व आर्गास ह्यांनीं स्पार्टावर हल्ला करण्याची तयारी केली, तरी अजेसिलॉस आशियांतून परत जाईना.

कांहीं तरी निमित्तावरून एकदां एकमेकांशीं लढण्याचें ग्रीक लोकांच्या मनांत आलें, कीं मग आपण करतों हें न्यायाचें आहे कीं

अन्यायाचें आहे, हें ते पाहात नसत. लढण्याचें मनांत आलें, कीं कांहीं तरी शुष्क सबब ते शोधून काढीत. प्रस्तुत प्रसंगीं असाच एक प्रकार घडला. दोघां संस्थानांचा कांहीं जमिनीवरून वाद होता; त्या वादांत थीब्सनें एक पक्ष स्वीकारल्याबरोबर स्पार्टानें दुसरा स्वीकारिला, आणि युद्ध सुरू झालें. स्पार्टन सेनापति लिसांडर फौज घेऊन थीब्सवर आला. थीब्सला आथेन्सनें मदत केली. बीओशिया प्रांतांत हल्याटस येथें लढाई होऊन स्पार्टन लोकांचा पराजय झाला आणि लिसांडर मारला गेला.

इकडे अजेसिलॉस ह्यानें आशियांत युद्ध चालविलें होतें, त्यात त्यास चांगलें यश मिळालें. पण मध्येंच त्यास स्पार्टातून ईफोरांचा हुकूम गेला कीं, एकदम निघून इकडील सैन्याच्या मदतीस यावें. त्याप्रमाणें थेसली प्रांतांतून तो परत येत असतां, कोरोनियाच्या मैदानांत थीबन फौजेशीं त्याची गांठ पडली; आणि तुंबळ युद्ध होऊन अजेसिलॉसला जय मिळाला. ( इ. स. पू. ३९४ ).

युद्धांत मिळालेल्या लुटीचा कांहीं भाग देशांतील एखाददुसऱ्या देवास अर्पण करावा, अशी ग्रीक लोकांत चाल होती. तीस अनुसरून वरील विजयानंतर अजेसिलॉस हा डेल्फायच्या मंदिरांत गेला; आणि तेथें आपल्या लुटीचा दहावा हिस्सा म्हणजे सुमारें पांच लक्ष रुपयांचा ऐवज त्यानें डेल्फायच्या देवास दिला. ह्याप्रमाणें देवाचा सन्मान करून त्यानें फौजेस रजा दिली, आणि आपण स्पार्टाला परत गेला.

इकडे आथेन्सचा मुत्सद्दी कॅनन ह्याचा लिसांडरनें पराभव केल्यावर तो सैप्रस येथें जाऊन राहिला होता. तो तेथून ह्या वेळच्या सुमारास आशियामायनरांत आर्टाझर्झिसकडे गेला. तेथें त्यानें त्या राजाची विनवणी करून, आथेन्सची तटबंदी पुनरपि बांधून तेथचें गेलेलें वैभव पुनः मिळवून देण्यास, त्याची मदत मागितली. ह्या कृत्यानें आपला कांहीं फायदा होईल अशा आशेनें आर्टाझर्झिस राजानें एक आरमार तयार केलें, आणि त्याजवर फार्नाबेझस यास मुख्य नेमून तें कॅननच्या बरोबर पाठविलें. ह्या दोघां सरदारांनीं स्पार्टाच्या

आरमाराचा पराभव केला. पुढें इराणी राजानें दिलेल्या पैशाची मदत घेऊन कॅनन तसाच आथेन्स येथें आला, आणि त्यानें लगेच तेथील किल्ले व तटबंदी बांधण्याची सुरुवात केली.

हा प्रकार पाहून स्पार्टन लोकांस धास्ती पडली. त्यांना वाटलें कीं आथेन्सचा पुनः वरपगडा होणार. ह्या भीतीनें स्पार्टानें आपले वकील आर्टाझर्झिसकडे पाठवून त्यास अशी विनंती केली कीं, ' आपण ग्रीस देशांतील युद्धें बंद पाडून शांतता कायम ठेवाल, तर ग्रीस देशचीं जीं शहरें आशियामायनरांत आहेत, तीं सर्व आम्ही आपल्या ताब्यांत देतों. ' स्पार्टन लोकांचा हा घाट हाणून पाडण्यासाठीं कॅननही त्याच वेळेस इराणी राजाच्या दरबारीं गेला. येथें पुष्कळ भवति न भवति होऊन, अखेरीस स्पार्टन वकिलांचें म्हणणें आर्टाझर्झिसनें कबूल केलें; आणि कॅनन ह्यास पकडून बंदींत टाकिलें. पुढें तह ठरला; त्यांत आशियामायनरांतील सर्व ग्रीक शहरें इराणी राजास कायमचीं मिळालीं, आणि त्यांचा ग्रीस देशाशीं कांहीं एक संबंध राहिला नाहीं. दुसरें असें एक ठरलें कीं, ग्रीस देशांतील लहान मोठीं सर्व संस्थानें अगदीं स्वतंत्र समजलीं जावीं; कोणत्याही प्रमुख संस्थानानें त्यांजवर ताबा ठेवूं नये. ह्या तहास अँटॅल्सिडासचा तह असें म्हणतात. अँटॅल्सिडास नांवाचा स्पार्टाचा वकील होता, त्यानें हा तह केला, म्हणून त्याचें नांव त्यास पडलें, ( इ. स. पू. ३८७ ).

---

# प्रकरण चौदावें.

## थीब्स व स्पार्टा.

( इ० स० पू० ३८७–३६२. )

स्पार्टानें इराणाशीं कसाबसा तह केला खरा; पण ग्रीक संस्थानांत एकानें दुसऱ्यावर ताबा सांगूं नये, आणि सर्वांस सारखी स्वतंत्रता असावी, असें जें तहांत कलम होतें, तें पाळण्याची स्पार्टाची

मूळपासूनच इच्छा नव्हती. स्पार्टाचा फार दिवसांचा घाटच असा होता कीं, ग्रीक संस्थानांचें प्रमुखत्व आपणाकडे असावें. हा मनोदय स्पार्टाचे मनांतून कधीं नाहींसा झाला नाहीं. अँटॅल्सिडासच्या तहानंतर एक वर्षांतच स्पार्टन लोकांनीं आर्केडियाच्या ताब्यांतील मांटिनिया शहरास वेढा घातला. त्यास कारण एवढेंच कीं आर्केडियास स्वतंत्रता पाहिजे होती. अजेसिलॉसनें मांटिनिया शहर काबीज केलें, तेव्हां तेथचे रहिवाशी शहर सोडून बाहेर गेले, आणि चार गांव नवीन स्थापून त्यांत राहूं लागले. प्रत्येक गांवांवर एक स्पार्टन अंमलदार नेमण्यांत आला.

थ्रेस प्रांतांत ऑलिंथस म्हणून एक शहर होतें. त्यानें थीब्स व आथेन्स यांजशीं दोस्ती केली, म्हणून स्पार्टाला राग आला, आणि कांहीं तरी कुरापत काढून ऑलिंथसचे हद्दींत शिरकाव करण्याचा स्पार्टानें उपक्रम केला. चार वर्षेंपर्यंत ऑलिंथसचे लोक शत्रूंशीं मोठ्या शौर्यानें लढले. पण शेवटीं त्यांचा पराभव होऊन स्पार्टाला शरण जाणें त्यांस भाग पडलें. त्यांचें शहर स्पार्टानें काबीज करून तेथें आपली फौज ठेविली. त्यांचा कांहीं प्रदेश स्पार्टानें घेतला आणि तो मासिडोनियाचा राजा अमिंटास ह्यास दिला. कारण स्पार्टा व इराण ह्यांचें जें नुकतेंच युद्ध झालें, त्यांत स्पार्टाला अमिंटासनें मदत केली होती.

पुढें थीब्सही स्पार्टाच्या ताब्यांत आलें. त्याचा प्रकार असा झाला कीं, थीब्स येथील राज्यकारभारांत दोन तट होते. असे तट बहुधा सर्वच ग्रीक राज्यांतून असत. त्या तटांचे जे मुख्य चालक असत, ते बहुतकरून दुष्ट स्वभावाचे असून स्वतःची सत्ता स्थापित करण्यासाठीं, आपल्या लोकांचे जीव बळी देण्यास अथवा देशाचें नुकसान करण्यास मागें पुढें पाहत नसत. थीब्स येथील अशान्त प्रकारच्या एका गृहस्थानें तेथचा किल्ला स्पार्टा येथील एका लष्करी अंमलदाराच्या हवालीं केला. हा लष्करी अंमलदार थ्रेस प्रांतांतील स्पार्टन लोकांची मदत घेऊन बिओशिया प्रांतांतून चालला होता. हें कृत्य स्पार्टन सरकारानें मंजूर केलें आणि थीब्स येथें स्पार्टन फौज

बंदोबस्तास ठेवून दिली. त्या वेळीं अर्थात् विरुद्ध पक्षाच्या लोकांवर स्पार्टन लोकांनीं नानातऱ्हेचे जुलूम चालू केले. तेव्हां कित्येक मृत्युमुखीं पडले; कित्येकांची जिंदगी सरकारांत जप्त होऊन त्यांस देशत्याग करावा लागला; आणि कित्येकांस जीव घेऊन पळून जावें लागलें.

अशा प्रकारें थीब्स येथील बरेच लोक पळून आथेन्स शहरीं आले. त्यांत पिलोपिडास नामक एक गृहस्थ श्रीमंत व थोर कुलांतला होता; त्याची स्वदेशावर निःसीम भक्ति होती. त्यानें हरप्रयत्न करून थीब्स प्रांत स्पार्टाचे तांब्यांतून सोडविण्याचा निश्चय केला. इपामिनोंडास नामक दुसरा एक हुशार व उच्च कुळांतला गृहस्थ पिलोपिडासचा दोस्त होता. मांटिनिया येथील वेढ्यांत इपामिनोंडासनें पिलोपिडासचा जीव वांचविला होता, त्यामुळें दोघांची दोस्ती अतिशय जमली होती. इपामिनोंडास हा एकांतांत बसून अध्ययनांत वेळ घालवीत असे. म्हणून थीब्स येथें त्याच्या वाटेस कोणी गेलें नाहीं. तेथून त्यानें आथेन्स येथील पिलोपिडास वगैरे मंडळीशीं गुप्त कारस्थान व पत्रव्यवहार चालू केला; आणि स्पार्टा येथील जुलमी अंमलदारांच्या हातून थीब्सची सुटका करण्याचा बेत जुळवून आणिला. नेमलेल्या दिवशीं पिलोपिडास आणि त्याचे साथीदार शिकाऱ्यांचा वेष घेऊन थीब्सकडे आले, आणि कोणास नकळत निरनिराळ्या वाटांनीं शहरांत शिरून, पुढील सिद्धता करण्याकरितां चारण नांवाच्या गृहस्थाच्या घरीं जमून राहिले.

इकडे थीब्स येथें फिलिडास नांवाचा एक मोठा अंमलदार असून तो वरील कटांत सामील होता. त्यानें सर्व मोठमोठ्या स्पार्टन अंमलदारांस एके दिवशीं भोजनास बोलाविलें. त्यांनीं भोजनास येण्यास अनमान करूं नये, म्हणून कांहीं बायांसही भोजनोत्तर येण्याचें आमंत्रण दिलें आहे अशी सर्वांस वर्दी दिली. हा सर्व बेत अगदीं फुटण्याच्या बेतांत आला. त्यांत सामील असलेला आथेन्सचा एक गृहस्थ घाबरून गेला, आणि त्यानें स्पार्टन गव्हर्नर आर्कियास ह्यास एक निनांवी पत्र पाठवून कटाची वर्दी दिली. फिलिडासच्या घरीं आर्कियास भोजनास बसला

असतां वरील पत्र त्यास मिळालें. परंतु मद्यपानानें तो बराच धुंदींत असल्यामुळें तें पत्र तसेंच टाकून तो म्हणाला, 'काम वगैरे सर्व उद्यां, येथें कांहीं नाहीं.' पुढें आर्कियासनें विचारिलें, 'बाया येणार त्या केव्हां?' असें म्हटल्याबरोबर बायकांचीं सोंगें घेतलेले कित्येक गृहस्थ एकदम खोलींत घुसले, आणि कमरेचे खंजीर उपसून त्यांनीं तेथील सर्व मंडळींस तेथच्या तेथें कापून टाकिलें. फिलिडासच्या घरीं हा प्रकार चालला असतां, कटांतील दुसरे कित्येक गृहस्थ शहरच्या दुकानांत शिरले. त्यांनीं दुकानांत विक्रीसाठीं असलेलीं चिलखतें अंगांत चढविलीं, शस्त्रें घेऊन ते रस्तोरस्तीं हिंडूं लागले, आणि स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं लोकांस आपणांकडे बोलावूं लागले.

पुढें नवीन राज्यव्यवस्था करण्यांत आली, त्यांत पिलोपिडास व दुसरे दोन मोठे गृहस्थ ह्यांच्या हातीं राज्यकारभार आला. त्यांस 'बिओटार्क' असें नांव होतें. 'बिओटार्क'चा अर्थ असा होता कीं, त्यांचा अंमल फक्त थीब्सवर नसून सर्व बिओशियावर होता. थीब्सचा किल्ला स्पार्टन फौजेच्या ताब्यांत होता, तो परत घेण्यासाठीं आथेन्सहून मदत आली; आणि निमूटपणें किल्ला सोडून गेल्यास स्पार्टन फौजेस त्रास पोंचणार नाहीं, असा करार होऊन किल्ला परत मिळाला. इपामिनोंडास हाही राज्यकारभार झांकणाऱ्या मंडळींत होता. तो शूर असल्यामुळें त्यास सेनापतीची जागा मिळाली.

ह्याप्रमाणें थीब्स येथील आपली सत्ता नाहींशी झालेली पाहून स्पार्टन लोकांस फारच वाईट वाटलें, आणि त्यांनीं पुनः युद्ध करण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें युद्ध सुरू झालें, तें सात वर्षें चाललें. त्यांत नानाप्रकारचे घोर व भयंकर प्रसंग घडून आले. एकदां हट्टास पेटले म्हणजे ग्रीक लोक क्रूरपणाची कमाल करून सोडीत. सात वर्षांनंतर बिओशिया प्रांतांत ल्यूक्ट्रा येथें एक लढाई झाली, तींत थीब्सच्या बाजूस इपामिनोंडास व स्पार्टाकडे तेथचा राजा क्लिओ-

टस हे मुख्य होते. थीब्सलोकांची संख्या फार थोडी होती. तरी त्यांस स्पार्टन लोकांवर संपूर्ण जय मिळाला.

ह्या परिणामानें हट्टी स्पार्टन लोकांची पूर्ण खोड मोडली. स्पार्टामध्यें ह्या पराभवाची बातमी आली, तेव्हां तेथचे लोक नेहमींच्या तऱ्हेनें मोठ्या आनंदानें कांहीं एक समारंभ साजरा करीत होते. बाहेरचे पुष्कळ लोक समारंभासाठीं शहरांत आले असून, सर्व तरुण स्त्रीपुरुष नाटकगृहांत जमून नाच, तमाशे करण्यांत दंग झाले होते. पराभवाची बातमी आली, तरी हा सर्व प्रकार तसाच चालू ठेवावा, असा 'ईफोर्स' नीं हुकूम फर्माविला, आणि लढाईंत पडलेल्या लोकांबद्दल कोणींही दुःख अगर शोक करूं नये, असा हुकूम फिरविला. मात्र पडलेल्या लोकांचीं नांवें त्यांच्या कुटुंबांस कळविण्यांत आलीं. असें सांगतात कीं, ज्यांचे मुलगे लढाईंत पडले होते, त्यांच्या आयांनीं दुसऱ्या दिवशीं आनंदी पेहराव करून देवळांत जमून देवाचे आभार मानिले, आणि एकमेकांकडे जाऊन अभिनंदन केलें. पण ज्यांचे मुलगे लढाईंतून निभावून जीव घेऊन घरीं परत आले, त्या आयांनीं मात्र घरांत बसून शोक केला.

वरील विजयानें थीबन लोकांस अतिशय आनंद झाला. त्यांनीं निकडीचे जासूद पाठवून ती बातमी आथेन्स येथें कळविली. स्पार्टन लोकांच्या कचाट्यांतून आथेन्सच्या मदतीनेंच थीब्सची सुटका झाली होती, तेव्हां वरील बातमीनें आथीनियन लोकांस आनंद होईल असें वाटलें होतें. परंतु तसा प्रकार झाला नाहीं. थीब्सचा उदय होतो हें पाहून आथीनियन लोकांस बरें वाटलें नाहीं; उलट वरील बातमीनें त्यांना वाईट मात्र वाटलें. लवकरच बिओशिया प्रांतांतील सर्व शहरांनीं थीब्सची सत्ता कबूल केली, आणि फोसिसचे लोक आपण होऊन थीब्सच्या ताब्यांत गेले, तेव्हां तर आथेन्सच्या लोकांस फारच संताप आला.

इकडे स्पार्टा व थीब्स ह्यांचें युद्ध चाललेंच होतें. आपणास आतां आथेन्सची मदत मिळणार नाहीं हें पाहून, थीब्सनें थेसलीच्या राजा जेसोन ह्याजबरोबर स्नेह जोडण्याचा विचार करून, स्पार्टाशीं

लढण्यासाठीं त्याची मदत मागण्यास त्याजकडे आपले वकील पाठविले. जेसोन पराक्रमी व हुशार होता, पण तोही जबर महत्त्वाकांक्षी आहे अशी थीब्सची लवकरच खात्री झाली. त्यानें थीब्सचें आमंत्रण खुषीनें कबूल केलें, मात्र पोटांतला उद्देश हा कीं थीब्सलाच घशांत टाकावयाचें. तो फौज घेऊन बिओशिया प्रांतांत आला खरा; पण स्पार्टन लोकांशीं लढण्याकरितां तो थीब्स संस्थानांत आला नाहीं. स्पार्टन फौज ल्यूक्ट्रा येथेंच होती. अशा स्थितींत जेसोननें शिष्टाई सुरू करून दोनही पक्षांस तह करण्याची सल्ला दिली; आणि स्वतः पुष्कळ खटपट करून तह जुळवून आणिला. तह झाल्यावर स्पार्टन फौज स्वदेशीं परत गेली.

जेसोनच्या ह्या वर्तनानें त्याच्याविषयीं लोकांच्या मनांत नानाप्रकारचे कुतर्क उत्पन्न झाले आणि ते पुढें खरे ठरले. ग्रीस देशांत पार्थियन खेळ चालत, तेथचें अग्रस्थान आपणास मिळावें असा त्यानें आग्रह धरिला. त्याचा अर्थ असा कीं, ग्रीस देशांत आपणाहून कोणी वरचढ नाहीं असें तो समजूं लागला. त्यानें आपल्या लोकांकडून त्या समारंभांतील यज्ञांत अर्पण करण्याकरितां बकरे, मेंढे, डुकर वगैरे अकरा हजार जनावरें जमविलीं, आणि मोठा थाट व आपल्या सत्तेचें प्रदर्शन करून, समारंभास येण्याचा त्यानें बेत केला. पण समारंभ होण्याच्या थोडे दिवस अगोदर जेसोनचा खून झाला; तेणें करून ग्रीक संस्थानें त्याच्या घशांत पडण्याचें थोडें लांबणीवर गेलें. सर्व ग्रीस देश एकछत्री अंमलाखालीं आणण्याचें काम पुढें मासिडोनियाच्या फिलिप राजानें सिद्धीस नेलें.

जेसोनच्या मृत्यूनंतर थीब्स व स्पार्टा यांचें पुनः युद्ध जुंपलें. अजेसिलॉस ह्यानें आर्केडिया प्रांतावर स्वारी करून तो प्रांत उद्ध्वस्त केला. हा आर्केडिया प्रांत पेलापोनेससचा चराऊ प्रदेश असून, पाननामक गुरांच्या देवतेचा म्हणून ठरलेला होता. हा पानदेव धनगरांस पूज्य असे. अजेसिलॉस ह्यानें आर्केडिया प्रांतांत जो दंगा केला, त्याचा सूड थीब्स आणि आर्केडिया ह्यांच्या फौजांनीं चांगलाच उगविला. ह्या फौजा लॅकोनिया प्रांतांत शिरल्या, आणि वाटेनें स्पार्टाच्या मुलखांत

लुटालूट करून खेडींपाडीं व श्रीमंतांचे बागबगीचे मोडून, सर्व प्रकारचा विध्वंस करीत स्पार्टावर आल्या. पण स्पार्टाच्या फौजेशीं समोसमोर लढाई झाली नाहीं. उभयतांनीं एकमेकांस वाटेल तसा त्रास देण्याचा क्रम चालविला.

मेसेनिया प्रांतातले लोक हद्दपार झाले होते, त्यांस त्यांचा देश ह्या युद्धांत परत मिळाला. सुमारें तीनशें वर्षांपूर्वी त्यांचा देश स्पार्टानें जिंकला होता आणि ते हद्दपार झाले होते. जे देश सोडून गेले, ते बहुतेक आर्केडिया प्रांतांत व नजीकच्या बेटांत जाऊन राहिले; आणि त्यांचे वंशज अद्यापि स्वदेशास मुकून, परक्या ठिकाणीं राहणाऱ्या लोकांसारखे वर्तत होते. मेसेनिया प्रांतावर आपला हक्क आहेसें वाटे, तसें त्यांस त्या नवीन प्रांतांविषयीं वाटत नसे. इपामिनोंडास जेव्हां आर्केडिया प्रांतांत आला, तेव्हां हे लोक भराभर त्यास येऊन मिळाले; आणि त्यानेंही त्यांस आपणाकडे बोलावून आपला मूळचा देश परत मिळविण्याविषयीं त्यांस भर दिली. त्यांच्या मदतीनें त्या लोकांनीं मेसेनिया प्रांत परत जिंकून घेतला आणि तेथें पुनरपि ते येऊन राहूं लागले. इपामिनोंडासनें मेसान शहर नवीन स्थापिलें. त्याच्या तटांचें बांधकाम इतकें सुंदर व मजबूत होतें कीं, पुढील काळीं त्याची फार वाखाणणी होऊं लागली. हा किल्ला आथोम टेंकडीवर बांधलेला होता. त्याचे कांहीं अवशेष अद्यापि दिसून येतात.

मेसेनिया प्रांत वरप्रमाणें जिंकल्यामुळें थीब्सला एक नवीन साह्यकारी मित्र मिळाला, आणि स्पार्टाच्या ताब्यांतील निम्मा प्रदेश नाहींसा झाला. ह्यामुळें थीब्सचें महत्व वाढलें, आणि इपामिनोंडासचा मोठेपणा आथेन्सला सहन झाला नाहीं. आथेन्सनें स्पार्टाशीं सख्य जोडिलें. एवंच थीब्सला अडविण्याकरितां आपल्या जुन्या शत्रूंशीं स्नेह जोडण्यास आथेन्सच्या सरकारास आशंका वाटली नाहीं. ग्रीस देशावर थीब्सचा ताबा होऊं नये असा आथेन्सचा उद्देश होता. बाकी इपामिनोंडास व पिलोपिडास ह्यांचा हेतु थीब्सला वर आणण्याचा होता ह्यांत संशय नाहीं.

त्याबरोबर युद्ध चालू झालें. ल्यूक्ट्राच्या लढाईनंतर दहा वर्षांच्या आंत थीब्सचे दोनही योद्धे पडले: पिलोपिडास थेसली प्रांतांत लढतांना पडला, व इपामिनोंडास आर्काडिया प्रांतांत मॅंटिनियाच्या लढाईत पडला, (इ. स. पू. ३६२). इपामिनोंडासच्या मृत्यूनंतर लवकरच स्पार्टाचा राजा अजेसिलॉस हा चौऱ्यांशीं वर्षांचा होऊन मरण पावला. त्यानें चाळीस वर्षें स्पार्टा येथें राज्य केलें. एवढ्या अवधींत जीं युद्धें झालीं, त्यांत त्यानें नेहमीं विजय संपादिले. इजिप्ट येथील गादीबद्दल तंटा लागला असतां, एका हक्कदाराच्या तर्फेनें त्या देशांत जाऊन तेथें युद्ध करून त्यानें आपला हेतु तडीस नेला; आणि तेथून परत येत असतां तो मरण पावला. अजेसिलॉस हा त्या वेळचा अतिशय शूर व समंजस योद्धा म्हणून नांवाजलेला आहे. तो शत्रूंशीं फार सौम्यपणानें वागे; आणि ह्या त्याच्या चांगुलपणाच्या अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. एकदां कॉरिंथशीं लढत असतां, कॉरिंथच्या कित्येक हरामखोरांनीं तें शहर एकदम हल्ला करून हस्तगत करण्याची मसलत अजेसिलॉस ह्यास दिली. पण त्यानें ती गोष्ट कबूल केली नाहीं. तो म्हणाला, 'एका ग्रीक शहरानें दुसऱ्यास शिक्षा करणें जरी योग्य असलें, तरी दुसऱ्याचा समूळ नाश करणें केव्हांही योग्य होणार नाहीं.'

## प्रकरण पंधरावें.

### मासिडोनियाचा फिलिप.

(इ. स. पू. ३६२–३५७.)

इपामिनोंडासच्या मृत्यूनें थीब्सचे सर्व मनोरथ ढांसळले. त्यामुळें आथेन्सलाही आपलें गतवैभव थोडेंसें परत मिळविण्यास संधि सांपडली. अलीकडे सर्व ग्रीक संस्थानें एकसारखीं युद्धें करून दुर्बल मात्र झालीं. कोणालाही वर डोकें काढण्याचें त्राण राहिलें

नाहीं. तसेंच एकादा परस्थ शत्रू त्यांजवर चालून आला तर त्याजबरोबर टक्कर मारण्याचेंही सामर्थ्य त्यांस राहिलें नाहीं. अशा प्रकारचा एक शत्रु लवकरच त्यांजवर चालून आला, तो मासिडोनियाचा राजा फिलिप हा होय.

ग्रीसच्या उत्तरेस मासिडोनिया प्रांत आहे. प्राचीन काळीं त्या प्रांतात अनेक लहान लहान सरदार राहत, आणि आपापल्या ताब्यांतील टापूंवर स्वतंत्रपणें राज्य करीत. त्या प्रांतांत मोठीं शहरें फारशीं नव्हतीं. पेला म्हणून एकच शहर होतें; तेथील राजास ग्रीक वसाहतवाले खंडणी देत.

मासिडोनियाची राज्यपद्धति फारशी व्यवस्थित नव्हती, आणि लोकही विशेष सुधारलेले नव्हते. बरेच लोक स्वतंत्र होते, पण त्यांचे बहुतेक हक्क फौजेच्या हातांत होते. म्हणून तेथची राज्यपद्धती केवळ लष्करी धोरणावर चालली होती असें म्हटलें तरी चालेल. राजा म्हणजे केवळ फौजेचा मुख्य असून विशेष प्रसंगाशिवाय, त्याला राजचिह्नेंही नव्हतीं. गादीविषयीं नेहमीं तंटे चालू असत. राजा दुसरा अमिंटास (Amyntas) मरण पावल्यावर, त्याचा धाकटा मुलगा फिलिप हा एका अल्पवयी पुतण्याच्या नांवानें राज्यकारभार पाहूं लागला. ह्या अल्पवयी मुलाचा बाप इलिरियन लोकांशीं लढतांना मारला गेला होता. फिलिप हा लहानपणीं थीब्स येथें राहून ग्रीक लोकांच्या तत्कालीन विद्येंत निपुण झालेला होता. ग्रीक लोकांच्या राज्यकारभाराची व युद्धाची पद्धत त्यानें चांगली अवलोकन केली होती. त्यामुळें मासिडोनियाचा कारभार पाहत असतां, तेथें त्यानें ग्रीक लोकांच्या धर्तीवर नानाप्रकारच्या सुधारणा केल्या. त्यानें विशेषत: लष्कराची पद्धत सुधारली. फौजेचे चौकोनी संघ उभे करून लढण्याची कला त्यानें अमलांत आणिली असें सांगतात. पण त्याच्याही पूर्वीं ही पद्धत ग्रीक लोकांस ठाऊक होती, मात्र थीब्स येथें ती पद्धत फिलिप प्रथम शिकला, असें आतां सिद्ध झालें आहे.

इ. स. पू. ३५९ ह्या वर्षीं पुतण्यास बाजूस सारून फिलिप राज्यावर आला. त्या वेळचे लोक अर्धवट सुधारलेले असल्यामुळें, त्यांजवर छाप बसविण्याजोगी त्याची शारीरीक व मानसिक योग्यता होती. त्याचा बांधा सुबक, मुद्रा भव्य व छाप बसविणारी होती. त्याची बुद्धि विलक्षण असून, तो उद्योगी, दमदार, धोरणी व उत्कृष्ट बोलणारा होता. त्याचा स्वभाव धूर्त, आनंदी व बेफिकीर असा असून, त्याची वागणूक मिठी असल्यामुळें लोकांस तो अतिशय प्रिय होता. पुतण्यास त्यानें राज्यावरून काढलें, पण त्यास त्रास न देतां ममतेनें वागविलें; आणि त्यास चांगलें शिक्षण देऊन आपल्या मुलीशीं त्याचें लग्न केलें.

फिलिप गादीवर आल्या वेळेपासून, ह्या सर्व ग्रीस देश आटोक्यांत आणणार हें सर्वांस लवकरच कळून चुकलें. ही गोष्ट तो केवळ लढून करणार होता असें नाहीं, तर हलके हलके संधि येईल त्याप्रमाणें आपली सत्ता व वजन वाढवीत जाण्याचा त्यानें क्रम आरंभिला. तो स्वतः शूर योद्धा होता; तरी त्यास युद्धाचा तिटकारा वाटत असे. युद्धानें राष्ट्राचें अतिशय नुकसान होतें; व शांततेनें काम केलें असतां आपले हेतु सिद्धीस जाऊन राष्ट्राची शक्ति वाढते, हें तो जाणून होता. म्हणून जोंपर्यंत शांतपणानें आपला कार्यभाग उरकतो आहे, तोंपर्यंत नाहक युद्धांत पडणें त्यास आवडत नसे. तो शूर, दयार्द्र अंतःकरणाचा व सौम्य स्वभावाचा होता. म्हणून त्यानें जिंकलेले बहुतेक लोक मोठ्या आनंदानें त्याच्या ताब्यांत राहत असत. लष्करच्या शिस्तींत मात्र तो फार कडक असे. एका शिपायानें थंड पाण्यानें आंघोळ न करितां ऊन पाण्यानें केली, आणि दुसऱ्या एकानें रस्त्यांत थांबून मद्यप्राशन केलें, म्हणून त्या दोघांसही त्यानें कडक शिक्षा केल्या असें लिहिलेलें आहे.

फिलिफनें राज्यपद धारण केल्याबरोबर राज्यावर हक्क सांगणारे दोन इसम त्यास आडवे आले. एकास थ्रेसच्या राजाचा पाठिंबा असून दुसऱ्यास आथेन्सची मदत होती. पहिल्यास गोड गोड थापा देऊन व लांच चारून, त्यानें गप्प बसविलें, आणि येणेंप्रमाणें

एक शत्रु थंड झाल्याबरोबर दुसऱ्याशीं लढून त्याचा चांगलाच समाचार घेतला. त्या वेळीं पुष्कळ ॲथीनियन लोक कैद होऊन त्याच्या हातांत सांपडले. ह्या कैद्यांस त्यानें मोठ्या सन्मानानें वागविलें, आणि दंड न घेतां सोडून दिलें. ते परत आथेन्सला जाऊन फिलिपच्या औदार्याविषयीं वाखाणणी करूं लागले; पुढें लवकरच आथेन्सच्या सरकारानें आपले वकील फिलिपकडे पाठवून त्याजबरोबर सख्य संपादिलें.

ह्या वेळीं आथेन्स येथील लोकांच्या रीतीभातींत पहिल्याहून पुष्कळच फरक पडला होता. पूर्वीं प्रत्येक इसमास सरकारच्या फौजेंत नोकरी करावी लागे; पण हल्लींच्या फौजेंत सर्व भरणा भाडोत्री लोकांचा होता. हे लोक वाटेल त्या देशांतले असून, फक्त पैशासाठीं नोकरी करीत. त्यांस स्वतःचा किंवा आथेन्सचा अभिमान बिलकुल वाटत नव्हता. बहुतेक लोकांस कोर्टांत न्यायाचे कामीं अभिप्राय देण्यासाठीं जावें लागे, त्याबद्दल त्यांस जी कांहीं थोडी बहुत प्राप्ति होई, तीवर किंवा गरिबांस निर्वाहासाठीं सरकारांतून मदत मिळे त्यावर संतुष्ट राहून, लोक आळसानें आपली गुजराण करीत.

लोकांस स्वतःचा उद्योगधंदा कांहीं नव्हता. ते सर्व प्रकारचीं कामें गुलामांकडून करून घेत. तेणेंकरून, व भाडोत्री शिपायांचा भरणा लष्करांत झाल्यामुळें, लोकांस दरिद्रावस्था आली. युद्ध चालू नसे तेव्हां समुद्रावर चांचे लोकांचा व देशांत चोरांचा उपद्रव अतिशय होई, सर्व ग्रीक संस्थानांच्या फौजा लुटारू बनल्या. त्यांस लढाईचें काम नसे; तेव्हां खुशाल ते देशभर लूट करीत फिरत. तसेंच पूर्वींच्या काळीं राज्यकारभार हांकणारे पुरुष स्वतः कसलेले योद्धे असत. आतां हा प्रकार अगदीं बदलून गेला. सेनेटचे बहुतेक लोक युद्धकलेंत वाकब नसून, फौजेंतले अधिकारी सेनेटचें काम जाणीत नसत. राज्यांतल्या प्रमुख लोकांस शिपाई होण्याचेऐवजीं वक्ता होण्याची हांव वाटूं लागली. वक्तृत्वकलेचें महत्त्व अतिशय वाढून, तें विद्वत्तेचें प्रधान अंग झालें. त्याचप्रमाणें आरमाराची पूर्वींची पद्धत बिघडून पुष्कळ नुकसान झालें. श्रीमंत

लोकांस आरमारांत नोकरी करण्याची फरज असे, ती बंद होऊन त्यांस बदली देण्याची सवलत मिळाली; आणि जहाजांचा एक वर्षाचा सर्व खर्च त्यांजलाच द्यावा लागत असल्यामुळें, ते जहाजांवरील अंमलदार मिळतील तितके स्वस्त पाहूं लागले, मग ते त्या कामास लायक असोत वा नसोत. सारांश, लष्कर काय किंवा आरमार काय, एकही पूर्वीप्रमाणें लायक नव्हतें. ह्याचें वास्तविक कारण असें होतें कीं, आथेन्सचा पूर्वीचा शूर बाणा सर्व अस्तास गेला होता आणि ऐषआरामानें व आळसानें सर्व समाज बिघडला होता.

ग्रीक राष्ट्रांची ही स्थिति आयतीच फिलिपच्या पथ्यावर पडली. पण त्यानें उतावळेपणा केला नाहीं. उलटपक्षीं, आपणास खात्रीनें यशप्राप्ति होईल असें दिसून येईपर्यंत, त्यानें आथेन्सला आपल्याच भ्रमेंतच स्वस्थ राहूं दिलें. त्यानें आपला उद्योग मोठ्या खुबीनें चालविला. त्याच्या राज्यांत समुद्रकिनारा मुळींच नव्हता. म्हणून आंफिपोलिस बंदर आपल्या ताब्यांत घेण्याची त्याची फार इच्छा होती. कारण तें बंदर व्यापाराच्या सोयीचें होतें, हें एक, व दुसरें तेथील जंगलांत गलबतांस उपयोगी पडणारें लांकूड विपुल होतें. ह्या उद्देशानें आंफिपोलिसशीं लढण्यास त्यानें लवकरच सबब उकरून काढिली. तें बंदर पूर्वी आथेन्सच्या ताब्यांतलें होतें. 'तें जिंकून मी तुम्हांस परत देतों,' अशी त्यानें आथेन्सची समजूत केली. त्याच्या बोलण्यावर आथेन्सच्या सरकारानें विश्वास ठेविला. पुढें त्यानें आंफिपोलिस जिंकिलें, आणि तें आथेन्सला न देतां स्वतःचेच ताब्यांत ठेवून आथेन्सला सांगून पाठविलें कीं, 'हें शहर मीं जिंकलें त्यापूर्वी आथेन्सच्या ताब्यांत नव्हतेंच, तेव्हां आतां तें मीं आपल्या ताब्यांत ठेविल्यानें आथेन्सचें कांहीं नुकसान नाहीं.' अशा रीतीनें त्यानें आंफिपोलिस मासिडोनियाच्या राज्यांत सामील केलें. तथापि तेथील प्रजासत्ताक राज्यपद्धति पहिल्याप्रमाणेंच त्यानें पुढें चालविली.

आंफिपोलिस जिंकल्यानंतर लवकरच थेसलीच्या लोकांनीं फिलिपची मदत मागितली. तेथची सर्व सत्ता तीन जुलमी गृहस्थांनीं

हरण केली होती. ते वाटेल तो जुलूम लोकांवर करीत. फिलिप थेसलींत गेला, त्या जुलमी गृहस्थास त्यानें कारभारावरून काढिलें; आणि थेसलींतील शहरांस स्वतंत्रता दिली. ह्या मदतीबद्दल थेसलांच्या लोकांनीं त्यास आपला कांहीं वसूल तोडून दिला, आणि आपलें आरमार त्याच्या उपयोगास दिलें. पुढें ऑलिंथियन लोकांनींही त्याचा आश्रय संपादिला. थ्रेस प्रांतांत त्यानें कित्येक प्रदेश मिळविले. त्या प्रदेशांत सोन्याच्या खाणी होत्या. तेथें त्यानें नवीन शहर बांधून त्यास फिलिपि असें नांव दिलें, आणि तेथें आपलें लष्करी ठाणें वसविलें.

थेसली प्रांतांतील कामगिरी संपविल्यावर, एपिरसच्या राजाची मुलगी ऑलिंपियास इच्याशीं फिलिपनें लग्न लाविलें. एपिरसचें राज्य थेसलांच्या हद्दीवर होतें. पुढें थ्रेस प्रांतात लढत असतां, इ. स. पू. ३५६ वे वर्षीं पेला येथें त्याची बायको प्रसूत होऊन मुलगा झाला, तोच प्रसिद्ध अलेक्झांडर होय.

ह्या वेळेस आथेन्स, व र्‍होड्स बेट व दुसरे प्रांत ह्यांजमध्यें निरर्थक युद्ध चालून राहिलें होतें. हे प्रदेश नांवानें आथेन्सच्या ताब्यांत होते, आणि त्यांजकडून आथेन्सला खंडणी मिळत असे. दोन वर्षे युद्ध चालून आथेन्सचा हेतु सिद्धीस न जातां, र्‍होड्स, कॉस, किऑस व बायझांटियम ह्या प्रदेशांवरील सर्व हक्क आथेन्सला सोडून द्यावे लागले. ह्यांस ' आपसांतील युद्ध ' म्हः यादवी असें नांव इतिहासांत आहे.

मध्यंतरीं दुसरें एक निकराचें युद्ध ग्रीस देशांत सुरू होऊन त्यामुळें फिलिपच्या मनोरथास पुष्कळ पोषण मिळालें. तरी बराच वेळपर्यंत फिलिपनें आपली तटस्थ वृत्ति सोडिली नव्हती. त्या युद्धास ' धार्मिक ' युद्ध असें नांव आहे. कारण डेल्फायच्या मंदिराची व्यवस्था कोणाकडे असावी, थीब्सकडे, कीं फोसिसकडे, ह्याबद्दल तें युद्ध सुरू झालें होतें. त्याचा प्रकार असा होता कीं, फोसिस संस्थानांत ' सिऱ्हायन ' नांवाचें एक मैदान होतें. येथें शेंकडों वर्षे लागवड सुरू असून, तें मोठें सुपीक असल्यामुळें लोकांस

त्याजपासून मोठी किफायत असे. थीब्सच्या लोकांनीं अशी एक सबब पुढें आणिली कीं, हें मैदान डेल्फायच्या मंदिराकडे पूर्वापार लावून दिलेलें असल्यामुळें, ह्या पवित्र प्रदेशावर खासगी उत्पन्नाची शेती करून फोशियन लोकांनीं देवाचा मोठा अपमान केला आहे. ही सबब अगदींच निराधार नव्हती. त्यास कांहीं जुन्या दंतकथेचा आधार होता; पण तो पोकळ होता, आणि ही जागा अपॉलोच्या मंदिरास दिलेली आहे असा प्रत्यक्ष पुरावा कांहींच नव्हता. पण राज्यकारभार पाहणाऱ्या सभेनें हुकूम केला कीं, ह्या जागेंत फोशियन लोकांनीं शेती करूं नये, आणि आजपावेतों देवालयाच्या जमिनींत स्वतःच्या उपजीविकेचें धान्य पिकविल्याबद्दल देवास दंड द्यावा. हा हुकूम फोशियन लोकांनीं मानिला नाहीं, तेव्हां युद्ध जुंपलें. फोसिसला मदत स्पार्टाची असून थीब्सला थेसलीची होती. हें युद्ध इ. स. पू. ३५७ त सुरू झालें.

फिलोमिलस नांवाचा एक श्रीमान गृहस्थ फोसिसचा सेनापति होता. त्यानें डेलफायचें मंदिर आपल्या ताब्यांत घेतलें. त्यावरून थीब्सच्या लोकांनीं मोठा गवगवा करून सर्व ग्रीक संस्थानांस पाचारण करून सांगितलें कीं, 'पहा! फोशियन लोक मंदिरासंबंधीं हें केवढें पाप करीत आहेत!' फिलोमिलसनें युक्ति करून डेल्फायच्या देवाकडून आपल्या तर्फेचा कौल मिळवून, डेल्फायचें मंदिर रक्षण करण्याचा हक्क फोशियन लोकांचा आहे, असें जाहीर केलें. पुढें दोन वर्षें पावेतों तो मोठ्या शौर्यानें लढला. नंतर तो लढतांना मारला गेला, आणि त्याच्या जागीं त्याचा भाऊ ओनोमार्कस याची नेमणूक झाली.

डेल्फायच्या मंदिरांतील जिंदगीस आपण हात लावणार नाहीं, असें फिलोमिलसनें वचन दिलें होतें, तथापि थोडीबहुत जिंदगी त्यानें लांबविली; आणि ह्या कामीं ओनोमार्कसनें तर भावाच्या वर कडी केली. डेल्फाय येथील संपत्तीनें त्यानें आपल्या लष्करचें देणें भागविलें, आणि त्याच्या मदतीस आलेल्या आथीनियन व स्पार्टन लोकांनींही ह्या पवित्र मंदिरांतील धनाचा अपहार करण्यास कमी केलें नाहीं.

बराच वेळ ह्या युद्धांत फिलिप सामील झाला नाहीं. तो दुसरीकडे आपली सत्ता वाढविण्याच्या नादांत असून, आर्थीनियन लोकांचें एक बंदर त्यानें कबजांत घेतलें, आणि फोसिसच्या पक्षांतील एक योद्धा थेसली प्रांतांत प्रमुख होता, त्याचा पराजय करून थेसलींत आपली सत्ता वाढविली. तदनंतर थ्रेस, इलिरिया, व मासिडोनियाच्या बाजूचीं दुसरीं कित्येक रानटी राष्ट्रें बुडवून आपल्या अंमलाखालीं आणिलीं. तसेंच पुष्कळ जहाजें बांधून आपलें आरमार व लष्कर वाढविलें. मासिडोनिया प्रांतांत मोठमोठीं सरदार घराणीं होतीं, त्यांची आपल्यावर भक्ति बसावी, म्हणून त्यांचे होतकरू मुलगे फिलिपनें आपल्या दरबारीं शिक्षणाकरितां ठेवून घेतले. तेथें त्यांस नानाप्रकारचीं दरबारी व युद्ध कलेचीं कामें, तसेंच ग्रीक वाङ्मय व तत्त्वज्ञान इत्यादि शिकवून तयार केलें. अशा रीतीनें शिक्षण देऊन तयार केलेल्या कुलीन सरदारांची त्यानें आपल्या खासपागेंत भरती केली; आणि त्यांचा पाहरा नेहमीं आपल्या जवळ ठेविला. अशा प्रकारें शिक्षण मिळविल्याशिवाय राज्यांतील मोठमोठ्या जागा कोणासही मिळूं नयेत, अशी त्यानें योजना केली.

---

## प्रकरण सोळावें.

### फिलिपचे विजय.

(इ. स. पू. ३५७ ते ३३६).

ग्रीस देशांत हें 'धार्मिक युद्ध' सुरू झालें, त्या सुमारास आथेन्स येथें डेमॉस्थेनिस नांवाचा एक प्रसिद्ध वक्ता राहत होता. त्याचा बाप तलवारी करण्याचा धंदा करीत असे. त्या धंद्यांत पुष्कळ पैसा मिळवून त्यानें तो मरणसमयीं आपल्या मुलास दिला; पण त्या वेळीं ह्या मुलाचें वय फक्त सात वर्षांचें असल्यामुळें, बापानें मुलाचा व जिंदगीचा सांभाळ करण्याकरितां तीन पालक नेमिले. परंतु ह्या पालकांनीं आपलें काम विश्वासूकपणानें केलें

नाहीं. त्यांनीं पैशाची इतकी उधळपट्टी केली, कीं मुलगा वयांत आला तेव्हां पोटासाठीं कांहीं तरी उद्योग केल्याशिवाय त्यास गत्यंतर नव्हतें. म्हणून त्यानें वक्तृत्वकलेचा अभ्यास केला; आणि हल्लीं जसे बारिस्टर काम करतात तसें काम तो करूं लागला. समाजापुढें येऊन चांगलें बोलतां यावें म्हणून त्यानें अतिशय मेहनत व उद्योग केला. असें सांगतात कीं, प्रथम तो फार भित्रा असे. तो बोलतांना अडखळे; आणि त्यास आपले खांदे उडविण्याची वाईट खोड होती. हे सर्व दोष अत्यंत परिश्रम करून त्यानें घालविले. ह्या श्रमांचा मोबदला त्यास एवढा मिळाला कीं, त्या वेळच्या प्रसिद्ध वक्त्यांत व मुत्सद्यांत त्याचें नांव पहिलें आलें, आणि अजूनही त्याची कीर्ति अजरामर आहे.

डेमॉस्थेनिस वयांत आला तेव्हां त्यानें एका पालकावर फिर्याद मांडिली; आणि ती त्यानें स्वतः चालवून दाखविली. त्यांत त्याचें काम इतकें चांगलें वठलें कीं, विरुद्ध पक्षास सरकारानें दहा टालेंट म्हणजे सुमारें पन्नास हजार रुपये दंड केला. ह्या व इतर कामांत त्याच्या वक्तृत्वाची मोठी ख्याति झाली. पुढें तो राज्यकारभार हांकणाऱ्या सभेंत भाषणें करूं लागला, तेव्हां त्याची चांगलीच प्रसिद्धि होऊन, आथेन्सच्या प्रमुख मंडळींत त्याची गणना होऊं लागली.

आथेन्स येथें डेमॉस्थेनिसनें एक मोठें काम केलें. मासिडोनियाचा राजा फिलिप हळू हळू आपली महत्त्वाकांक्षा वाढवीत आहे, तो उत्तरोत्तर सर्व ग्रीस देश आक्रमून टाकणार, त्याचा प्रतीकार करण्यासाठीं सर्व ग्रीक संस्थानांनीं व विशेषतः आथेन्सनें कंबर बांधून तयार झालें पाहिजे, अशा प्रकारची इशारत त्यानें आपल्या जोरदार वक्तृत्वानें सर्व मंडळीस दिली. ह्या विषयावर त्यानें केलेलीं भाषणें फिलिपिक्स म्हणून प्रसिद्ध असून, आजकाल हयात असलेले वक्तृत्वाचे उत्कृष्ट मासले म्हणून त्यांची प्रसिद्धि आहे. आथिनियन सरकारचीं कांहीं बेटें फिलिपनें लुटलीं, आणि यूबियाच्या बंदरांतून आथेन्सचीं मालाचीं कांहीं गलबतें त्यानें

पकडून नेली. ह्या योगानें आलिंथियन लोकांस भीति पडली कीं, फिलिपची गदा आतां आपणांवर येणार. ह्या भीतीनें फिलिपशीं केलेला तह मोडून आलिंथियन लोकांनीं आथेन्सशीं तह केला, आणि प्रसंग पडल्यास आथेन्सनें आपणांस मदत करावी अशी सिद्धता करून ठेविली. त्याबरोबर फिलिपनें आलिंथियन लोकांशीं युद्ध सुरू केलें. त्यांचीं कित्येक शहरें एकदम काबीज करून त्यानें आलिंथसला वेढा घातला. नंतर आलिंथियाच्या राज्यमंडळींतील दोन सभासदांस लांच वगैरे साधनांनीं फोडून, त्यांच्या विश्वासघाताचा उपयोग करून, फिलिपनें आलिंथिया शहर काबीज केलें. तेथच्या लोकांस पकडून त्यानें मासिडोनियास नेल्यावर त्यांची विटंबना केली; आणि अधिकारी आपणांस वाईट रीतीनें वागवितात, अशी त्यांनीं फिलिपकडे तक्रार केल्यावर तो म्हणाला. "आमचे लोक काय केवळ अशिक्षित व भाबडे आहेत; त्यांस लपंडाव मुळींच माहीत नाहीं. असेल तसें खरें बोलतील."

फिलिपनें आलिंथस शहर मोडून तेथच्या लोकांस गुलाम म्हणून विकिलें. त्यांच्या जमिनी घेऊन त्या त्यानें आपल्या लष्करांतील अंमलदारांस वांटून दिल्या. तेणेंकरून मासिडोनिया प्रांत व समुद्र यांजमधील समग्र द्वीपकल्प त्याच्या ताब्यांत येऊन त्याचें राज्य सलंग झालें. थेसलीच्या हद्दीवर डायम म्हणून शहर होतें, तेथें देवीच्या नांवानें मोठा उत्सव करून, वरील विजयाबद्दल त्यानें लोकांत मोठ्या थाटानें मिरवणूक काढिली.

पुढें थोड्याच दिवसांत आथेन्सचे वकील पेला येथें फिलिपकडे आले, आणि आथीनियन लोक कैदी झाले होते त्यांस सोडविण्याच्या दंडाची बोलाचाली करूं लागले. फिलिप म्हणाला, 'अथीनियन लोकांशीं तंटा करण्याची आमची इच्छा नाहीं; कांहीं झालें तरी आथेन्सशीं सख्य ठेवण्याचा आमचा संकल्प आहे.' तदनुसार त्यानें आपले तीन वकील तह करण्यासाठीं आथेन्स येथें पाठविले. ते आथेन्सला आले त्या दिवशीं डायोनिसिक उत्सव चालू होता. शहरांत बाहेरच्या लोकांची दाटी झाली होती; आणि लोक मजा मारण्यांत दंग झाले

होते. अशा संधीस परकी वकील आले म्हणजे एकाद्या थोर गृहस्थाच्या घरीं त्यांचा सत्कार करण्याचा त्या वेळीं प्रघात होता; तदनुसार डेमॉस्थेनिस ह्यानें वकिलांचा पाहुणचार आपल्या घरीं करण्याचें पत्करिलें. त्याप्रमाणें त्यानें त्यांचा उत्कृष्ट सत्कार केला आणि इ. स. पूर्वीं ३४६ ह्या वर्षीं तह झाला.

ह्या तहानंतर लगेच फिलिपनें थ्रेस प्रांत जिंकिला, त्यामुळें हेलेस्पांट समुद्रावरील नाक्याची जागा त्याच्या ताब्यांत आली.

इकडे धार्मिक युद्ध चालूच होतें. फिलिप त्यांत पडला नव्हता. दूर राहून योग्य संधीची तो प्रतीक्षा करीत होता. अशी संधि लवकरच आली. थर्मापिलीच्या खिंडींतून तो आपली फौज घेऊन फोसिसच्या मुलखांत उतरला. तेथें त्यास थीब्सची फौज येऊन मिळाली. फोशियन लोक लगेच शरण आले. प्रमुख पुढाऱ्यांनीं देश सोडून बाहेर जाण्याची परवानगी मागितली, ती त्यांस मिळाली. बाकीच्या लोकांनीं स्वतःसाठीं कांहीं एक न ठेवितां शहर त्यांचे हवालीं केलें; आणि स्वतः ते त्याच्या स्वाधीन झाले. त्यांचें काय करावें हें ठरविण्याकरितां त्यानें आंफिक्टियोनिक सभा भरविली. तींत असें ठरलें कीं, लोकांनीं आपले सर्व घोडे व हत्यारें देऊन टाकावीं; आबीखेरीज बाकींचीं सर्व शहरें मोडून टाकावीं; लोकांनीं जाऊन निरनिराळ्या गांवांत राहावें; एका गांवांत पन्नासांहून ज्यास्त कुटुंबांनीं राहूं नये. डेल्फायची संपत्ति फोशियन लोकांनीं हरण केली होती; तिचा अजमास पंचांच्यामतें दहा हजार टॅलेंट ठरला, तो भरून येईपर्यंत दरसाल साठ टॅलेंट दंड देत जावा. आंफिक्टिओनिक सभेंत बसण्याचा त्यांचा हक्क काढून फिलिपनें तो आपल्या मासिडोनियन लोकांस दिला; आणि मासिडो-नियन लोकांस ग्रीक समजावें असा ठराव केला. पायथियन खेळांत अग्रस्थान फिलिप यास मिळून आंफिक्टिओनमध्यें स्वतः बसण्याचा त्यानें क्रम सुरू केला.

पुढें सर्व ग्रीस देश व विशेषतः पिलापोनेसस प्रांत आक्रमण करण्याची त्यानें सुरुवात केली. पिलापोनेससच्या लोकांस त्यानें

असें भासविलें कीं, 'मी स्पार्टापासून तुमचें रक्षण करितों.' हा कावा आथेन्सच्या लोकांस समजून त्यांनीं पिलापोनेससच्या लोकांची भुरळ दूर करण्यासाठीं डेमॉस्थेनिस ह्यास त्यांजकडे पाठविलें. परंतु त्याच्या वक्तृत्वाचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. फिलिपला नवीन बंदरें मिळालीं होतीं, तेथें त्यानें गलबतें बांधण्याचे व शस्त्रास्त्रांचे कारखाने सुरू केले; आणि थ्रेस प्रांताच्या अंतर्भागीं लष्कराच्या छावण्या कायमच्या बसविल्या.

ह्याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर त्यानें आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. इ. स. पूर्वी ३३८ त मोठी फौज घेऊन तो उघडपणें ग्रीस देशावर स्वारी करून आला. बरोबर त्याचा मुलगा अलेक्झांडर होता. ह्या राजपुत्रास युद्धकलेचें व राज्यकारभाराचें तत्कालचें उत्कृष्ट शिक्षण देण्यांत आलें होतें. त्याचें वय ह्या वेळीं अठरा वर्षांचें असून, त्यास लष्करांत एका अधिकाऱ्याची जागा दिलेली होती.

फिलिप ॲटिकावर चालून येत आहे असें कळतांच, आथेन्स येथें एकदम चळवळ उडून गेली. बाजारांतील दुकानें काढून सर्व लोकांची सभा भरविण्याबद्दल प्रायटेनचा तावडतोब हुकूम सुटला. सर्व लोक त्वरित जमा झाले. त्यांस वरील अरिष्टाची बातमी पुकारून रीतीप्रमाणें चोपदारानें तुतारी वाजवून, 'ज्यांस बोलावयाचें असेल त्यानें पुढें यावें,' असें पाचारण केलें. तेव्हां डेमॉस्थेनिस उठून पीठावर चढला. अजून निराश होण्याचें कारण नाहीं, इत्यादि प्रकारें लोकांस धीर देऊन तो बोलला, 'थीब्सकडे वकील पाठवा, आणि शत्रूशीं टक्कर देण्यास त्याची मदत मागा.' ही सल्ला पसंत पडून लोकांनीं डेमॉस्थेनीस ह्यासच वकील म्हणून थीब्सला पाठविलें. तेथें त्यानें आपल्या वक्तृत्वशक्तीनें थीबन लोकांचें मन आपल्याकडे वळवून, त्यांस फिलिपशीं केलेला तह मोडण्यास लाविलें; आणि ग्रीस देशाची स्वतंत्रता रक्षण करण्यासाठीं त्याची मदत मिळविली. दुसरीं संस्थानें पुढें आलीं. थीबन, आर्थीनियन, कारिंथियन, आकेयन, यूबियन व दुसरीं लहान मोठीं

राज्यें ह्या कार्यार्थ एक झालीं. त्यांची फौज तीस हजार जमली. बिओशिया प्रांतांत चिरोनिया येथें एकच लढाई होऊन सर्व प्रकरणाचा निकाल लागला. फिलिप यास मोठा विजय प्राप्त झाला आणि ग्रीक राष्ट्राची स्वतंत्रता बुडाली, ती फिरून त्यांस मिळाली नाहीं. ( स. ३३८ ).

ह्या पराभवानें लोकांस केवढें दुःख झालें असेल ह्याची कल्पनाच केली पाहिजे. आथीनियन लोकांस वाटलें कीं फिलिप येऊन आतां आपणांस खाऊन टाकितो. असें वाटून ते शहराच्या बंदोबस्तास लागले. पण ह्या तयारीची जरूरच नव्हती. फिलिप आथेन्सशीं फारच सौम्यपणानें वागला. हस्तगत झालेले लोक दंड न घेतां त्यानें सोडून दिले; आणि आथिनियन लोकांस नांवाचें स्वातंत्र्य देऊन त्यांजशीं सख्य जोडिलें. थीब्सशीं मात्र तो निराळ्या प्रकारें वागला. त्याचें सर्व स्वातंत्र्य हरण करून त्यांच्या शहरीं आपली फौज ठेवून दिली.

ह्याप्रमाणें सर्व ग्रीस देश आक्रमण केला तरी फिलिपची इच्छा तृप्त झाली नाहीं. त्याच्या मनांत इराण देश जिंकण्याची जबर उत्कंठा होती. त्यासाठीं कॉरिंथ येथें त्यानें एक मोठी सभा भरविली. ह्या सभेस स्पार्टाशिवाय इतर सर्व संस्थानांचे प्रतिनिधि आले होते. आशियांतील ग्रीक वसाहतींस इराणचे अधिकारी नाहक छळतात, सबब सर्व ग्रीक संस्थानांनीं एकत्र होऊन इराणचा समाचार घ्यावा अशी सूचना त्यानें वरील सभेंत केली. ती पसंत होऊन प्रत्येक संस्थानानें किती गलबतें व माणसें ह्या कामीं द्यावीं तें ठरविण्यांत आलें. फिलिप ह्यास सर्व फौजेवर मुख्य अधिपति नेमिलें. त्यानें प्रथम पिलापोनसेस प्रांतांत शिरून स्पार्टाचा प्रदेश जिंकिला, आणि स्पार्टन लोकांचा पाडाव करून, आपण म्हणूं तें त्यांनीं केलें पाहिजे, अशी त्यांची स्थिति केली. स्पार्टाचा बहुतेक मुलूख घेऊन तो त्यानें पेलॉपोनेससमधील इतर संस्थानांस वांटून दिला. येणेंप्रमाणें स्पार्टाची वाट लागली.

फिलिपची राणी आलिंथियास म्हणून होती तिचें आणि त्याचें कधीं नीट पटलें नाहीं. पुढें मासिडोनियांत परत आल्यावर त्यानें

तिला सोडून क्लिओपॅट्राशीं लग्न लाविलें. ही क्लिओपॅट्रा त्याच्या एका सरदाराची पुतणी होती. अलेक्झांडर मोठा मातृभक्त होता. त्यास बापाच्या ह्या कृत्याचा राग आला; आणि आईला घेऊन तो राज्य सोडून चालता झाला. तो प्रथम इलिरिया प्रांतांत गेला. इलिरियांतले लोक नेहमीं बंड करून मासिडोनियावर उठत असत. पण बापानें लवकरच मुलाची समजूत करून त्यास पेला येथें परत आणिलें. आलिंपियासचा भाऊ एपिरस राजा होता, त्यास आपली मुलगी देऊन फिलिपनें आपल्या बाजूस वळवून घेतलें. वरप्रमाणें मामाभाचीचें लग्न ग्रीक लोकांत शास्त्रविरुद्ध नसे.

हा लग्नसमारंभ एपिरसची प्राचीन राजधानी ईज्या ( Aegea ) येथें मोठ्या थाटानें करण्यांत आला. फिलिपची जिकडे तिकडे वाहवा होऊन त्याच्या ऐश्वर्याचा कळस झाला. त्या वेळीं त्याची जेवढी प्रतिष्ठा होती, तेवढी कधीं कोणाची झाली नसेल. पण हा त्याचा भाग्यरवि क्षणांत मावळून गेला. पॉझेनियस म्हणून एक तरुण गृहस्थ त्या समारंभांत होता, त्यानें गर्दींतून क्षणमात्रांत पुढें येऊन राजाच्या पोटांत तलवार खुपसून त्याचा प्राण घेतला. पुढें तो पळून जाणार इतक्यांत रक्षकांनीं त्यास पकडून ठार मारिलें. ह्याप्रमाणें मासिडोनियाचा राजा फिलिप चोवीस वर्षें राज्य करून आपल्या वयाच्या ४७ वे वर्षीं मरण पावला.

---

## प्रकरण सतरावें

### अलेक्झांडर धि ग्रेट.

( इ. स. पू. ३३६—३२३ ).

फिलिपच्या मृत्यूनें ग्रीस देशांत आनंदीआनंद झाला. आथेन्स येथें ही बातमी प्रथम डेमॉस्थेनिस ह्यास कळली. त्या वेळीं एकुलती एक मुलगी मरण पावल्यामुळे तो दुःखांत होता. तरी पण

सुतकी वेष टाकून त्यानें पांढरा आंगरखा, दुपट्टा व डोक्यांत फुलांची माळ घातली, आणि आनंदाच्या भरांत ती बातमी लोकांस कळविण्यास तो बाहेर आला. लोकांसही अत्यानंद होऊन, जणूं काय विजय प्राप्त झाला आहे असें समजून, त्यांनीं मंदिरांत जाऊन महोत्सव केले. त्यांस वाटलें होतें, कीं मासिडोनियाचा भावी राजा आपणांस पूर्ण स्वातंत्र्य देईल. पण ही त्यांची चूक आहे असें त्यांच्या लवकरच नजरेस आलें. अलेक्झांडर मोठी फौज घेऊन ग्रीस देशांत उतरला; आणि थीब्स व इतर शहरांतून करभार घेऊन आथेन्सवर आला. तेव्हां आथीनियन लोकांचे सर्व उत्सव बंद झाले. अलेक्झांडरच्या आगमनानें लोकांत इतकी दहशत बसली कीं, प्रायटेन मंडळींनीं आपले वकील अलेक्झांडरकडे पाठवून आपल्या अयोग्य वर्तनाबद्दल क्षमा मागितली. त्यांस क्षमा करून अलेक्झांडर कारिंथवर आला. तेथें त्यानें एक सभा भरविली; आणि सर्व संस्थानांचे प्रतिनिधि सभेस आणिले. त्या वेळीं स्पार्टाखेरीज बाकीच्या सर्व संस्थानांनीं अलेक्झांडरचें सार्वभौमत्व कबूल केलें. स्पार्टानें मात्र आपण स्वतंत्र आहों अशी घमेंड चालविली.

कारिंथ येथें घडलेली आलेक्झांडरची एक गोष्ट आहे. प्रसिद्ध तत्त्ववेत्ता डायोजिनिस त्या वेळीं कारिंथ येथें राहत होता. त्याचें वर्तन अतिशय कडक असून, तो साधुवृत्तीनें राहत असे. त्याचा बाप आशियामायनरांतील ग्रीक शहर सिनोप येथें व्यापार करीत असे. पण बापाच्या धंद्यांतील अनीतीचें वर्तन सहन न होऊन, डायोजिनिस गृहत्याग करून आथेन्स येथें आला. तेथें अँटिस्थेनिस नांवाच्या एका विक्षिप्त साधूपाशीं शिष्यत्व पतकरून तो राहिला. अँटिस्थेनिसनें एक निराळा पंथ स्थापिला होता, त्यास सायनिक असें म्हणत. समाजाचीं बंधनें व नियम न पाळतां, व कोणताही विषयोपभोग न घेतां, कडकडीत तपांत आयुष्य घालवावयाचें, असा या पंथाचा शिरस्ता असे. डायोजिनिसची ख्याति ऐकून आलेक्झांडर त्याच्या भेटीस गेला, आणि बोलणें चालले असतां त्यानें त्या साधूस विचारिलें, ' महाराज, आपणाकरितां मी काय करूं ? ' ' जवळ

उभा राहून माझ्या वरचें ऊन बंद करतोस, तो जरासा दूर हो म्हणजे पुरे,' असा त्यास डायोजिनिसनें जबाब दिला. अलेक्झांडर भेटीस गेला, तेव्हां तो साधु थंड पाण्यांत बसून कांकडत होता असें सांगतात.

कारिंथ येथें अलेक्झांडर व डायोजिनिस यांची गांठ पडली असेल हें असंभवनीय नाहीं. कारण त्या वेळीं कारिंथ येथें एका गृहस्थाच्या मुलांस शिकविण्याचें काम डायोजिनिस करीत होता. त्या गृहस्थानें ह्या साधूस गुलाम म्हणून विकत घेतलें होतें. त्यांतला प्रकार असा होता कीं, डायोजिनिस गलबतांत बसून इज्जीना येथें जात असतां, त्याचें गलबत चांचे लोकांनीं पकडून घेतलें, आणि वरच्या सर्व लोकांस क्रीट येथें आणून गुलाम म्हणून विकलें. विक्री चालू असतां डायोजिनिसला कोणीं प्रश्न केला, 'तुला काय काम येतें'? त्यानें उत्तर केलें, 'मला हुकुमत चालवितां येते, व जर कोणाला शिक्षक पाहिजे असेल, तर तो हटकून मला विकत घेईल.' तें ऐकून कारिंथच्या एका गृहस्थानें त्यास विकत घेतलें, आणि त्यास आपल्या मुलांस शिकविण्याचें काम सांगितलें. डायोजिनिसचें काम त्या गृहस्थास इतकें आवडलें कीं, त्यास त्यानें गुलामगिरीतून मुक्त केलें. तरी पुढें डायोजिनिस त्याच गृहस्थाकडे राहत होता; आणि अलेक्झांडरची व त्याची कारिंथ येथेंच भेट झाली.

ग्रीस देशांतून मासिडोनियांत परत जाऊन अलेक्झांडरनें आशियाखंडावर स्वारी करण्याची तयारी केली. ग्रीस देश सोडून त्याला फार अवकाश झाला नव्हता, तों तेथें अशी बातमी उठली कीं, अलेक्झांडर मरण पावला. ही बातमी ऐकल्याबरोबर थीब्सच्या लोकांनीं बंड केलें, आणि तेथें असलेली अलेक्झांडरची फौज हांकून देण्याचा प्रयत्न केला. ह्या त्यांच्या उद्दामपणाबद्दल अलेक्झांडरनें त्याची चांगलीच खोड मोडिली. तो स्वतः लगबगीनें थीब्स येथें आला. लोक किल्ला त्याच्या हवालीं करीनात, आणि शरण येईनात. तेव्हां एकदम हल्ला करून त्यानें किल्ला व शहर काबीज केलें. त्या प्रसंगीं हजारों थीबन लोक पडले, आणि हजारों कैदी होऊन

अलेक्झांडरच्या हातीं पडलें. अलेक्झांडरनें सर्व शहर धुळीस मिळविलें. पिंडार म्हणून एक कवि होता, त्याचें तेवढें एक घर मात्र त्यानें कायम ठेविलें. ह्या कवीचे ग्रंथ अलेक्झांडर यास फार आवडत असत. हा पिंडार कवि पेरिक्लीजच्या वेळेस होता.

बापाच्या मृत्यूनंतर दुसऱ्या वर्षी अलेक्झांडरनें आशियाखंडावर स्वारी केली. आशियाच्या पश्चिम भागांतील ग्रीक लोकांच्या वसाहती इराणच्या राजानें जिंकल्या होत्या, त्यांस सोडवून परत स्वतंत्र करण्याचा आपला उद्देश आहे, असें त्यानें जाहीर केलें. तथापि त्याचा अंतस्थ हेतु वेगळाच होता. त्या वेळीं इराणचें राज्य पूर्वेकडे हिंदुस्थानपासून पश्चिमेकडे इजिप्टपर्यंत पसरलें होतें. तें सर्व जिंकून आपल्या कबजांत आणावें असा त्याचा मुख्य हेतु होता. ह्या इराणच्या राज्यांत सूझा, पर्सेपोलिस, एक्बाटना, डमास्कस, बाबिलोन वगैरे अनेक नामांकित शहरें होतीं. इराणच्या गादीवर त्या वेळेस तिसरा डरायस हा राजा असून, त्याचें सौंदर्य व गोड स्वभाव जगजाहीर होते. पण राज्यविस्ताराच्या मानानें त्याची शक्ति फार कमी होती. फौज अवाढव्य होती, पण ती इतकी अस्ताव्यस्त व बेशिस्त होती कीं, अलेक्झांडरच्या फौजेपुढें लष्करी कामांत तिचा टिकाव लागला नसता. हेलेस्पांटच्या किनाऱ्यापासून आशियाचे आंत तीस मैलांवर ग्रानिकस नदीच्या कांठीं पहिली मोठी लढाई होऊन अलेक्झांडरास इराणी फौजेवर मोठा जय मिळाला, पण त्याच्या खास संरक्षकांपैकीं पंचवीस असामी त्यांत ठार झाले. त्यांस अलेक्झांडरनें मोठ्या समारंभानें पुरिलें; आणि प्रसिद्ध मूर्तिकार लिसिपस ह्याजकडून मेलेल्या गृहस्थांचे कांसधातूचे पुतळे करून ते डायम येथें उभारून ठेविले. ग्रानिकसच्या लढाईत अलेक्झांडरास अतिशय लूट मिळाली. तींपैकीं ३०० चिलखतें त्यानें आथेन्स येथें पाठविलीं; तसेंच त्याची आई आलिंपियास इच्याकरितां उत्कृष्ट ताटें व तंबूचें उंची उंची सामान त्यानें पाठवून दिलें.

पुढें अलेक्झांडर सार्डिस येथें गेला. सार्डिस हें लिडियाचा राजा क्रीसस ह्याचें राजधानीचें शहर होतें. सार्डिसच्या लोकांनीं दरवाजे उघडून अलेक्झांडरास आंत घेतलें आणि ते त्यास शरण गेले. तेथें त्यानें आपल्या स्वारीचा मुख्य हेतु तडीस नेला: म्हणजे ग्रीक वसाहती इराणचे ताब्यांतून मुक्त करून स्वतंत्र केल्या; आणि त्यांस ग्रीक लोकांचे पूर्वींचे सर्व हक्क देवविले. येणेंप्रमाणें एक वर्षाच्या आंत विलक्षण पराक्रम करून त्यानें सर्व आशियामायनर कांबीज केलें.

ह्या मोहिमींत अलेक्झांडर गोर्डियन येथें गेला. गोर्डियन ही फ्रिजियाची प्राचीन राजधानी. फ्रिजिया देश सायरसनें जिंकला होता. गोर्डियनच्या किल्ल्यांत एक गाडा होता, त्याची धुरा गाड्यास इतक्या युक्तीनें बांधलेली होती कीं, तिची गांठ कोणास सोडतां येत नसे, किंवा दोरीचीं टोंकें सांपडत नसत. ह्या गाड्या-संबंधानें पूर्वीं एक विलक्षण दंतकथा चालू होती. मागें कधीं एकदां युद्ध चालू असतां, असें एक भविष्य वर्तविलेलें होतें कीं, एका गाड्यावर बसून एक राजा ह्या शहरांत येईल, आणि तो जिकडे तिकडे शांतता करील. पुढें कांहीं दिवसांनीं मीडास नांवाचा एक शेतकरी आपल्या गाड्यांत बसून गोर्डियन येथें आला. त्यास लोकांनीं राज्यपद दिलें. तेव्हां त्यानें तो आपला गाडा देवास अर्पण केला. तेव्हांपासून तो गाडा देवळांत होता. त्या गाड्याच्या गांठीविषयीं अशी वार्ता प्रचलित होती कीं, जो कोणी ही गांठ सोडील, तो सर्व आशियाचा अधिपति होईल. ही वार्ता अलेक्झांडरनें ऐकली, आणि गांठ सोडून ती गोष्ट आपणच खरी करण्याचा निश्चय केला. तो लगेच गाड्याजवळ गेला, आणि आपल्या तलवारीनें त्याची गांठ त्यानें कापीली. कोणी म्हणतात कीं, दांडा व गाडा ह्यांस सांधणारा एक लांब खिळा होता, तो अलेक्झांडरनें बाहेर काढल्याबरोबर गांठ सुटली, आणि त्यामुळेंच त्यास सर्व आशिया खंडांत विजय प्राप्त झाले, असें लोक म्हणत.

अलेक्झांडरास अडविण्याकरितां डरायसनें मोठी फौज जमविली, आणि पूर्वेकडील राजांच्या अंगवळणीं पडलेल्या थाटानें व ऐष-आरामानें कूच करीत, तो अलेक्झांडरवर चालून आला. त्याचा तंबू म्हणजे एक मोठा बंगलाच होता. त्याजवर सूर्याची प्रतिमा ठेविलेली होती. कारण इराणी लोक सूर्योपासक होते. तो भव्य रथांत बसून जात असे. स्वारी बाहेर निघे, तेव्हां पुजारी व ज्योतिषी चांदीच्या कुंड्यांत जिवंत अग्नि घेऊन रथाच्या पुढें चालत. त्या अग्नीबरोबर त्यांच्याच जातीचे ३६५ तरुण पुजारी रंगीत पोषाक घातलेले चालत. रथाबरोबर खास पाहरेकऱ्यांचा तांडा असे. त्यांच्यामागें राजमाता, राणी, व मुलें आपापल्या परिवारांसह रथांत बसून जात. मागून तंबूचें सोन्याचांदीचें मौल्यवान सामान, जवाहीर, सुगंधिद्रव्यें व दुसरे भारी किंमतीचे पदार्थ मिरवीत नेत. राज्याच्या मोठ-मोठ्या सरदारांचे लवाजमे व कुटुंबें त्या त्या सरदारांसमागमें चालत. पण ह्या वेळीं सर्व जडजवाहीर व कुटुंबें संरक्षणासाठीं डमास्कस येथें पाठविण्यांत आलीं. राजकुटुंब मात्र स्वारीबरोबर होतें.

ह्या दोन फौजांची गांठ इसस येथें पडली. हेंच नांव लढाईस पडलें आहे. युद्धाच्या निकालास फार वेळ लागला नाहीं. इराणी लोकांचा पराभव होऊन सर्व नाश झाला. डरायस मात्र थोड्या लोकांनिशीं जीव घेऊन पळून गेला; आणि त्याचें सर्व कुटुंब, तंबू व जवाहीर अलेक्झांडरच्या हातीं पडलें. डरायसची राणी स्टाटीरा ही अत्यंत देखणी होती, तिला अलेक्झांडरनें सांगून पाठविलें कीं, 'तुम्हांस कोणत्याही प्रकारची इजा पोंचणार नाहीं. तुमच्या वाड्यांत जसा तुमचा मान राहतो तसाच येथेंही राहील.' अलेक्झांडरनें हें वचन अक्षरशः पाळिलें असें इतिहासकार लिहितात.

ह्या विजयानंतर डमास्कस येथील जडजवाहीर काबीज करण्या-करितां अलेक्झांडरनें पार्मिनिओन नामक सरदारास पाठविलें. डमा-स्कसच्या अंमलदारानें दरवाजे उघडून पार्मेनिओन यास आंत घेतलें; त्याबरोबर अशी कांहीं गर्दी उडाली कीं, तींत पुष्कळ सामानाचा नाश झाला.

इकडे अलेक्झांडर फिनिशिया प्रांतांत गेला. हा प्रांत मोठ्या लोकवस्तीचा व सधन होता. त्यांत उत्कृष्ट गलबतांची सोय असल्यामुळें, अलेक्झांडरास त्याचें महत्व विशेष होतें. फिनिशियाचीं शहरें टायर व सिडोन येथील संपत्ति, व्यापार व कारखाने ह्यांची प्रसिद्धि सर्वत्र होती. सिडोन शहर एकदम अलेक्झांडरच्या कबजांत आलें; पण टायरचे लोक डरायसच्या बाजूनें लढूं लागले. टायर शहर समुद्रापासून कांहीं अंतरावर एका बेटावर वसलेलें होते. मध्यें किनाऱ्यापर्यंत खोल समुद्र होता. अलेक्झांडर जवळ गलबतें विशेषशीं नसतां, त्यानें लेबॉनन डोंगरांतील जगलांतून लांकडें आणून त्यांचा पूल केला, आणि त्या पुलावरून फौज नेऊन शहरास वेढा घातला. हें त्या वेळच्या मानानें मोठ्या पराक्रमाचें काम होय. कारागीर धक्का बांधीत असतां त्यांच्या संरक्षणासाठीं लांकडी मनोरे बांधून, तेथून अलेक्झांडरनें कारागिरांचा बचाव केला. पूल मोडण्यासाठीं टायरच्या लोकांनीं हरप्रयत्न केले, शेवटीं आगीचीं गलबतें पाठवून, त्यांनीं तयार झालेला तो पूलही जाळून टाकिला. तेव्हा अलेक्झांडरनें ऱ्होड्स आणि सैप्रस वगैरे ठिकाणांहून जहाजें आणिलीं, आणि पुनः पूल बांधिला, त्यावरून सात महिनेपर्यंत वेढ्याचें काम चालवून शेवटीं त्यानें टायर शहर काबीज केलें.

टायरच्या लोकांस अलेक्झांडरनें जबर शासन केलें. बहुतेक लोक लढाईतच कापले गेले; आणि सुमारें तीस हजार हातीं पडले, त्यांस गुलाम म्हणून विकिलें.

डरायसनें दोन वेळां तहाचें बोलणें लाविलें. दोनही वेळां तें नाकबूल करून अलेक्झांडरनें पुढील युद्धाची तयारी केली. त्यानें आपली फौज इजिप्टमध्यें नेली; तेथें त्यांस कोणीच अडथळा केला नाहीं. इजिप्शन लोक त्यास एकदम शरण गेले. इजिप्टच्या पुरातन फारो राजांची राजधानी मेंफिस येथें त्यानें एक मोठा उत्सव केला. हें मेंफिस शहर हल्लीं कायरो आहे त्या ठिकाणीं पूर्वीं होतें. इजिप्टमध्यें त्या वेळीं समुद्रकिनाऱ्यावर म्हणण्यासारखें चांगलें शहर नव्हतें. असें शहर असेल तर युरोपआशियांचा व्यापार इजिप्ट-

मधून चांगला चालेल असें पाहून, त्यानें नील नदीच्या मुखाजवळ एक शहर बांधण्याची योजना केला; आणि तेथें ग्रीक लोक आणून वसाहत केली. तेंच अलेक्झांड्रिया शहर होय. थोड्याच वेळांत हें शहर सर्व जगांतील व्यापाराचें मुख्य ठाणें म्हणून प्रसिद्धीस आलें. ह्याप्रमाणें मेंफिस व पेल्युझियम ह्या दोन ठिकाणीं आपलीं लष्करी ठाणीं ठेवून, स्वतः अलेक्झांडर डरायसबरोबर युद्ध चालविण्याकरितां आशियाखंडांत परत आला.

---

## प्रकरण अठरावें.

## अलेक्झांडर धि ग्रेट.

### उत्तरार्ध.

( इ. स. पू. ३३२–३२३ ).

अलेक्झांडर परत आल्यावर त्याची व डरायसची आर्बेला येथें मोठी लढाई झाली. आर्बेला गांव तैग्रीस नदीच्या कांठीं आहे. ह्या लढाईत इराणी बादशाहीचा निकाल लागला. ह्याप्रमाणें अठ्ठावीस वर्षांच्या वयांत अलेक्झांडरनें सर्व सुधारलेलीं राज्यें काबीज केलीं.

डरायसच्या फौजेंत मध्यआशियांतील, अफगाणिस्तानांतील व हिंदुस्तानच्या सरहद्दांवरील शूर पण रानटी लोकांचा भरणा विशेष होता. त्याजबरोबर हत्ती व लढाऊ रथ होते. त्यांची फौज अलेक्झांडरच्या फौजेहून किती तरी ज्यास्त होती. दोनही बाजू मोठ्या निकरानें लढल्या. पण ग्रीक फौजेचें शौर्य व शिस्त विशेष असल्यामुळें इराणचा पराभव झाला; आणि डरायसचें सर्व राज्य अलेक्झांडरच्या हातीं आलें. डरायस पराभव पावून ऐक्बाटना येथें पळून गेला आणि अलेक्झांडर बाबिलोन येथें गेला. तेथें सर्व मोठमोठे सरदार व गृहस्थ त्यास सामोरे आले. त्यांनीं सर्व शहर खजिन्यासुद्धां अलेक्झांडरच्या हवालीं केलें. अलेक्झांडरनें समारंभानें शहरांत प्रवेश केला. लोकांनींही त्याचा उत्कृष्ट सत्कार

करून, झालें हें बरें झालें, असें दाखविलें. तो ज्या रस्त्यांनीं गेला, त्यांवर लोकांनीं चांदीच्या धुपाटण्यांतून सुगंध जळत ठेविले, आणि त्याजवर पुष्पवृष्टि केली.

ह्या वेळेस बाबिलोन शहर जरी प्राचीन काळच्या इतकें भरभराटींत नव्हतें, तरी तें पुष्कळ मोठें व सधन होतें. त्यांत पुष्कळ संपत्तीचा संचय होता. तेथें सांपडलेल्या सोन्याचांदीचा थोडाबहुत अंश प्रत्येक शिपायास मिळाल्याशिवाय राहिला नाहीं. क्झर्क्झिसनें पाडिलेलीं देवळें पुनः बांधण्याचा अलेक्झांडरनें हुकूम केला; तेणेंकरून तो ज्यास्तच लोकप्रिय झाला.

पुढें अलेक्झांडर डरायसची राजधानी सूझा येथें गेला, आणि तेथील राजवाडा त्यानें आपल्या कबजांत घेतला. तेथें जशी संपत्ति त्यास सांपडली, तशी पूर्वीं कधींच कोठें त्यास सांपडली नव्हती. वाड्याच्या भांडारांत पंचवीस लाख रुपये किंमतीची उत्कृष्ट जांभळी लोंकर त्यास सांपडली. ही लोंकर दोनशें वर्षांची जुनी होती, तरी ती अगदीं ताजी व सुरेख दिसत असे.

परराज्यें जिंकल्यावर तेथें मिळालेली लूट व निवडक वस्तु आपल्या आईस व मित्रांस पाठवाव्या, असा अलेक्झांडरचा संप्रदाय होता. ह्याविषयीं अशी एक आख्यायिका सांगतात, कीं लिआनिडास नांवाचा अलेक्झांडरचा गुरु होता. लहानपणीं त्याजपाशीं शिकत असतां एकदां यज्ञकुंडांत सुगंधी द्रव्यें त्यानें जरा ज्यास्त टाकिलीं, त्यावर गुरु त्यास दटावून बोलला, 'अरे अलेक्झांडर, सुगंधी पदार्थ ज्या देशांत पिकतात ते देश तूं जिंकशील, तेव्हां पाहिजे तितका सुगंध जाळीत जा; पण तोंपर्यंत आहे तेवढ्यांतच भागविलें पाहिजे.' ही लहानपणची गोष्ट लक्षांत ठेवून, अलेक्झांडरनें ह्या सुगंधी मालाचा एक भला मोठा संचय गुरूकडे पाठवून दिला, आणि पत्रांत लिहून पाठविलें कीं 'देवपूजेच्या कामीं असा हात आंखडण्याचें काम इतउत्तर करूं नये.'

आर्बेलाच्या लढाईपूर्वीच इराणची राणी स्टाटीरा मरण पावली, तेव्हां अलेक्झांडरनें तिचा अंत्यविधि तिच्या इतमामास शोभे अशा थाटानें केला. डरायसची आई सिझिगांबिस व त्याचीं मुलें ह्यांजकरितां सूझा येथील वाड्यांत चांगली व्यवस्था करून दिल्यानंतर, अलेक्झांडर इराणी राजांची स्मशानभूमि पर्सेपोलिस येथें गेला. तेथें इराणच्या राजांचें सिंहासन होतें, त्यावर सुवर्णछत्राखालीं अलेक्झांडरनें आरोहण केलें. त्या प्रसंगीं आपल्या सरदारांस त्यानें एक जंगी मेजवानी दिली. तेथें सर्व लोकांनीं यथेच्छ मद्यपान केलें; त्या मद्याच्या धुंदींत त्यांनीं एक दुष्ट कृत्य केलें, त्यावरून अलेक्झांडरच्या नांवास कायमचा डाग लागला आहे भोजनोत्तर राजवाड्यास आग लावावी, आणि क्झर्क्झिसनें आथेन्सशहर जाळिलें त्याचा सूड घ्यावा, अशी कोणीं एकानें सूचना केली, ती त्या सर्व झिंगलेल्या मंडळीस लगेच पसंत पडली. त्याबरोबर अलेक्झांडर हातांत एक पेटलेली चूड घेऊन, डोक्यावरील पुष्पमुगुटासह आवेशानें उठला, बरोबर दुसरेही पुष्कळ लोक चुडी घेऊन आले आणि अल्पावकाशांत त्यांनीं त्या वाड्याची राखरांगोळी केली. उंच व बारीक खांब, जिन्याच्या पायऱ्या, व नकशी कामाचीं दोन गोपुरें हे त्या वाड्याचे भाग अजून दृष्टीस पडतात.

डरायसला पकडून कैद करण्याचें अलेक्झांडरच्या मनांत फार होतें. म्हणून तो एक्बाटनास गेला, तेथें त्यांस कळलें, कीं डरायस पळून बॅक्ट्रियांत गेला. अलेक्झांडरनें त्याचा पाठलाग चालविला, आणि अतिशय त्रास सोसून त्यानें डरायसच्या मंडळीस गांठिलें. पण बॅक्ट्रियाचा अधिकारी बेझस ह्यानें अगोदरच डरायसचा खून केला होता. पुढें स्वतः बेझस पळून गेला. डरायसचें प्रेत सांपडलें, त्यांत मसाले वगैरे भरून तें अलेक्झांडरनें पर्सेपोलीस येथें अंत्यविधि-करितां पाठविलें. पुढें बॅक्ट्रियांत शिरून, तेथील व आसपासच्या रानटी लोकांस जिंकून थेट हिंदुस्थानच्या हद्दीपावेतों तो येऊन भिडला. रस्त्यांत त्यास अनेक संकटें भोगावीं लागलीं. बेझस ह्यानें ‘ आशियाचा राजा ’ असा किताब धारण केला होता, त्यास अलेक्झांडरनें पकडून ठार मारिलें.

ह्या मोहिमेंत एक चमत्कारिक व मौजेची गोष्ट घडली. एका उंच, निसुळत्या व अवघड खडकावर एक किल्ला होता. त्याजवर अरिमेझिस नांवाचा किल्लेदार कांहीं मंडळीसह बंदोबस्त ठेवीत असे. ऑक्झियार्टिस नांवाच्या दुसऱ्या एका सरदारानें आपली बायको व मुली सरक्षणासाठीं त्या किल्ल्यांत पाठविल्या होत्या. दोन वर्षें पुरण्याइतकी सामुग्री किल्ल्यांत होती, आणि वर जाण्यास खडकांतून एकच लहानशी चिंचोळी वाट होती. अलेक्झांडरनें 'किल्ला स्वाधीन करा,' असा निरोप किल्लेदारास पाठविला. पण अरिमेझीसनें हसून जासुदांस विचारलें, 'ग्रीक लोकांस पंख आहेत काय?' हें उत्तर ऐकून अलेक्झांडरनें पन्नासहजार रुपयांचें बक्षिस लावून आपल्या फौजेपैकीं जो कोणी प्रथम किल्ल्यावर चढेल त्यास हें बक्षिस द्यावयाचें, असें जाहीर केलें. त्या बरहुकूम प्रयत्न करून पुष्कळ लोक मृत्युमुखीं पडले; पण कांहीं असामी वरील बर्फांत मेख फेंकून तिला बांधलेल्या दोऱ्यांनीं वर चढले; आणि त्यांनीं वरून निशाणें फडकविल्याबरोबर, अलेक्झांडरनें अरिमेझीसकडे जासूद पाठवून त्यास कळविलें कीं, 'पहा ग्रीक लोकांस पंख आहेत, कीं नाहींत?' अरिमेझिसनें ग्रीक फौज किल्ल्यावर पाहिली, तेव्हां किती लोक वर आले ह्याचा अंदाज न लागून, तो एकदम अलेक्झांडरास शरण गेला. किल्ल्यांतले सगळे लोक कैद झाले, पण ऑक्झियार्टिसची मुलगी रोक्झाना हिचें स्वरूप पाहून अलेक्झांडर इतका मोहित झाला कीं त्यानें तिच्याशीं लग्न लाविलें; आणि त्या आनंदांत कैद केलेले सगळे लोक त्यानें सोडून दिले; मुलीचा बापही खुषी झाला आणि तें सर्व राष्ट्र खुषीनें अलेक्झांडरच्या ताब्यांत आलें.

अर्बेलाच्या लढाईनंतर सहा मोहिमा करून अलेक्झांडरनें इराणी बादशहाचें सर्व विस्तृत राज्य जिंकून घेतलें; तेणेंकरून कास्पियन समुद्रापासून सिंधु नदीपावेतों सर्व प्रदेश त्याच्या ताब्यांत आला. पूर्वेस त्याच्या राज्याची हद्द मध्यआशियांत सीर नदीला पोंचली. सीर नदीच्या पलीकडे सिथियन जातीचे भटकणारे लोक राहत होते. ह्या मोहिमांतच त्यानें अफगाणिस्तानांत कंदाहार व हिरात हीं शहरें बसविलीं.

ह्या विजयांनीं अलेक्झांडर अतिशय चढून गेला. त्याचा स्वभाव बिघडून तो हट्टी व तिरसट झाला. प्राच्य राज्यकर्त्यांचें क्रौर्य व ऐषआराम त्याच्या अंगीं शिरले. तो इकडील राजांप्रमाणें पोषाख करूनच राहिला नाहीं; इकडचा थाटमाट व रीतीभाती त्यानें स्वीका-रिल्या; आणि तेव्हांपासून तो अनेक क्रूर कृत्यें व अन्याय करूं लागला, त्यामुळें त्याच्या उज्वळ कीर्तीस कायमचा कालिमा लागला आहे. ह्या अन्यायाचें एक स्पष्ट उदाहरण त्यानें दाखविलें तें असें कीं, पार्मेनियोन नांवाचा त्याचा एक वृद्ध व विश्वासू सरदार होता. तो अलेक्झांडरचा सन्मान्य दोस्त व सल्लागार होता, इतकेंच केवळ नव्हे, तर त्या वृद्ध गृहस्थानें अलेक्झांडरच्या बापाची व आजाची नोकरी एकनिष्ठपणें बजावली होती. अशा चांगल्या पुरुषाचा त्यानें एकदम शिरच्छेद करविला. त्याचें कारण असें कीं, पार्मे-नियोनचा मुलगा फिलोटस हा स्वारांचा मुख्य अंमलदार होता. अलेक्झांडरचा जीव घेण्याचा एक कट झाला, त्यांत फिलोटसचें अंग आहे असा त्याजवर आरोप आला; हा आरोप सिद्ध झाला नाहीं, पण त्यास अलेक्झांडरनें ठार मारविलें. पुढें तोच आरोप पार्मेनियोनवर आला. हा आरोप खरा आहे असें अलेक्झांडरास वाटलें असो, किंवा मुलाच्या मृत्यूचा सूड घेण्यास पार्मेनियोन प्रवृत्त होईल अशा भीतीनें असो, अलेक्झांडरनें मुलाच्या मृत्यूची खबर पार्मेनियोन ह्यास कळण्यापूर्वी, व त्याजवरील आरोपाचा वहीम त्यास कळूं न देतां, एकदम गुप्त हुकूम पाठवून त्या वृद्ध गृहस्थाचा शिरच्छेद करविला. त्या वेळीं तो गृहस्थ पत्र वाचीत बसला होता.

पुढें लवकरच अलेक्झांडर स्वतः लोकांचे खून करूं लागला. क्लायटस नांवाचा त्याचा एक मित्र होता, त्यानें अनेक वेळां अलेक्झांडरचे प्राण वांचविले होते; आणि त्याला नुकताच बाक्ट्रिया प्रांताचा कारभार बादशहानें दिला होता. एके दिवशीं रात्रीं भोजनोत्तर कांहीं कारणावरून ह्या दोघांचें भांडण सुरू झालें, जवळच्या लोकांनीं बादशाहास शांत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. आणि त्याचा राग शांत होईपर्यंत, क्लायटस ह्यास निघून जाण्यास

सांगितलें. पण जवळच्या शिपायांच्या हातांतून एकदम अलेक्झांडरनें एक भाला ओढून घेतला, आणि जवळचे लोक पुढें होऊन त्याचा हात धरणार, इतक्यांत क्लायटसचे अंगावर चालून जाऊन, क्लायटसचा मुर्दा करून, त्यास जमिनीवर पाडिलें. असलीं कृत्यें अलेक्झांडरसारख्या थोर पुरुषास शोभत नाहींत आणि पूर्वी त्यानें जी औदार्याचीं अनेक सत्कृत्यें करून कीर्ति मिळविली, त्यांस ह्या दुष्कृत्यांची जोड कलंक लावणारी झाली आहे.

सिंधुनदी अलेक्झांडरच्या राज्याची पूर्वमर्यादा होती. पण ती नदी उतरून पलीकडील राज्ये युरोपियन लोकांस अगदींच अज्ञात होतीं, त्यांत प्रवेश करण्याचा अलेक्झांडरनें निश्चय केला. तो पंजाबांत शिरला. पंजाबांत त्या वेळीं दोन राज्यें होतीं,—एक सिंधुपासून हिडास्पिस (म्ह० झेलम) पर्यंत, व दुसरें हिडास्पिसच्या पूर्वेकडील. पहिल्यावर तक्षिलिस* व दुसऱ्यावर पोरस राजा राज्य करीत होता. पोरस हा शूर व आकृतीनें भव्य होता.

तक्षिलिस व पोरस ह्यांचें वांकडें होतें. तेव्हां पोरसचा सूड उगविण्याकरितां तक्षिलिसनें अलेक्झांडरचा स्नेह संपादिला. अलेक्झांडरच्या फौजेस सिंधुनदींतून अलीकडे येण्याककरितां नदीवर त्यानें एक पूल बांधून दिला; आणि त्यास धान्यसामुग्री पुरवून स्वतः पांच हजार लोकांनिशीं जाऊन तो अलेक्झांडरास मिळाला. हिडास्पिस नदीच्या कांठीं मोठी लढाई होऊन पोरसचा पराभव झाला, आणि तो कैद होऊन अलेक्झांडरच्या हातीं सांपडला. ह्या कठिण प्रसंगीं पोरसनें अलेक्झांडरशीं मोठ्या धैर्याचें व थोरपणाचें वर्तन केलें, तेणेंकरून अलेक्झांडर इतका खुष झाला कीं, त्यास पुनः अलेक्झांडरनें त्याचें राज्य परत दिलें, आणि आणखी त्यास चांगली मदत करून पूर्वींपेक्षां ज्यास्त प्रदेश जिंकून दिला. तसेंच

---

* टीप—तक्षिलिस हें राजाचें नाव म्हणून ग्रीक इतिहासांत आढळतें. वास्तविक तें 'तक्षशिला' शब्दाचें अपभ्रष्ट रूप दिसतें. तक्षशिला नांवाचें नगर अटक जवळ होतें.

तक्षिलिस व पोरस ह्यांची अलेक्झांडरनें मैत्री करून दिली. तक्षिलिस अलेक्झांडरचा मांडलिकपणा पत्करून आपले राज्यांत राहिला.

गंगानदीपर्यंत पुढें जाण्याचा अलेक्झांडरचा विचार होता. पण त्याच्या लष्करचे लोक घर सोडून फार दिवस झाल्यामुळें पुढें जाण्यास पाऊल घालीनात, तेव्हां पुढें जाण्याचा विचार सोडून तो परत निघाला. आपले लोक होड्यांत भरून तो हिडास्पिस नदींतून सिंधु नदींत आला, आणि सिंधुतून त्याच साधनानें खालीं समुद्रांत उतरला. रस्त्यानें सिंध प्रांतांतील लोकांशीं त्याचे अनेक संग्राम झाले. एकदां तर स्वतः अलेक्झांडरास जखमा लागल्या. त्याचा प्रकार असा झाला, कीं मल्ली (मुलतान ?) म्हणून एक शहर होतें. तें काबीज करण्याकरितां तटावर दोऱ्या लावून सर्वांपुढें तो वर चढत होता. तो वर पोंचला, पण बाकीचे लोक दोऱ्या तुटल्यामुळें वर येऊं शकले नाहींत. आंतून बाण सुटत असतां तो तटावर एकटाच राहिला. तेव्हां नाइलाज होऊन त्यानें शत्रूंच्या घोळक्यांत उडी घातली, आणि एका झाडाखालीं तटास पाठ लावून तो मोठ्या शौर्यानें स्वतःचा बचाव करून शत्रूंशीं लढत असतां, एक बाण येऊन त्याच्या खांद्यांत घुसला. पण त्याच क्षणीं त्याचे शिपाई वर चढून आले. त्यांनीं त्यास उचलून तंबूत नेलें आणि रागाच्या आवेशांत शत्रूंचे सर्व लोक त्यांनीं कापून काढिले. पुढें बरा झाल्यावर बाजूंच्या लोकांशीं लढाई करीत तो परत आला.

हिंदुस्थानावर स्वारी करण्यास अलेक्झांडरास कांहीं एक सबब नव्हती. कोणाशीं भांडणतंटा कांहीं एक नसतां, तो ह्या देशांत आला, त्यावरून लुटारू व बेबंद लोकांच्या टोळीची उपमाच त्याच्या स्वारीस दिली पाहिजे. तथापि वाइटासारखे कित्येक चांगलेही परिणाम त्याच्या स्वारीचे झाले आहेत. ह्या स्वारीच्या योगानें युरोपियन लोकांचें भूगोलिक व सृष्टिशास्त्राचें ज्ञान वाढलें; आणि युरोप व आशिया ह्यांजमध्यें दळणवळण सुरू झालें, त्या योगानें सर्व जगांतील व्यापारास उत्कृष्ट चलन मिळालें. सिंधु नदीच्या मुखाजवळ व्यापारासाठीं एक तटबंदीचें ठाणें अलेक्झांडरनें बांधिलें, तेथून निआर्कस

नामक सरदाराच्या हाताखालीं एक आरमार देऊन त्यास किनाऱ्या-किनाऱ्यानें जलमार्गाचा शोध लावीत प्रथम इराणी अखातांतून व पुढें युफ्रेटिस नदींतून वर पाठविलें. ही सफर सिद्धीस जाऊन इराणच्या अखातांतून हिंदुस्थानचा माल बाबिलोन व इतर शहरांत आणण्याचा, व तेथून तो तांबड्या समुद्रांतून इजिप्ट देशांत आणण्याचा मार्ग तयार झाला. इजिप्टमध्यें आलेला माल कालव्यांतून अगर लमाणांच्या साह्यानें नील नदींत येऊन, तेथून गलबतांतून अलेक्झांड्रियास व तेथून सर्व युरोपांत जाण्याची सोय झाली. पूर्वेकडील व्यापाराचे अलेक्झांडरनें आंखून दिलेले हे रस्ते पुढें पंधराव्या शतकापर्यंत चालू होते. आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास वळसा घालून हिंदीमहासागरांत उतरण्याचा जलमार्ग युरोपियन लोकांस सांपडला, तेव्हांच हे वरील खुष्कीचे मार्ग बंद पडले.

युफ्रेटिस नदींतून वर आल्यावर अलेक्झांडरच्या फौजेस मोठमोठ्या वाळूच्या मैदानांतून प्रवास करावयाचा होता. त्या प्रवासांत अतिशय हाल होऊन पाण्यावांचून पुष्कळ लोक प्राणांस मुकले. शेवटीं अलेक्झांडर आपल्या मुख्य फौजेसह इराणच्या राजधानीस ( सूझा ? ) पोंचला. तेथें ह्या सुखरूप प्रवासाबद्दल त्यानें मोठा उत्सव केला; आणि तेथेंच पहिली बायको जिवंत असतां दुसऱ्यांशीं लग्न करणें हा दुसरा एक प्राच्य प्रघात त्यानें स्वतः स्विकारिला. डरायसची वडील मुलगी स्टाटीरा इच्याशीं त्यानें स्वतः लग्न केलें, आणि जवळच्या सरदारांचींहीं त्यानें मोठमोठ्या कुलीन इराणी व मीडियन स्त्रियांशीं लग्नें करून दिलीं. युरोपियन व आशियन लोकांमध्यें असे लग्न-संबंध वाढावे, म्हणून अलेक्झांडरनें अतिशय प्रयत्न केले. त्या योगानें आपलें राज्य चिरस्थायी होईल असा त्यास भरंवसा होता.

पुढें लवकरच अलेक्झांडर बाबिलोन येथें गेला. तेथेंच आपण कायमचें राहवें आणि बाबिलोन आपल्या बादशाहीची मुख्य राजधानी करावी असा त्याचा मनोदय होता. तदनुसार त्यानें तथें अनेक कामें सुरू केलीं व सुधारे चालविले. विशेषतः तैग्रीस व युफ्रेटिस ह्या नद्यांमधले प्राचीन कालवे बंद झाले होते, ते त्यानें दुरुस्त करविले.

त्याचे प्रयत्न सिद्धीस गेले असते, तर बाबिलोनचें प्राचीन वैभव फिरून त्या शहरास प्राप्त झालें असतें. पण त्याची आयुष्य-मर्यादा संपली होती. त्यास ज्वर येऊं लागला, आणि त्यांतच थोडे दिवसांत त्याचा अंत झाला. तो इ. स. पूर्वी ३२३ वे वर्षी मरण पावला, तेव्हां त्याच्या वयास तेहेतीस वर्षे पुरीं झालीं नव्हतीं. प्रथम त्याचें दफन इजिप्टमध्यें मेंफिस येथें करण्यांत आलें, पण पुढें त्याचें प्रेत अलेक्झांड्रिया येथें नेऊन पुरलें. त्याचें सर्व आयुष्य युद्धकामांत व राज्य वाढविण्यांत गेलें. पण त्याचें तें एवढें वैभव, हातची तलवार खालीं बसल्यानंतर, क्षणभरही टिकलें नाहीं. छायेसारखें तें पोकळ व दिखाऊ वैभव जागच्या जागीं लयास गेलें.

---

## प्रकरण एकोणिसावें.

### मासिडोनियन राज्याचे तुकडे.

(इ. स. पू. ३२३–३१६.)

अलेक्झांडर सर्व ग्रीस देशावर राज्य करीत होता. पण स्पार्टाच्या राजानें मात्र त्याचें वर्चस्व कबूल केलें नाहीं. अलेक्झांडरच्या आशियांतील स्वाऱ्यांस इतर ग्रीक संस्थानांनीं पैशाची वगैरे मदत केली, तशी स्पार्टानें केली नाहीं. इतकेंच नव्हे तर तो हेलेस्पांट ओलांडून आशियांत गेला मात्र, तों स्पार्टानें त्याजविरुद्ध खटपट चालविली आणि इराणच्या राजाकडून मिळविलेल्या पैशानें अलेक्झांडरवर उठण्याची सिद्धता केली. त्याला कांहीं ग्रीक संस्थानांनीं मदत केली; पण कांहीं संस्थानें त्या कटांत सामील न होतां, अलेक्झांडरच्या बाजूसच राहिलीं. आथेन्स कोणत्याही पक्षास न मिळतां तटस्थ राहिलें. आर्केडियांतील सर्व शहरें स्पार्टाच्या कटास मिळालीं. फक्त मेगॅलोपोलिस मात्र मिळालें नाहीं. त्याबद्दल स्पार्टाचा राजा तिसरा एजिस ह्यानें त्या शहरास वेढा घातला. आंतील लोकांनीं मासिडोनियाचा कारभारी ॲंटिपेटर ह्याजकडून मदत

मागितली आणि ती येईपर्यंत त्यांनीं मोठ्या शौर्यानें आपला बचाव केला. पुढें त्यांस अँटिपेटरकडून मदत आली, व लढाई झाली तींत एजिस मारला गेला. स्पार्टन लोकांनीं आपले पन्नास सरदार ओलीस देऊन पुनः त्रास देणार नाहीं असें वचन दिलें, तेव्हां त्यांस मासिडोनियन लोकांनीं स्वस्थ राहूं दिलें.

आथेन्स येथें डेमॉस्थेनिसचा गौरव पहिल्याप्रमाणेंच चालू होता. पण मेगॅलेपोलिसच्या लढाईनंतर थोड्याच अवकाशांत, अलेक्झांडर विरुद्ध आथेन्स येथें बंड उभारण्याची खटपट करण्याकरितां, त्यानें लांच घेतला अशी तोहमत त्याजवर आली. पण ह्या आरोपास आधार बिलकुल नव्हता, तथापि त्यास अडीच लाख रुपये दंड करण्यांत आला. तो दंड भरण्यास त्यास ऐपत नसल्यामुळें, त्यास आथेन्स सोडून जावें लागलें, तेव्हां तो इजीना बेटांत जाऊन राहिला.

फिलिप व अलेक्झांडर यांचा काळ ग्रीस देशांत मोठा महत्त्वाचा गणला जातो. त्या वेळीं ग्रीस देशांत अनेक नामांकित विद्वान ग्रंथकार प्रसिद्धीस आले. त्यांचीं नांवें व ग्रंथ अद्यापपावेतों सन्मान्य समजले जातात. अलेक्झांडरचा गुरु अरिस्टॉटल महाविद्वान तत्त्वज्ञ होऊन गेला. अलेक्झांडरचा विद्याक्रम संपल्यावर तो आथेन्स येथें आला. तेथें सरकारांतून त्यास चांगली मदत मिळून त्यानें लायसियम नांवाची शिक्षणसंस्था चालविली. त्या प्रसिद्ध विद्यालयांतील गर्द-छायेच्या झाडांखालीं शतपावली करीत, तो आथेन्सच्या विद्यार्थ्यांस पढवीत असे. आकेडेमी नांवाचें दुसरें एक विद्यागृह होतें, तेथें प्लेटो नांवाचा दुसरा एक नामांकित अध्यापक होता. ह्या गृहास आकेडेमी हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात, कीं स्पार्टाचा राजा मेनिलॉस ह्याच्या मनांत हेलनशीं लग्न करावयाचें होतें. ही हेलन फार सुस्वरूप होती. पण थीसियननें तिला पळवून आटिका-प्रांतांत लपवून ठेविलें. ह्या हेलनचे दोघे भाऊ कॅस्टर व पॉलक्स म्हणून होते, ते तिचा शोध लावीत फिरत असतां, आकेडेमस नांवाच्या एका शूर ग्रीक योध्यानें त्यांस तिचा पत्ता सांगितला. त्यावरून ती त्यांस सांपडली. आकेडेमसचे हे उपकार स्मरण्याक-

रितां असा निर्बंध करण्यांत आला कीं, स्पार्टन लोकांनीं आटिका-प्रांतावर केव्हांही स्वारी केली, तरी आकेडेमसच्या जागेस कोणताही उपसर्ग देऊं नये. पुढें आकेडेमसच्या ह्या जमिनींत आलिव्ह झाडांची बाग करण्यांत आली; आणि तेथें आकेडेमिया नांवाची एक पाठशाला स्थापन करण्यांत आली. त्यावरून, आकेडेमी म्ह० पाठशाला असा शब्द प्रचारांत आला.

ह्या कालचा दुसरा विद्वान गृहस्थ युक्लिड होय. हा मोठा गणिती होता. तो अलेक्झांड्रिया येथें राहत असे. त्याची एक गोष्ट अशी सांगतात, कीं इजिप्टच्या राजा टॉलेमी ह्यानें युक्लिडला विचारलें, 'भूमिति सोपी नाहींका करतां येणार ?' त्यावर युक्लिड बोलला, 'विद्येचा रस्ता एकच, त्यांत सोपा आणि कठीण असा भेद नाहीं.'

मोठमोठे कवि आणि चित्रकारही ह्या काळीं पुष्कळ निपजले. ॲपिलीस नांवाचा चित्रकार नामांकित आहे. सफेत, लाल, पिंवळा व काळा हे चारच रंग ग्रीक चित्रकार वापरीत. पण एवढ्या चार रंगांनीं ते उत्कृष्ट ऐतिहासिक व पौराणिक चित्रें तयार करीत. हीं चित्रें चौकटीच्या पटांवर काढिलेलीं असत. युद्धें वगैरे चालू असतां शत्रूंच्या हातून त्यांचा पुष्कळ वेळां नाश होत असे.

अलेक्झांडरच्या मृत्यूची बातमी समजतांच आथेन्स संस्थानानें आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्याची खटपट सुरू केली. तेथील सरकारानें एक मोठें आरमार तयार करून, चार्लास वर्षाखालील सर्व लोकांस युद्धास बोलविलें. 'ग्रीक संस्थानांची स्वतंत्रता परत मिळविण्याकरितां आम्ही पुढाकार घेत आहों; तरी सर्वांनीं ह्या कामीं मदत करावी,' अशी विनंती करण्याकरितां आथेन्सनें इतर संस्थानांकडे वकील पाठविले. ह्या वकिलांबरोबर डेमॉस्थेनीस गेला; आणि आपल्या वक्तृत्वशक्तीनें पुष्कळांस त्यानें आपल्या पक्षास मिळविलें. तेव्हां त्याजवरची इतराजी कमी होऊन, आथेन्सच्या सरकारानें त्यास इजीना येथून परत आणण्यासाठीं जहाजें पाठविलीं. तो येऊन पिरियस येथें उतरला, आणि मोठ्या समारंभानें आथेन्स येथें आला.

इकडे आशियाच्या भागांत अलेक्झांडरच्या राज्यावर कोणी बसावें याबद्दल पुष्कळ गोंधळ उडाला होता. राणी रोक्झाना इला एक मुलगा नुकताच झालेला होता. शिवाय अलेक्झांडरचा एक सावत्रभाऊ एरिडियस (Aridaeus) नांवाचा होता, पण तो बेअकली व निर्बुद्ध होता. रोक्झानाच्या मुलास गादी द्यावी कीं एरिडियसला द्यावी, ह्या विषयीं फौजेच्या अधिकाऱ्यांत तंटा लागला. पुढें एरिडियसला राज्य देण्याचा विचार ठरला, आणि तो फिलिप नांव धारण करून आशियांतील गादीवर बसला. पण तो कर्तृत्ववान नसल्यामुळें सर्व कारभार सेनापति पर्डिकास ह्यानें आपल्या हातांत ठेविला. इकडे मासिडोनियाचा कारभार अँटिपेटर पाहत असे; आणि इजिप्टचा कारभार टॉलेमी नांवाच्या सरदाराकडे होता. ह्या व्यवस्थेनें पुष्कळ घोटाळा झाला. प्रत्येक कारभाऱ्याच्या मनांत सर्वच राज्य आपणास मिळावें अशी इच्छा उत्पन्न झाली; आणि कांहीं असामी आपापल्या हातीं स्वतंत्र कारभार असावा अशी इच्छा धारण करूं लागले. ही इच्छा तडीस नेण्यासाठीं वाटेल तें दुष्कृत्य करण्यास ते मागें पुढें पाहणारे नव्हते. गुप्तपणें खून करणें, प्रसिद्धपणें ठार मारणें, कत्तली करणें हे प्रकार इतके प्रचलित होते, कीं त्या वेळीं स्वाभाविकः मृत्यु येऊन मरणारे विरळाच असतील. सर्व राज्यांत बेबंदशाही व घोटाळा माजला.

पर्डिकासनें तर क्रूरपणाची सीमा केली. नवीन जिंकलेल्या आशियांतील प्रदेशांत अलेक्झांडरनें पुष्कळ नवीन शहरें व नवीन ग्रीक वसाहती स्थापिल्या होत्या. त्या ठिकाणीं बहुशः लढाईंत जायां झालेले लोक नेऊन वसविलेले होते. त्यांस कांहीं दिवसांनीं स्वदेशीं येण्याची इच्छा झाली; पण त्यांस परत पाठविण्यास तेथचे ग्रीक अंमलदार खुशी नव्हते. त्यामुळें त्यांनीं बंडें केलीं. त्यांस दाबून शांत बसविण्यासाठीं पर्डिकासनें फौज पाठविली; तेव्हां लढाई होऊन त्या बंडखोरांचा पराजय झाला. लढाईंतून जे जिवंत राहिले, त्यांस लष्करचा मुख्य पायथोन ( Pithon ) ह्यानें माफी दिली. पण पर्डिकासनें गुप्त हुकूम पाठविले कीं, त्यांस निःशस्त्र केल्याबरोबर

कापून टाकावें. अशी कत्तल होऊं नये म्हणून पायथोननें शिकस्त केली, तरी कत्तल टळली नाहीं. अशा प्रकारच्या क्रूर कृत्यांनीं दहशत बसवून, कधीं तरी मासिडोनियची गादी मिळवावी, अशी पर्डिकासची हांव होती.

इकडे मासिडोनियाचा कारभारी अँटिपटेर हा ग्रीक संस्थानांशीं लढत होता. त्याजबरोबर सामना करण्यासाठीं पुष्कळ आथीनियन लोक दुसऱ्या फौजा घेऊन थर्मापिलीच्या खिंडींत लिऑस्थेनिसच्या हाताखालीं जमले होते. त्यांची एक लढाई होऊन आथीनियन लोकांस जय मिळाला; आणि अँटिपेटर पळून थेसलीमध्यें लॅरिया म्हणून शहर होतें तेथें गेला. त्या शहरास ग्रीक फौजेनें वेढा घातला. पुढें मॅसिडोनियाहून मदतीस दुसरी फौज आली, तेव्हां आथेन्सच्या लोकांनीं धीर सोडून तहाचें बोलणें सुरू केलें. अँटपेटरनें प्रत्येक संस्थानाशीं पृथक्पणें तह करून साधेल तशीं कलमें साधून घेतलीं. आथिनियन लोकांनीं कांहीं वेळ दम धरिला, पण त्यनांहि शेवटीं अँटिपेटरच्या म्हणण्याप्रमाणें अटी कबूल कराव्या लागल्या. त्यांत एक मुख्य अट अशी होती कीं, आथेन्स येथील प्रजासत्ताक राज्यव्यवस्था मोडून टाकावी, आणि सभेंत मतें देण्याचा अधिकार पुष्कळांस होता तो काढून घ्यावा; म्हणजे सोलनच्या कायद्याअन्वयें ज्याच्याजवळ अमुक एक जिंदगी असेल त्यासच तो अधिकार असावा.

आथेन्सच्या लोकांवर दाब ठेवण्यासाठीं म्युनिचिया बंदरांत मॅसिडोनियाची फौज अँटिपेटरनें ठेवून दिली; आणि आथेन्स येथें झालेल्या बंडांत जे लोक पुढारी होते, त्या सर्वांस अँटिपेटरनें आपल्या ताब्यांत मागितलें. पण ते सर्वच आथेन्स सोडून पळून गेले होते, सबब हातीं आले नाहींत. त्यांस हुडकण्यासाठीं अँटिपेटरनें आपले शिपाई रवाना केले. डेमॉस्थेनिस इजीनानजीक कालौरिया बेटांतील एका देवळांत लपून बसला होता, तेथें अँटिपेटरचे लोक त्यास शोधीत आले, तेव्हां त्यानें विष खाऊन आत्महत्या केली ( इ. स. पू. ३२२ ).

मासिडोनियाचें राज्य बळकावण्याची पर्डिकासची हांव आहे हें अँटिपेटर यास लवकरच समजून आलें. तेव्हां इजिप्तचा राजा टॉलेमी ह्याच्या मदतीनें त्यानें पर्डिकासवर स्वारी केली. पर्डिकास-ही मोठ्या फौजेनिशीं इजिप्तवर आला; परंतु स्वतःच्या क्रूर कृत्यांनीं तो लोकांस इतका अप्रिय झाला होता कीं, त्याच्याच हाताखालील कित्येक लष्करी अँमलदारांनीं त्याचा खून केला.

तेव्हां सर्व राज्याचा कारभार अँटिपेटरच्या हातीं आला. परंतु हें त्याचें वैभव फार दिवस टिकलें नाहीं. तो एक वर्षाच्या आंतच मरण पावला, आणि अलेक्झांडरचा एक जुना सेनापति पोलिपर्चोन (Polyperchon) यास राज्याचा वारस नेमिलें. पण अँटिपेटरचा मुलगा कॅसँडर ह्यास ही व्यवस्था आवडली नाहीं. आपला हक्क राज्यावर आहे असें त्यास वाटून, त्यानें पोलिपर्चोनबरोबर झगडा सुरू केला. कॅसँडर पराक्रमानें कमी नव्हता, पण पर्डिकास-सारखाच दुष्ट व क्रूर होता; आणि आपली इच्छा तृप्त करितांना वाटेल तें अनन्वित काम करण्यास कचरणारा नव्हता. सुमारें दोन वर्षें-पर्यंत ह्या दोघांत लढाई चालली; तींत कॅसँडर यास जय मिळाला, आणि पोलिपर्चोनच्या हातांत थोडीं बहुत शहरें होतीं तीं सुद्धां कॅसँडरच्या पक्षास जाऊन मिळालीं.

ह्या वरील युद्धांत दोन नामांकित स्त्रिया सामील झाल्यामुळें त्यास विशेष महत्त्व आलें आहे; एक अलेक्झांडरची आई आलिं-पिआस, व दुसरी एरिडिअसची बायको युरिडिस. पर्डिकासचा खून झाल्यावर आशियांतलें राज्य आपणास मिळावें, म्हणून ह्या युरिडिसनें खटपट चालविली; आणि मोठ्या धिटाईनें पुढें येऊन, आवेशयुक्त भाषणानें तिनें लष्करास चेव आणिला, आणि अँटिपेटरशीं लढण्यास त्यांस प्रवृत्त केलें. अलेक्झांडर मरण पावल्यावर, युरिडिसनें कॅसँडरशीं स्नेह केला, आणि मोठी फौज बरोबर घेऊन ती ग्रीस देशांत त्याच्या मदतीस येण्यास निघाली. इकडून पोलिपर्चोन हा तिच्याशीं सामना करण्यास गेला. त्याजबरोबर आलिंपियास होती. तीही युरिडिससारखीच शूर असून, स्वतः सैनापत्य स्वीका-

रून पुढें आली होती. ह्या दोघां फौजांची लढाई झाली असती, तर ह्या दोघी स्त्रिया समरांगणावर एकमेकींवर शस्त्र टाकण्यास प्रवृत्त झालेल्या दिसल्या असत्या. पण चमत्कार असा झाला कीं, अलेक्झांडरची आई समोर दिसतांच तिच्यावर युरिडिसची फौज शस्त्र उचलीना. तेणेंकरून युरिडिस अनायासें आलिंपियासच्या हातांत आली. तिला व तिच्या नवऱ्यास आलिंपियासनें अंधारकोठडींत कोंडून ठेविलें. तेथेंच पुढें त्यांचा खून झाला.

आलिंपियास ही क्रूर कर्मे करण्यास कचरणारी नव्हती; आणि तिच्या पापाचें प्रायश्चित्तही तिला लवकरच मिळालें. कॅसँडर मासिडोनियांत आला, आणि त्यानें पिडना शहरास वेढा घातला. पिडना येथें आलिंपियास राहिली होती. हा वेढा कांहीं दिवस चालल्यावर अन्नपाण्याशिवाय आंतल्या लोकांचे हाल होऊन तें कॅसँडरच्या स्वाधीन झालें. स्वाधीन होतांना आलिंपियासचे जिवास अपाय करूं नये असें ठरलें होतें. पण ती कबजांत आल्याबरोबर तिला कोर्टापुढें आणून, कॅसँडरनें तिची चौकशी केली. अलेक्झांडर, त्याची राणी, कॅसँडरचा भाऊ, व आणखी पुष्कळ लोक यांचे खून करविण्याचे आरोप तिच्यावर होते. तपास होऊन तिला मृत्यूची शिक्षा झाली. ती अमलांत आणण्यास कांहीं शिपाई शस्त्रें घेऊन तिच्यावर चालून गेले. पण तिला पाहतांच कांहींचें हात आंखडले; पण त्यांत कित्येक असे होते कीं, त्यांच्या नातेवाइकांस आलिंपियासनें ठार मारलें होतें, त्यांनीं एकदम तिच्यावर तुटून पडून तीस कापून काढिलें. ह्या प्रसंगीं तिनें मोठा धीटपणा दाखविला, असें सांगतात. ( इ. स. पू. ३१६ ).

ह्यानंतर कॅसँडर सर्व राज्याचा मालक झाला. अलेक्झांडरची बायको रोक्झाना व लहान मुलगा ह्यांस त्यानें अँफिपोलिस येथें कैदेंत ठेविलें. नंतर त्यानें थेसलोनिका नांवाची अलेक्झांडरची एक सावत्र बहीण होती, तिच्याशीं लग्न लाविलें, आणि ह्या गोष्टीच्या आठवणीसाठीं थेसलोनिका शहर स्थापिलें. पुढें थीब्स शहर अलेक्झांडरनें धुळीस मिळविलें होतें, तें पूर्ववत् बांधण्याची कॅसँडरनें सुरुवात केली.

---

# प्रकरण विसावें.

## अलेक्झांडरच्या नंतरचे राजे.

(इ. स. पू. ३१६ ते २८०).

मागें सांगितलेले प्रकार युरोपांत घडत असतां, इकडे आशिया खंडांत अँटिगोनस व यूमीन्स (Antigonus and Eumenes) ह्या दोन अलेक्झांडरच्या सरदारांत लढाई सुरू झाली. दोघेही राज्यप्राप्तीकरितां झगडूं लागले, आणि युरोपांत आलिंपियासचा वध झाला, त्या वेळेस इकडे अँटिगोनसला जय मिळून तो आशियांत प्रमुख झाला होता. तो सर्व प्रतिस्पर्ध्यांत विशेष शक्तिमान् असल्यामुळें, त्याजविरुद्ध कॅसँडर, टॉलेमी, लिझिमेकस (Lysimachus) व सेल्युकस ह्यांनीं मोठा कट केला.

ग्रीस देशांत तर सर्व अंदाधुंदी होती. जो कोणी पुरुष पराक्रमानें पुढें येई, तो ग्रीक लोकांस स्वातंत्र्य मिळवून देण्याचें वचन देई; आणि त्या जोरावर ग्रीस संस्थानांची मदत मिळवी. असा प्रकार चालल्यामुळें सर्व संस्थानांतून युद्धें व मंत्रिसभांतून तंटे चालू झाले. आशिया व युरोप दोनही ठिकाणीं अनेक लढाया झाल्या. त्यांत केव्हां या पक्षास तर केव्हां त्या पक्षास जय मिळे. शेवटीं सर्वांसच ह्या लढायांचा वीट आला. तेव्हां इ. स. पू. ३११ ह्या वर्षीं सर्वत्र तह झाला, त्यांत असें ठरलें कीं, कॅसँडरनें मॅसिडोनिया प्रांतांत रीजंट म्हणजे प्रतिनिधीचें काम करावें; लिझिमेकसकडे थ्रेसप्रांत फार दिवस होता, तो त्याजकडे राहवा; टॉलेमीनें इजिप्तमध्यें कारभार करावा आणि अँटिगोनसनें आशियांतील राज्य पाहवें. ह्या तहांत ग्रीक शहरें स्वतंत्र आहेत असा स्पष्ट लेख होता; पण वास्तविकपणें युरोपांत कॅसँडर आपली सत्ता सर्व ग्रीक संस्थानांवर चालवूं लागला आणि इजिप्तमधील ग्रीक संस्थानांस टॉलेमीसनें स्वतंत्र होऊं दिलें नाहीं.

ह्या तहानंतर थोड्याच दिवसांनीं कॅसँडरच्या हुकुमानें अलेक्झांडरची राणी रोक्झाना इचा मुलगा मोठा होत चालला होता, त्याचा वध झाला; तेणेंकरून कॅसँडरचा रस्ता बराच निष्कंटक झाला.

ह्या वधानंतर कांहीं दिवसांनीं पुनः युद्ध सुरू झालें. त्यांत ॲंटिगोनसचा मुलगा डिमेट्रियस हा प्रसिद्धीस आला. ह्या लढाईंतली महत्त्वाची गोष्ट म्हणजे ऱ्होडस्‌चा वेढा होय. त्यापूर्वी डिमेट्रियसनें कॅसँडरच्या कचाट्यांतून आथेन्सची सुटका केली, आणि तेथील प्रजासत्ताक राज्यव्यवस्था पूर्ववत् सुरू केली.

कॅसँडर व टॉलेमी ह्यांनीं सर्व ग्रीक संस्थानांत आपआपलें लष्कर ठेवून बंदोबस्त केला. तेव्हां त्या संस्थानांची आथेन्सप्रमाणेंच सुटका करण्यासाठीं डिमेट्रियस फौज घेऊन आथेन्स येथें आला, तेथें त्याचा अतिशय सत्कार झाला. कॅसँडरचा कारभारी आथेन्स येथें होता, त्यास राजीनामा देऊन जावें लागलें. तेव्हां राज्यकारभार पाहणारी लोकसभा निर्माण झाली. आथीनियन लोकांस इतका आनंद झाला कीं, त्या आनंदाच्या भरांत त्यांनीं डिमेट्रियस व त्याचा बाप ह्यांचीं मंदिरें बांधिलीं, आणि त्यांची ते देवाप्रमाणें पूजा करूं लागले (इ. स. पू. ३००).

पुढच्या वर्षी डिमेट्रियसनें टॉलेमीचा समुद्रावर पराभव केला. त्याबरोबर ॲंटिगोनसनें स्वतः राज्यपद स्वीकारिलें. त्याचेंच उदाहरण टॉलेमी, लिझिमेकस व सेल्युकस ह्यांनीं गिरविलें. सेल्युकसनें बाबिलोनियाचें राज्य मिळवून तें बरेंच वाढविलेंही होतें. त्यानें आपण 'सिरियाचा राजा' असें पद धारण केलें. हाच सिरियन राजघराण्याचा मूळपुरुष होय.

इ. स. पू. ३०१ ह्या वर्षी इप्सस येथें लढाई होऊन तींत ॲंटिगोनस मारला गेला. त्याचें राज्य सेल्युकस ह्यास मिळून त्याची शक्ति वाढली. एकंदरींत आशियाखंडांतील अलेक्झांडरचें सर्व राज्य सेल्युकस ह्यास मिळालें. अलेक्झांडरानंतर विशेष पराक्रमी

व हुशार असा हाच गृहस्थ होय. त्याचें वर्तन क्रूर नव्हतें, आणि ग्रीक सुधारणा आशियांत पसरण्यासाठीं त्यानें पुष्कळ प्रयत्न केले. त्याच्या वेळेस ग्रीक लोकाच्या विद्याकलांची भरभराट झाली. प्रत्येक प्रांतांत त्यानें मॅसिडोनचे व ग्रीसचे लोक आणून वसविले. पुढें त्यांची तेथें चांगली भरभराट झाली अँटिओक शहर अशाच प्रकारें वसलेलें असून, सिरियाची राजधानी म्हणून तें फार प्रसिद्धीस आलें. ग्रीक लोकांस ख्रिस्ती धर्माचा पहिला उपदेश ह्याच शहरीं झाला, आणि ख्रिस्ताच्या भक्तांस ख्रिश्चन हें नांव येथेंच प्रथम मिळालें.

सेल्युकसच्या वंशजांस इतिहासांत सेल्युसिडी असें नांव आहे. त्यांनीं २४० वर्षें सिरियावर राज्य केलें. त्याच्या शेवटच्या राजास रोमन सरदार पांपे ह्यानें जिंकिलें, तेव्हांपासून सिरियाप्रांत रोमन-राज्यांत सामील झाला.

डिमेट्रियसनें कॅसँडरच्या जुलमांतून आथेन्सची सुटका केल्यावर त्यास त्याच्या बापानें र्‍होड्स बेट जिंकण्यास पाठविलें. त्यानें र्‍होड्सला वेढा घातला, तो एक वर्ष चालला. र्‍होड्सच्या लोकांनीं स्वतःच्या बचावासाठीं शिकस्त केली. जे गुलाम शौर्यानें व प्रामाणिकपणानें लढतील त्यांस स्वतंत्र रहिवाशांचे हक्क मिळतील, लढाईत पडलेल्यांच्या आईबापांस सरकार पोशील, आणि त्यांच्या मुलांस सरकार शिक्षण देऊन वाढवील, तसेंच त्यांच्या मुलींचीं लग्नें सरकारांतून करण्यांत येतील, आणि त्यांचीं मुलें वयांत आल्यावर त्यांस सरकारांतून एक एक चिलखताचा संच बक्षीस देण्यांत येईल, अशीं वचनें र्‍होड्सच्या सरकारानें लोकांस दिलीं. अशा युक्त्यांनीं त्यांनीं मोठ्या शौर्यानें टिकाव धरिला.

ह्या वेळ्यांत डिमेट्रियसनें यंत्रशास्त्राचें ज्ञान उत्तम दाखविलें. ‘ शहर काबीज करणारीं ’ मोठमोठीं यंत्रें त्यानें बनविलीं. पण त्यांचा उपयोग झाला नाहीं. र्‍होड्सच्या लोकांस धान्याचा व युद्ध-सामुग्रीचा पुरवठा इजिप्तमधून होत असे; आणि ते इतक्या शौर्यानें लढले कीं, डिमेट्रियला वेढा उठवून तह करणें भाग पडलें. निघून

जाण्यापूर्वीं त्यानें जीं यंत्रें बनविलीं होतीं, तीं ऱ्होड्सच्या लोकास नजर केलीं. तीं यंत्रें विकून जो पैसा आला, त्याचा ऱ्होड्सच्या लोकांनीं एक सूर्याचा पुतळा बनविला. त्यास ऱ्होड्सचें अजब भूषण ' असें नांव असून, जगांतील सात आश्चर्यजनक वस्तूंत त्याची गणना आहे.

ऱ्होड्सचा वेढा उठवून डिमेट्रियस ग्रीस देशांत परत आला, आणि पुनः कॅसँडरशीं त्यानें युद्ध सुरू केलें. बहुतेक मोठमोठ्या संस्थानांतून मॅसिडोनियन फौज त्यानें घालवून दिली; आणि त्यांस स्वतंत्र केलें. त्याचप्रमाणें कॉरिंथ येथें सर्व संस्थांनांची एक सभा भरवून येतें त्यांजकडून आपण सेनापतिपद मिळविलें. ह्याचा परिणाम असा झाला कीं, दुसऱ्याच्या हातून त्या संस्थानांची सुटका करून तीं त्यानें आपल्या ताब्यांत आणिलीं. एकूण परिणाम सारखाच.

ह्या काळाचे सुमारास एपिरसचा राजा पिऱ्हस हा आपल्या शूर कृत्यांनीं बराच प्रसिद्धीस येत चालला होता. त्याच्या मदतीनें आपणांस पुष्कळ फायदा होईल अशा समजुतीनें पिऱ्हसच्या बहिणीशीं डिमेट्रियसनें लग्न लाविलें. पुढें आशियाखंडांत सेल्युकस व लिझिमेकस ह्यांनीं सख्य करून डिमेट्रियसचा बाप जो अँटिगोनस त्याजवर चाल केली. तेव्हां बापानें डिमेट्रियस ह्यास आपल्या मदतीस तिकडे बोलाविलें. पुढें इप्सस येथें लढाई झाली, तींत डिमेट्रियसचा बाप अँटिगोनस मारला गेला; आणि त्याचें राज्य सेल्युकस व लिझिमेकस ह्यांनीं वांटून घेतलें. डिमेट्रियस पळून गेला. पण त्यास ग्रीस देशांत आश्रय मिळाला नाहीं. आथेन्स येथें डिमेट्रियसचें मंदीर बांधून लोक त्याची नुकतीच पूजा करीत होते, पण तेथें सुद्धां लोकांनीं त्याचा प्रवेश होऊं दिला नाहीं.

तेव्हां कॅसँडरची सत्ता ग्रीस संस्थानांत पुनः चालू झाली. पण तो इ. स. पू. २९७ त मरण पावला. त्यामुळें डिमेट्रियसला आपली सत्ता पुनः मिळविण्यास संधि सांपडली. तो बरीच मोठी फौज

घेऊन आटिका प्रांतांत शिरला; आणि सर्व मुलूख उद्ध्वस्त करून त्यानें आथेन्सला जमिनीवरून व समुद्रांतून वेढा घातला. त्याजपाशीं आरमार बरेंच असल्यामुळें, त्यानें इजिप्तहून सामुग्री येण्याची बंदी केली; त्यामुळें आथेन्स त्याच्या स्वाधीन होण्यास वेळ लागला नाहीं. डिमेट्रियसनें पुनः मोठ्या समारंभानें शहरांत प्रवेश केला; पण त्यानें कोणास दुखविलें म्हणून नाहीं. त्याची मोठी इच्छा मासिडोनियाची गादी मिळवावी अशी होती, आणि ती लवकरच सिद्धीस गेली.

कॅसँडरचे दोघे मुलगे मासिडोनियाच्या गादीसाठीं भांडत होते. त्यांपैकीं एक अलेक्झांडर म्हणून होता, त्यानें डिमेट्रियस व पिऱ्हस ह्यांची मदत मागितली. पिऱ्हस प्रथम आला; आणि त्यानें अलेक्झांडरास गादीवर बसविलें. पुढें डिमेट्रियस आला, तेव्हां त्यास आपला बेत फसलासें वाटून, त्याच्या मनांत पिऱ्हसविषयीं वैषम्य उत्पन्न झालें; आणि त्यानें तरुण राजा अलेक्झांडर याचा खून करून आपण लष्करच्या मदतीनें मासिडोनियाच्या गादीवर बसला.

डिमेट्रियसची कारकीर्द क्रूरपणाविषयीं प्रसिद्ध आहे. त्यानें लोकांवर नाना तऱ्हेचे कर बसवून आपल्या चैनीकरितां पैसा उकळिला. त्यानें सात वर्षें राज्य केलें; पण तेवढ्या अवधींत तो अतिशय अप्रिय झाला. शिवाय ग्रीक संस्थानांबरोबर व पिऱ्हसशीं त्याचीं युद्धें निकराचीं चालू होतीं. पिऱ्हस हा त्याचा कट्टा शत्रु होताच. सन २८७ त फौजेंत एक बंड झालें; तेव्हां डिमेट्रियस वेष पालटून पळून गेला. त्यामुळें पिऱ्हसला राज्य मिळालें. पुढें डिमेट्रियस आशियांत गेला; तेथें आपल्या बापाच्या पूर्वींच्या राज्याचा कांहीं भाग मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केला; पण त्यास सेल्युकसनें पकडून दूर सिरियांत पाठवून दिलें, तेथें तो मरण पावला.

पिऱ्हसनें मासिडोनियाचें राज्य फार दिवस केलें नाहीं. त्याचें राज्य लिझिमेकसनें बळकाविलें, तेव्हां पिऱ्हस एपिरस प्रांतांत गेला. तेथें कांहीं दिवस त्यानें शांततेनें राज्य केलें. इटलीच्या दक्षिणेस टारेंटम नांवाचें ग्रीक शहर होतें, तेथच्या ग्रीक लोकांवर रोमन लोकांनीं हल्ले केले असतां, इ. स. पू. २८० ह्या वर्षीं त्या लोकांनीं पिऱ्हसची मदत मागितली, त्याकारणावरून रोमच्या इतिहासांत पिऱ्हसचें नांव प्रसिद्धीस आलें. रोमचें राज्य जिंकावें, नंतर सिसिली आणि कार्थेज जिंकून शेवटीं सर्व ग्रीस देश आपल्या ताब्यांत आणावा, अशी त्याची मोठी इच्छा होती.

---

## प्रकरण एकविसावें.

## गॉल लोकांची स्वारी.

(इ. स. पू. २७९–२४६).

पिऱ्हस इटलींत निघून गेल्यावर, ग्रीस देशावर एका निराळ्याच शत्रूनें स्वारी केली. गॉल नांवाचे लोक रानटी पण शूर होते, त्यांनीं इ. स. पू. २७९ सालीं मासिडोनियावर स्वारी करून, सर्व देश उद्ध्वस्त केला. पुढच्या वर्षीं ते पुनः आले. ब्रेनस म्हणून त्यांचा एक मुख्य सरदार होता. ते थर्मापिलीच्या खिंडीपर्यंत आले, तेव्हां त्यांस अडविण्याकरितां ग्रीक फौज पुढें आली. त्यांची एक लढाई होऊन गॉल लोकांचा पराभव होऊन त्यांचे पुष्कळ इसम पडले, तेव्हां ते परत निघून गेले. तथापि ब्रेनसचा पाडाव झाला नाहीं. त्यानें आपली एक तुकडी इटोलिया प्रांतांत पाठविली, आणि तेथें शहरें लुटून लोकांचे हाल मांडिले. इटोलियाचे लोक थर्मापिलीजवळ लढाईंत गुंतले होते, ते बायकामुलांच्या संरक्षणासाठीं धांवत परत आले. ब्रेनसला असें होईल हें ठाऊकच होतें. पूर्वीं इराण व स्पार्टा याजमध्यें युद्ध झालें, तेव्हां स्पार्टाचा राजा लिओनिडास याजवर थर्मापिलीची खिंड चुकवून ज्या रस्त्यानें

इराणी फौज आली, तोच रस्ता ब्रेनस ह्यास सांपडला; आणि त्या वाटेनें त्यानें आपली फौज पुढें आणिली. ही गोष्ट ग्रीक लोकांस आगाऊच समजल्यामुळें ते आथेन्सच्या गलबतांत बसून पळून गेले. तेव्हां गॉल लोक डेल्फायकडे मंदीर लुटण्याच्या इरा-द्यानें आले. रस्त्यांतील सर्व मुलूख त्यांनीं भयंकर क्रूरतेनें जाळून लुटून फस्त केला. ते डेल्फायच्या मंदिराजवळजवळ आले, तेव्हां तेथचे सुंदर पुतळे, मोठमोठे रथ व भाविक लोकांनीं दिलेल्या इतर देणग्या इत्यादिकांकडे बोट दाखवून ब्रेनस आपल्या लोकांस म्हणाला, 'येथचे देव इतके मातबर आहेत, कीं आम्ही त्यांस कांहीं अर्पण करण्याची जरूर नाहीं. उलट त्यांनींच आम्हांस देणग्या दिल्या पाहिजेत.' इकडे हें बोलणें चालत असतां, डेल-फायच्या फौजेनें मागील टेंकाडावरून गॉल लोकांवर एकदम हल्ला करून त्यांचा पराभव केला. त्या लढाईत स्वतः ब्रेनस जखमी झाला; आणि पराभवानें लज्जित होऊन त्यानें आत्महत्या केली. पुढें गॉल लोक पळून जात असतां, ग्रीक फौजेनें त्यांचा पाटलाग केला आणि बहुतेकांस कापून काढिलें.

इकडे रोमनलोकांशीं चाललेल्या युद्धांत पिऱ्हस ह्यास यश आलें नाहीं; तरी त्यानें इटली आणि सिसिली ह्या दोनही ठिकाणीं असे कांहीं पराक्रम केले कीं, त्या वेळच्या लोकांत तो अतिमोठा योद्धा म्हणून गणला गेला आहे. एपिरसला परत आल्यावर त्यानें मासिडोनियार स्वारी केली, तींत तो विजयी झाला; तेव्हां पुनः त्यास मासिडोनियाचें राज्य मिळालें. हें राज्य मिळाल्याबरोबर दुसऱ्या एका तंट्यांत पडणें त्यास भाग पडलें. स्पार्टाचा एक राजा मरण पावला. त्यास क्रिओनिमस नांवाचा मुलगा होता. ह्या मुलास बापाचे पश्चात् राज्य मिळालें नाहीं; एरियस (Areus) नांवाचा त्याचा चुलत भाऊ राज्यावर बसला. एरियसपासून राज्य परत मिळविण्याच्या हेतूनें, क्रिओनिमसनें पिऱ्हसची मदत मागितली. पिऱ्हस मोठ्या फौजेनिशीं लॅकोनिया प्रांतांत गेला. त्या वेळीं एरियस कोठें बाहेर गेलेला होता, आणि लॅकोनिया शहराचा बंदोबस्त ठीक

नव्हता. तरी पण एरियस परत येईपर्यंत लोकांनीं मोठ्या शौर्यानें शहराचा बचाव केला. एरियस परत आल्यावर त्यानें पिऱ्हस यास आपल्या प्रांतांतून हुसकून लाविलें.

ह्या वेळच्या सुमारास आर्गॉसच्या राज्याविषयीं दोघां हक्कदारांचा तंटा लागला. त्यांपैकीं एकानें पिऱ्हसची मदत मागितली. तेव्हां पिऱ्हस फौज घेऊन आर्गॉस येथें गेला. रस्त्यांत स्पार्टन लोकांनीं त्यास अडविलें असतां, त्यांजशीं लढून तो शहरांत शिरला. स्पार्टन लोक त्याचे मागोमाग आले. त्यांनीं त्यास घेरल्यामुळें त्यानें परत फिरण्याविषयीं आपल्या फौजेस हुकूम केला. पिऱ्हसचे लोक शहराच्या वेशींतून बाहेर पडत असतां, ग्रीक फौजेंत हत्ती असत, त्यांपैकीं एक हत्ती दरवाजांत बसला; त्यामुळें लोकांचा रस्ता बंद झाला आणि दुसरा एक हत्ती पिऱ्हसच्या फौजेंत घुसून त्यानें धुमाकूळ उडवून दिला. त्या दंगलींत एक इसम पिऱ्हसवर वार करण्याच्या हेतूनें पुढें आला, त्यास पिऱ्हस अडविणार, इतक्यांत त्या मारेकऱ्याची आई जवळच्या घरावर उभी होती, तिनें एक कौल घेऊन तें पिऱ्हसच्या अंगावर अशा नेमानें फेंकिलें कीं, लगेच तो घोड्यावरून खालीं आला; त्याबरोबर लोकांनीं त्याचा शिरच्छेद केला. इतिहासांत पिऱ्हसचा मृत्यु महत्त्वाचा आहे. कारण त्याच्या मृत्यूमुळें पुनरपि ग्रीक लोक स्वतंत्रतेकरितां मासिडोनियन लोकांशीं झगडूं लागले. हा झगडा बरेच दिवस चालून शेवटीं त्याचा निकाल न लागतां, मासिडोनियन आणि ग्रीक ह्या दोघांसही रोमन लोकांनीं जिंकिलें.

ह्या वेळीं ग्रीक लोकांची दशा अगदीं हलाकीची आणि होती. जिकडे तिकडे लुटारू लोक देशांत उच्छेद करूं लागले. हे लुटारू लोक केव्हां ह्या पक्षास तर केव्हां त्या पक्षास मिळून देशांत चालणाऱ्या युद्धांत सामील होत. प्रत्येक शहरांत लहान मोठे जुलमी आणि क्रूर अंमलदार निष्पन्न होऊन, त्यांनीं लोकांस सतविण्याचा क्रम आरंभिला. अशी स्थिति कांहीं दिवस चालल्यामुळें आकिआ ( Achæa ) प्रांतांतील शहरांनीं एक जूट बनविली, ती आकियन जूट म्हणून प्रसिद्ध आहे.

ही जूट इ. स. पू. २८०त सुरू झाली. प्रथम चारच शहरांचा एकोपा होता, पण पुढें हळू हळू इतरांनीं आपापल्या वरच्या जुलमी अंमलदारांस काढून टाकिलें; आणि तीं ह्या जुटींत सामील झालीं. हळू हळू दुसऱ्या प्रांतांतील शहरांचाही ह्यांत प्रवेश झाला, आणि शेवटीं सर्व ग्रीक संस्थानांचा त्यांत समावेश होऊन एक मोठें एकीचें राष्ट्र बनणार अशी वेळ आली. अशी एकी झाली असती, तर मासिडो- निया व रोम ह्या दोघांसही ती भारी झाली असती.

आरेटस नांवाचा एक बुद्धिवान व उदार तरुण पुरुष होता, त्यानें हें ऐक्य वाढविण्याची अतिशय खटपट केली. पिलापोनेसस प्रांतांतील सिसियोन ( Cicyon ) चा कारभारी क्लिनियस म्हणून होता, त्याचा आरेटस हा मुलगा. तो सात वर्षांचा असतां त्याच्या बापाचा खून झाला, आणि त्याचा प्राण त्याच्या मावशीनें मोठ्या शिताफीनें वांचविला. ती त्यास गुप्त रीतीनें आर्गास येथें घेऊन गेली. तेथेंच वयांत येईपर्यंत तो राहिला. ग्रीस देशास जिकडे तिकडे उतरती कळा लागलेली पाहून त्यास अत्यंत दुःख झालें, आणि त्यानें राष्ट्राचा बचाव करण्याचा उद्योग सुरू केला. त्याचें जन्मस्थान सिसियन येथील जुलमी अधिकाऱ्यास काढून त्या शहराची सुटका करण्याची खटपट त्यानें प्रथम केली; आणि ह्या हेतूनें त्यानें त्यांत गुलाम, व हद्दपार झालेले लुटारू वगैरे लोक अशा प्रकारचे कांहीं साथीदार जमविले. रात्रीं भिंतीस दोरीच्या शिड्या लावून हे लोक वर चढले आणि तेथचा कारभारी निकोक्लिस ( Nicocles ) ह्याच्या घरावर आले. तेव्हां निकोक्लिस गुप्त रीतीनें पळून गेला. क्लिनिअसचा मुलगा शहराच्या उद्धारार्थ आला आहे असें वर्तमान लगेच जिकडे तिकडे पसरलें. त्याबरोबर नगरवासी लोकांनीं त्याचा जयजयकार केला. आरेटसनें लोकसत्ताक राज्यव्यवस्था सुरू केली, तींत त्यासच मुख्य अधिकार प्राप्त झाला.

ह्या राज्यक्रान्तींत सुमारें सहाशें हद्दपार झालेले लोक परत आपल्या शहरीं आले. त्यांचीं घरेंदारें व जिंदगी दुसऱ्यांस देऊन टाकिलेली होती, ती पुनः त्यांचीं त्यांस परत देण्यास आरेटस ह्यास मोठे प्रयास पडले. इजिप्टचा राजा टॉलेमी फिलाडेल्फस म्हणून होता, तो आरेटसचा स्नेही होता, त्यानें सर्व लोकांची समजूत करण्यास लागणारा पैसा आरेटस ह्यास पुरविला. आरेटसच्या वशिल्यानें सिसियोन शहराचा आकियन जुटींत प्रवेश झाला, व पुढें तोच त्या सर्व जुटीचा मुख्य सेनापति झाला. लवकरच त्यानें कॉरिंथ शहरांतून मासिडोनियन फौज हांकून देऊन त्या शहरास आकियन जुटींत दाखल केलें (इ. स. पू. २४३).

---

## प्रकरण बाविसावें.

## स्पार्टा.

(इ. स. पू. २२५–२१३.)

स्पार्टामध्यें अलीकडे पुष्कळच बदल झाला होता. तेथील जुन्या संस्थांविषयीं कोणासही आशा राहिली नव्हती. इतर ग्रीक लोकांप्रमाणेंच स्पार्टन लोकही ऐषआरामी व डामडौली बनले होते. पूर्वी सर्व लोक गरीब व श्रीमंत सारखेच उद्योगी व कणखर असत. तो प्रकार बदलून हल्लीं श्रीमंत लोकांचा निराळा वर्ग बनला होता. त्यांचा थाट व खर्च फार वाढला. जेवतांना सुद्धां त्यांस मऊ पलंग लागत; आणि उंची उंची अत्तरांशिवाय त्यांचें भागत नसे. सारांश, स्पार्टन लोकांचें पहिलें पाणी सर्व नाहींसें झालें.

जमिनीच्या स्वामित्वासंबंधानें एक नवीन कायदा झाला, तेणेंकरून श्रीमंत आणि गरीब ह्यांजमधील भेद ज्यास्तच वाढला. पूर्वी एकादा इसम मेल्यावर त्याची जमीन त्याच्या वारसाकडे जाई, ती विकण्याची किंवा दुसऱ्या कोणास देऊन टाकण्याची त्यास परवानगी नसे. हा कायदा बदलून नवीन कायद्यांत असें ठरलें

कीं, मालकानें आपल्या जमिनीची व्यवस्था मर्जीप्रमाणें वाटेल ती करावी. ह्याचा परिणाम असा झाला कीं, पुष्कळांच्या हातच्या जमिनी गेल्या आणि त्या एकट्याच्या किंवा थोड्याशा लोकांच्या हातांत आल्या. ह्या वेळीं एकंदर अस्सल स्पार्टन कुटुंबें सुमारें सातशें असून, त्यांपैकीं शंभरांजवळ थोडी बहुत जिंदगी असून, बाकीचे भिकारी व कर्जबाजारी झाले होते.

इ. स. पू. २४४त स्पार्टाची अशी स्थिति होती. ह्या वर्षीं चवथा एजिस राजा गादीवर बसला. तो हुशार होता व आपल्या देशाचें वैभव पूर्वीप्रमाणें वाढवावें अशी त्याची फार इच्छा होती. जमिनीची वांटणी पूर्वीप्रमाणें करावी, व प्रत्येकाची थोडीबहुत जमीन असावी, असा कायदा करण्याची त्यानें शिकस्त केली. त्याची स्वतःची स्थावर जिंदगी फार मोठी होती, ती सोडून देण्यासही तो तयार झाला. पण त्याचे उद्देश श्रीमंत जमीनदारांस पटले नाहींत. विशेषतः त्याचा जोडीदार राजा लिओनिडास ह्यास तर ते मुळींच आवडले नाहींत. त्याच्या स्वदेशाभिमानाखातर त्यास शत्रु मात्र पुष्कळ झाले, व त्यानें चार वर्षें कारभार केला नाहीं, तोंच सरकारचे कायदे मोडण्याचा प्रयत्न केल्याबद्दल ईफोर्सनीं त्यास मरण्याची शिक्षा दिली. तदनुसार तो, त्याची आई, व त्यास मदत देणारी त्याची आजी ह्या सर्वांचा शिरच्छेद झाला. तेव्हां लिओनिडास एकटाच राज्य करूं लागला. तेव्हांपासून स्पार्टावर दोन राजांनीं राज्य करण्याची पद्धत बंद पडली.

ह्या वेळेस रोमन लोक व कार्थेजचे लोक ह्यांजमध्यें युद्ध चाललें होतें. ह्या युद्धांस 'प्यूनिक युद्धें' असें म्हणतात. ह्या युद्धांत स्पार्टाचा सेनापति झांतिपस हा लिओनिडासच्या त्रासानें स्पार्टाची नोकरी सोडून कार्थेजला जाऊन मिळाला; आणि त्यानें रोमन लोकांचा पराभव केला. रोमचा सेनापति रेग्युलस होता. एजीसला मारला तेव्हां त्याची बायको होती, तिचा पुनर्विवाह लिओनिडासनें आपला मुलगा क्लिओमिनिस ह्याजशीं करून दिला. ही बाई मोठी स्वदेशाभिमानी होती. तिनें आपल्या नवऱ्याच्या

मनांत आपले विचार इतके भरविले कीं, एजिसला ज्या उद्योगा-करितां मारिलें, तोच उद्योग सुरू करण्यास तिनें आपल्या नव-ऱ्यास प्रवृत्त केलें. जुनी राज्यपद्धति पुनः अमलांत आणणें मंत्रि-सभेस कबूल होणार नाहीं अशी त्याची खात्रीच होती; पण त्यास वाटलें कीं, जर लष्करी जोरावर स्पार्टन लोकांचा अंमल सर्व ग्रीक संस्थानांवर बसला, तर आपला लष्करी बाणा कायम ठेवण्याकरितां जुनी पद्धत स्पार्टानें अंमलांत आणल्याशिवाय गत्यंतर नाहीं. कारण, त्या पद्धतीमुळेंच आजपावेतों स्पार्टाचा लष्करी पेशा इतका टिकला होता व राज्याची भरभराट झाली होती.

म्हणून लिओनिडास मरण पावल्यावर क्लिओमिनिस गादीवर आला, तेव्हां त्यानें आकिअन जुटीशीं युद्ध सुरू केलें. दोन्ही पक्षांचा उद्देश पिलॉपोनेससमुद्धां सर्व संस्थानें आपापल्या संघांत दाखल करावयाचा असा होता: म्हणजे आकियन जूट व त्याचा पुरस्कर्ता अरिटस ह्यांच्या मनांत स्पार्टानें जुटींत दाखल व्हावें असें होतें, आणि स्पार्टाच्या मनांत सर्वांसच आपल्या ताब्यांत आणावें असें होतें. त्यामुळें आरेटस व क्लिओमिनिस ह्यांचा सामना सुरू झाला.

प्रथमारंभीं क्लिओमिनिसची सरशी होती; आणि आपली शक्ति बरीच वाढली आहे असें समजतांच, त्यानें आपल्या मनांत अस-लेल्या सुधारणा सुरू केल्या. दहा वर्षें सतत उद्योग करून त्यानें ती क्रांति तडीस नेली. पण तींत पुष्कळ रक्तपात झाला. कारण सर्व सत्ता ईफोर्सच्या हातांत असून, ह्या ईफोर मंडळींचा मोड केल्याशिवाय नवीन सुधारणा घडून येणारी नव्हती. ते रात्रीं ज्या घरांत भोजनास बसत, तेथें क्लिओमिनिस कांहीं शिपाई बरोबर घेऊन गेला, आणि चार असामींस त्यानें एकदम ठार केलें. पांचवा एका मंदिरांत लपून बसला म्हणून बचावला. दुसऱ्या दिवशीं क्लिओमिनिसनें ऐशीं नगरवासी लोक हद्दपार केले; आणि सर्वांचें कर्ज नाहींसें करून जमिनीचे सारखे विभाग करण्याच्या उद्योगास तो लागला. त्या वाटणींत हद्दपार केलेल्या ऐशीं असामींचेही

हिस्से ठेविले. कारण सर्व व्यवस्था लागल्यावर त्यांस परत बोलावण्याचा क्लिओमिनिसचा विचार होता. प्राचीन काळीं सर्वांनीं एक ठिकाणीं जमून साधें भोजन जेवण्याची चाल होती, व लहानपणापासून मुलांस कष्ट सोसण्याची संवय लावीत. ते सर्व प्रघात क्लिओमिनिसनें पुनरपि सुरू केले, (इ. स. पू. २२५). इकडे क्लिओमिनिसशीं लढण्याकरितां आरेटसनें मासिडोनियाचा राजा अँटिगोनस ह्याची मदत घेतली अँटिगोनसची स्वतःची महत्त्वाकांक्षा होतीच. ह्या उपक्रमानें सर्व ग्रीस देश कबजांत आणतां येईल अशा उद्देशानें त्यानें आरेटसला मदत दिली. हें युद्ध पुढें तीन वर्षें चाललें; त्यांत लॅकोनियाच्या हद्दीवर सेलासिआ येथें क्लिओमिनिसचा पराभव झाला, आणि अँटिगोनसच्या हातांत स्पार्टाचें राज्य पडलें. तेव्हां क्लिओमिनिसनें केलेले सर्व सुधारे रद्द करून त्यानें पूर्वीची दुर्व्यवस्था पुनरपि सुरू केली. क्लिओमिनिस इजिप्टमध्यें पळून गेला, तेथें त्यानें शेवटीं आत्महत्या केली.

कांहीं दिवसांनीं मासिडोनियाचा राजा अँटिगोनस हा मरण पावला; व त्याचा पुतण्या पांचवा फिलिप गादीवर बसला. तेव्हां त्याचें वय फक्त सतरा वर्षांचें होतें. तरी तो मोठा शूर व शहाणा होता. त्यानें आकियन जुटीस साह्य केलें. ह्या वरील युद्धांत ग्रीस देशाचें अतोनात नुकसान झालें व तें युद्ध इ. स. पू. २१७ त बंद पडलें.

ह्या वेळीं रोम व कार्थेज ह्यांजमधील दुसरें प्युनिक युद्ध अतिशय जोरांत आलें होतें. कार्थेजचा सेनापति हानिबॉल हा ऑल्प्स् पर्वत ओलांडून ह्या वर्षीं फौजेसह विलक्षण साहस करून इटलींत उतरला. कानी येथें जंगी लढाई होऊन रोमन लोक पराभव पावले. लगेच फिलिपनें हानिबॉलकडे वकील पाठवून त्याजशीं स्नेह जोडण्याची विनंती केली. हा वकील आपलें काम उरकून परत येत असतां, त्यास रोमन लोकांनीं पकडून रोम येथें पाठविलें. त्याजवळील कागदपत्रांवरून पुढें येणाऱ्या अरिष्टाची सूचना रोमन लोकांस मिळाली.

फिलिप राज्य करूं लागला; तेव्हां हा चांगला हुशार निपजेल अशी आशा होती. पण लवकरच त्याचा स्वभाव बदलून तो स्वच्छंदी व जुलमी बनत चालला. आरेटसनें त्यास नानाप्रकारें समजाविलें; पण त्याचा परिणाम उलट होऊन फिलिप चिडला, व आरेटसवर त्यानें विषप्रयोग केला, त्या योगें तो मरण पावला. त्याचें शव सिकियन येथें नेऊन लोकांनीं मोठ्या समारंभानें पुरिलें. त्या जागेची मंदिराप्रमाणें लोक पुजा करूं लागले. त्याच्या पूजेकरितां एका पुजाऱ्याची नेमणूक होऊन पुढें कित्येक शतकेंपर्यंत आरेटसचा जन्मदिवस व त्यानें जुलमी लोकांपासून सिकियनची सुटका केलेला दिवस, ह्या दोन दिवशीं विशेष उत्सव होत असे.

---

## प्रकरण तेविसावें.

## स्पार्टाचे जुलमी अंमलदार.

(इ. स. पू. २१३–१८३).

आरेटसच्या मृत्यूनंतर कित्येक वर्षेपर्यंत नानातऱ्हेचे घोटाळे होऊन लहान मोठीं अनेक युद्धें झालीं. त्यांत केव्हां केव्हां रोमन लोक मध्यें पडत; व कोणत्या तरी पक्षास मदत करून नेहमीं फिलिपचा पाडाव करण्याचा प्रयत्न करीत.

एकदां फिलिपनें आटिका प्रांतांवर स्वारी केली; पण आथेन्स शहरीं त्याचा रिघाव न झाल्यामुळें त्यानें रागानें त्या प्रांतांतील पवित्र व सुंदर स्थळें उद्ध्वस्त केलीं; थडगीं व पुतळे फोडिले, आणि आकेडेमी व लायसियम ह्यांतील बागा, झाडें व मंदिरें जाळून टाकिलीं. हें केल्यावर तो लहान लहान खेड्यांत शिरला, तेथेंही सर्व प्रकारची नासाडी केली, त्यांत कित्येक अतिशय प्राचीन, सुंदर व मौल्यवान कामांची त्यानें वाट लाविली.

ग्रीस देशाच्या कारभारांतील आथीनियन लोकांचें वर्चस्व नाहींसें होऊन फार दिवस झाले होते. त्यांचा व्यापार बसून सर्व राज्य लयास गेलें होतें. त्यांचें भव्य आरमार लयास जाऊन फक्त तीन गलबतें राहिलीं होतीं, व त्यांच्या स्वतःच्या कमी पिकांच्या प्रदेशांशिवाय त्यांजवळ मुलूखही फारसा राहिला नव्हता. इजिप्टचे व इतर ठिकाणचे राजे त्यांची कींव करून त्यांस धान्य आणि पैसा पुरवीत. आथेन्सचें राज्य पूर्वी फार बलिष्ठ व महत्त्वाचें असल्यामुळें, त्याजबद्दल सर्वांच्या मनांत मोठी पूज्यबुद्धि वसत असे.

इकडे स्पार्टाच्या लोकांनीं राजा काढून टाकिला, ईफोर्स लोकांचा कारभार बंद केला, आणि अल्पसत्ताक राज्यपद्धति निर्माण केली. पहिला कारभारी मेचानिडास ह्यानें भाडोत्री शिपायांची मदत घेऊन कडक अंमल सुरू केला, व सभोंवारच्या प्रांतांवर दहशत बसविली. त्याची व आकियन जुटीचा सेनापति फिलोपिमेन ह्याची लढाई होऊन मेचानिडास मारला गेला. नंतर नाबिस हा कारभारी झाला. तो इतका क्रूर होता, कीं कित्येक रोमन बादशहा फार क्रूर झाले म्हणतात पण ते त्याच्या पुढें कांहींच नव्हत. शिपायांच्या जोरावर त्यानें सर्व श्रीमंत लोकांस देशांतून काढून लाविलें, आणि इतरांपासून वाटेल तो जुलूम करून पैसे मिळविले. त्यानें मंदिरें लुटलीं; स्पार्टामध्यें सर्व प्रकारचे दुष्ट व बदमाष लोक भरले; गुलामांनीं आपणास आपल्या दुष्ट कृत्यांत मदत करावी म्हणून गुलामगिरींतून सोडवून त्यांस जमिनीचीं उत्पन्नें करून दिलीं.

फिलिप व रोमन लोक ह्यांचें युद्ध चालूच होतें. इ. स. पू. १९८त आकियन जुटीशीं सख्य करण्याकरितां रोमचा वकील आला. ह्या विषयावर ग्रीस देशांत भारी चर्चा सुरू झाली. शेवटीं तह ठरला व आकियन संस्थानांनीं फिलिपचा पक्ष सोडून रोमचा पक्ष स्वीकारिला. त्याचें कारण त्यांनीं असें जाहीर केलें कीं, फिलिपचा पक्ष धरल्यास तो मागें पुढें सर्व ग्रीस देश पादाक्रांत करील.

पुढच्या वर्षी रोमन लोकांनीं फिलिपवर सिनोसिफेली येथें मोठा विजय संपादिला. त्या वेळीं रोमन सेनापति फ्लामिनायनस हा होता.

त्यानंतर तह होऊन असें ठरलें कीं, मासिडोनियन लोकांच्या ताब्यांत असलेलीं ग्रीस मधील सर्व शहरें रोमच्या ताब्यांत द्यावीं; दंड न घेतां सर्व कैदी सोडून द्यावे; पांच लढाऊ गलबतें व एक राजाचें गलबत एवढीं ठेवून बाकीचें सर्व आरमार रोमच्या स्वाधीन करावें, आणि एक हजार टालेंट म्हणजे पंनास लाख रुपये फिलिपनें दंड द्यावा. हा तह कॉरिंथ येथें झाला. त्या वेळीं तेथें खेळाचा उत्सव चालू असून सर्व ठिकाणचे लोक जमले होते व रोमन लोक पुढें काय करतात हें उत्सुकतेनें पाहत होते. खेळ सुरू होण्यापूर्वी चोपदारानें तुतारी वाजवून जाहीर केलें कीं, 'रोमन लोकांनीं मासिडोनियन लोकांस जिंकून त्यांच्या ताब्यांतील सर्व ग्रीस देशास स्वातंत्र्य दिलें आहे, आणि लष्करच्या खर्चाचा किंवा खंडणीचा बोजा त्यांनीं ग्रीक लोकांवर घातला नाहीं.' ह्या पुकारणीनें जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला. खेळ संपल्यावर, ग्रीस देशाचा उद्धारक रोमन सेनापति 'फ्लामिनायनस ह्याच्यावर लोकांनीं रस्त्यांत फुलें उधळिलीं.

ही बातमी तात्काळ सर्व देशभर पसरली, व सर्वत्र मोठा जयघोष सुरू झाला. ह्या आनंदाच्या भरांत, ज्यांनीं आपणांस एकाच्या जाचांतून सोडविलें तेच आपणास गुलाम करतील, हें ग्रीक लोकांच्या मनांत आलें नाहीं.

स्पार्टाच्या नाबिसनें आर्गास काबीज केलें होतें, म्हणून कॉरिंथच्या तहानंतर फ्लामिनायनस स्पार्टावर गेला. त्यानें स्पार्टास वेढा घालून व एकदम हल्ला करून तें शहर काबीज केलें, तेव्हां नाबीसनें आर्गास व लॅकोनियाचीं सर्व बंदरें व आपलें सर्व आरमार सोडून देऊन आणि अडीच लाख रुपये दंड देऊन फ्लामिनायनसशीं तह केला. पुढें हा रोमन सेनापति आर्गास येथें गेला असतां, त्यास लोकांनीं नायमियन खेळांत अग्रस्थान दिलें, ( इ. स. पू. १९५. )

रोमन फौज निघून गेल्यावर आपलीं गेलेलीं बंदरें परत मिळविण्याचा नाबिसनें उद्योग सुरू केला. तो सफळ न होतां आकियन सेनापति फिलोपिमेन ह्यानें त्याचा पराभव केला. पुढें लवकरच

त्याचा खून झाला. त्यावर स्पार्टामध्यें मोठी दंगल उद्भाली, तिचा परिणाम असा झाला कीं, इ. स. पू. १९२त स्पार्टन लोक आकियन जुटींत सामील झाले.

ह्याच सुमारास सिरियाचा राजा अँटिओकस ह्यानें ग्रीसदेशावर स्वारी केली. त्याचा उद्देश ग्रीसदेशांत रोमन लोकांचें प्राधान्य टिकूं द्यावयाचें नाहीं असा होता. अँटिओकसचा उद्देश सिद्धीस गेला नाहीं. त्यास कांहीं संस्थानें मिळालीं; पण आकियन, आथीनियन व मासिडोनियन लोक रोमच्या पक्षासच राहिले. तेव्हां थर्मापिलीच्या खिंडींत पराभव पावून अँटिओकस परत आशियांत गेला.

पुढें लवकरच स्पार्टांत नवीन तंटे उपस्थित झाले. नाबिसनें ज्यांस नवीन जमिनी दिल्या होत्या, त्यांस अशी भीति पडली कीं, हद्दपार झालेले लोक परत येऊन आपली जिंदगी घेतील. म्हणून त्यांनीं बंड केलें; आणि फिलोपिमेनच्या कांहीं साथीदारांस ठार मारिलें. म्हणून फिलोपिमेननें स्पार्टावर स्वारी करून तें शहर काबीज केलें. बंडखोरांस त्यानें चांगलेंच शासन केलें. त्यांच्यापैकीं मुख्य मुख्य ऐशीं असामींस फांशीं दिलें; व ज्यांस नाबिसनें स्वतंत्रता दिली होती, त्या सर्वांस हद्दपार केलें. स्पार्टाचे तट त्यानें पाडून टाकिले. हद्दपार केलेले लोक परत बोलाविले, आणि तीन हजार लोकांनीं शहर सोडून जाण्याचें नाकारिलें, म्हणून त्यांस गुलाम करून विकिलें. त्यानें लायकरगसचे कायदे सर्व बंद करून, स्पार्टांत आकियन जुटीचे कायदे सुरू केले. ह्याप्रमाणें आज कित्येक शतकेंपावेतों स्पार्टन लोकांनीं आपला विशिष्ट बाणा कायम टेकिला होता तो सर्व नाहींसा झाला.

ह्यानंतर सहा वर्षांनीं फिलोपिमेन मेसीन येथें एक बंड मोडीत असतां पकडला गेला. त्यास कैदेंत टाकिलें, तेथें विष पाजून त्यास ठार मारण्यांत आलें. त्याच्या मागून लायकोर्टास हा सेनापति झाला. त्यानें मेसेनियन लोकांचा चांगलाच सूड घेतला; त्यांच्यांतील प्रमुख लोकांस पकडून त्यानें ठार मारिलें, (इ. स. पू. १८३).

---

# प्रकरण चोविसावें.

## रोमचा कबजा.

( इ० स० पू० १७९–१४६. )

मासिडोनियाचा राजा फिलिप इ. स. पू. १७९ त मरण पावल पश्चात् त्याचा मुलगा पर्सियस ( Perseus ) गादीवर बसल मरणसमयीं फिलिपचें राज्य उत्तम भरभराटींत होतें. कोणाशीं टक्कर देण्याची त्यास शक्ति होती. पण रोमन लोकांपुढें त्यान टिकाव लागला नाहीं. त्यांनीं पर्सियसशीं युद्ध सुरू केलें.

ह्या वेळेस इटली, सिसिली, सार्डिनिया, स्पेन व आशिया मा नरचे कांहीं भाग इतके प्रदेश रोमच्या ताब्यांत आले हो त्यांस आतां मासिडोनियासुद्धां सर्व ग्रीसदेश जिंकण्याची उत्कंट झाली. हें युद्ध इ. स. पू. १७१त सुरू झालें.

आकियन जुटीच्या प्रमुख लोकांस अशी पंचाईत पडली की आपण रोमन लोकांस मिळावें कीं, तटस्थ रहावें ? लायकोट व त्याचे दोस्त यांनीं तटस्थ राहण्याची सल्ला दिली. पण दुसर एक पक्ष होता, त्याचा मुख्य कालिक्रेटिस हा होता, त्यानें रोम लोकांस साह्य करण्याची सल्ला दिली. बरीच चर्चा होऊन लाय कोटीसचे विचार सर्वांस पसंत झाले, व हा निश्चय रोमन वकील मार्शस ( Marcius ) ह्यास कळविण्याकरितां आकियन जुटी आपला वकील पोलिबियस ह्यास मासिडोनियांत पाठविलें. " मा जरूर तर आम्ही साह्य करण्यास तयार आहों, " अशी सूचना त्य वकिलानें रोमन लोकांस केली.

पर्सियस व रोमन लोक ह्यांचें हें युद्ध चार वर्षें चाललें. एवढ्या अवधींत रोमच्या पक्षांत असलेल्या ग्रीक शहरांस रोमन लष्कराच्या जुलमाचा आणि लुटीचा फारच जाच झाला. मोठमोठ्या लोकांच्य घरांत रोमन खलाशी खुशाल जाऊन राहिले. ह्या दुष्ट व

अनाहूत पाहुण्यांपासून सन्मान्य गृहस्थांच्या कुटुंबास पुष्कळ मानहानि सोसावी लागली. शत्रूच्या मुलखांत तर रोमन लोक ग्रीक लोकांहून कांहीं कमी नव्हते. एखादें शहर जिंकल्यावर तेथील लोकांस असा कांहीं जाच होई कीं, त्यांत स्त्रिया किंवा वृद्ध पुरुष यांचीसुद्धां कोणी कींव करीत नसे.

इ. स. पू. १६८ ह्या वर्षीं पीडना येथें लढाई होऊन युद्धाचा निकाल लागला. ह्या लढाईत रोमन मुत्सद्दी एमिलियस पॉलस ह्यास मोठा जय मिळाला. पर्सियस हा कुटुंबसह रोमन सेनापतीच्या स्वाधीन झाला. त्यास त्यानें मोठ्या सन्मानानें वागविलें. दुसऱ्या वर्षीं पॉलस हा सर्व ग्रीक संस्थानांतून लोकांची गाऱ्हाणीं ऐकत फिरला. पुढें तो अँफिपोलिसला गेला. तेथें दहा रोमन अधिकारी नेमून त्यांच्याकडून मासिडोनियाचा सर्व राज्यकारभार चालावा अशी व्यवस्था केली. प्रांताचे चार भाग करून प्रत्येकावर एक मासिडोनियन लोकांचें कौन्सिल नेमिलें. हे चार भाग एकमेकांपासून सर्वथैव अलग केले होते, म्हणजे एका प्रांतांतील लोकांनीं दुसऱ्या प्रांतांतील मुलींशीं लग्नव्यवहार करणें, किंवा दुसऱ्या प्रांतांत घरदार बांधून जिंदगी मिळविणें ह्या गोष्टी मना केल्या होत्या.

एका गोष्टींत ही नवीन व्यवस्था फायदेशीर झाली. रोमन लोकांनीं खंडणी फार कमी बसविली. मासिडोनियाच्या राजास त्यांजकडून खंडणी द्यावी लागे, त्याच्या निमे रक्कम रोमन लोकांनीं बसविली. मासिडोनियाची ही नवीन राज्यव्यवस्था ठरली, तेव्हां ग्रीक लोकांनीं मोठे खेळ करून आपली पूर्वींची उत्सवप्रियता ह्या प्रसंगींही व्यक्त केली.

इटलीस परत येण्यापूर्वीं, रोमन सेनेटच्या हुकुमानें पॉलस हा एपिरस प्रांतांत गेला. तेथें पर्सियसला सामील असलेलीं सत्तर शहरें त्यानें धुळीस मिळविलीं. रोमन शिपायांनीं हीं शहरें लुटून त्यांचे तट पाडून टाकिले आणि लोकांस गुलाम म्हणून विकिलें.

एमिलियस पॉलस रोम येथें परत आल्यावर त्यास मोठ्या समारंभानें मिरवीत लोकांनीं रोम शहरीं आणिलें. त्याच्या रथामागें मासिडोनियाचा कैदी राजा आपल्या मुलांसह पायीं चालत होता. त्यास पुढें अंधारकोठडींत कोंडून ठेविलें, तेथून लवकरच त्याची सुटका होऊन त्यास आल्बा येथें राहण्यास परवानगी दिली. तेथेंच तो मरण पावला.

पीडनाच्या विजयानंतर आकियन जुटींतल्या सुमारें एक हजार लोकांस कालिक्रेटिसनें रोमचे शत्रु असें ठरविलें, आणि त्यांस पकडून रोम येथें पाठविलें. तेथून त्यांस इटलीच्या निरनिराळ्या शहरांत पाठवून हद्दपार केलें. ह्या हद्दपार झालेल्या मंडळींत पोलिबियस हा इतिहासकार होता. पॉलसचे मुलगे फेबियस व सिपियो यांच्या मध्यस्थानें पोलिबियस ह्यास रोम येथेंच ठेवण्यांत आलें. तो नेहमीं सिपियोबरोबर त्याच्या सर्व मोहिमांत हजर होता. सिपियोनें इ. स. पू. १४६त कार्थेज जाळिलें, त्या वेळीं तो हजर होता.

कार्थेजचा पाडाव करण्यापूर्वीं थोडीं वर्षें सिपियोनें सेन्सॉर (Censor) केटो ह्याशीं रदबदली करून हद्दपार केलेल्या ग्रीक लोकांस परत त्यांच्या स्वदेशीं पाठविण्याविषयीं सेनेटचा हुकूम मिळविला. हा हुकूम झाल्यावर जिवंत असलेल्या सर्व ग्रीक लोकांस फार दिवसांनीं स्वदेशीं जाण्याची परवानगी मिळाली. परत गेल्यावर त्यांचे पूर्वींचे हक्क त्यांस परत मिळावे, म्हणून पोलिबियसनें केटोची विनंति केली; पण तो वृद्ध मुत्सद्दी मान हलवून बोलला, 'उगाच फाजील मागणी केल्यानें मिळालें आहे तेंही जाईल, ह्याचा विचार करा.'

रोमन लोकांनीं ग्रीसवर आपला पगडा हळू हळू ज्यास्त बसविला. आपलें वजन चांगलें बसावें म्हणून आकियन जूट फोडण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, आणि आर्गास, कॉरिंथ व स्पार्टा हीं तीन मुख्य शहरें त्यांतून अलग केलीं. आकियन लोकांस ही फूट न आवडून त्यांनीं रोमबरोबर युद्ध पुकारिलें. पण ह्याचा त्यांस लवकरच

प्रस्तावा झाला. ज्या प्रमुख गृहस्थांनीं त्यांस युद्ध करण्याची भर दिली, तेच नाना प्रकारचे जुलूम करून लोकांपासून खर्चासाठीं पैसे उकळूं लागले; आणि जबरदस्तीनें त्यांचे गुलाम लष्करांत दाखल करूं लागले. पण त्यांचे हे सर्व प्रयत्न फुकट होते. रोमन सेनापति मिटेलस ह्यास अनेक विजय प्राप्त झाले, आणि त्यानें आकियन जुटीच्या संयुक्त फौजेचा पराजय करून कॉरिंथ शहरांत प्रवेश केला, आणि तें शहर जाळून लुटून फस्त केलें. (इ. स. पू. १४६.)

कॉरिंथच्या लोकांस गुलाम म्हणून विकिलें. तेथें जीं कला-कौशल्याचीं अनेक सुंदर व नामांकित कामें होतीं, तीं रोमन लोकांच्या हातांत पडलीं. त्यांची किंमत समजण्याइतके रोमन लोक त्या वेळीं सुसंस्कृत झालेले नव्हते. रोमन लोकांच्या ठिकाणीं कला आणि भाषा यांजबद्दल आवड उत्पन्न होण्यास आणखी दोनशें वर्षें लागलीं, आणि ग्रीस देश त्यांनीं जिंकिला म्हणूनच त्यांची सुधारणा होऊन रोमन राष्ट्र नामांकित झालें. कॉरिंथ येथील अनेक चित्रें व पुतळे ममियसच्या हातांत सांपडले त्यांतील कित्येक उत्तमोत्तम त्यानें पर्गेमोस (Pergamos) च्या राजास विकले; आणि बाकीचे गलबतांत घालून रोम येथें पाठविले. मात्र रस्त्यांत त्यांस धक्का लागूं देऊं नये, अशी हमी त्यानें गलबताच्या नाखव्यांपासून घेतली. पोलिबियस आपल्या इतिहासांत स्पष्ट लिहितो कीं, 'कित्येक अतिमोलवान चित्रांवर पट मांडून फांशांनीं खेळतांना रोमन लोकांस मी स्वतः पाहिलें आहे.' ह्यावरून त्यांस ह्या चित्रांची किंमत समजत नव्हती, हें उघड आहे.

ममियस ग्रीस देशांत दोन वर्षें राहिला. त्यास प्रो. कॉन्सल म्हणजे सुभेदार अशी पदवी होती. इ. स. पू. १४५ ह्या वर्षीं ग्रीसच्या राज्यकारभाराची व्यवस्था लावून देण्याकरितां रोमहून हुशार गृहस्थांच्या कमिट्या पाठविण्यांत आल्या. थेसली आणि एपिरस हे दोन प्रांत खेरीजकरून बाकीचा सर्व ग्रीस देश मासि-डोनिया प्रांतांत मोडत होता.

# प्रकरण पंचविसावें.

## रोमन अंमलाखालीं ग्रीसची स्थिति.

( इ. स. पू. १४६–१४५३. )

रोमन लोकांनीं ग्रीस देश जिंकल्यावर त्या देशाचें पूर्वींचें स्वातंत्र्य कांहीं राहिलें नाहीं. तथापि तेथील लोकांची एकंदर स्थिति पुष्कळ दिवसपर्यंत फारशी बदलली नाहीं. बाह्यतः तरी निरनिराळ्या ग्रीक संस्थानांची राज्यव्यवस्था प्रजासत्ताकच होती. पण वस्तुतः सर्व कारभार रोमन अंमलदारांच्या मर्जीप्रमाणेंच चालत असे.

अजून पुष्कळ शतकेंपर्यंत ग्रीस देशांत, किंबहुना सर्व जगांत, आथेन्स हेंच विद्येचें आदिस्थान होतें. रोमचे तरुण आणि घरंदाज लोक आपली विद्या पूर्ण करण्याकरितां आथेन्स येथें जात असत. होरेस व सिसरो ह्यांनीं आपली विद्या आथेन्स येथें पूर्ण केली. ग्रीक लोकांचे धर्माचार रोमन लोकांनीं बदलिले नाहींत. त्यांचे राष्ट्रीय उत्सव पूर्वींप्रमाणेंच चालत, व त्यांत रोमन लोकही सामील होत.

रोमन लोकांच्या प्रथमच्या अमदानींत तर त्यांच्या अमलाचें ओझें ग्रीक लोकांस दुःसह वाटलें नाहीं. रोमन लोकांनीं दुसरे देश जिंकले, त्यांतील प्रकार वेगळा, आणि ग्रीसचा वेगळा. इतर देश पूर्वीं अगदींच रानटी होते. त्यांत नवीन सुधारणा एकदम जबरजस्तीनें करणें रोमन लोकांस भाग पडलें. पण ग्रीक लोकांविषयीं म्हटलें तर जिंकलेल्या लोकांस सुधारण्याचा प्रश्नच नसून, उलट जिंकणारांसच त्यांपासून पुष्कळ गोष्टी शिकावयाच्या होत्या.

ग्रीस देश रोमनें पादाक्रांत केल्यावर, सुमारें साठ वर्षांनीं ग्रीक लोकांनीं स्वातंत्र्य मिळविण्याची पुनः एकवार खटपट केली. पण त्यांचे सर्व प्रयत्न फुकट गेले. रोमन सेनापति सिला मोठी फौज घेऊन ग्रीस देशांत आला, आणि त्यानें सर्व बंडखोर शहरांची खोड मोडून तीं रोमन अंमलाखालीं आणलीं. आथेन्स शहरही रोमच्या ताब्यांत गेलें. लोकांनीं आपले अंमलदार आपण

पसंत करावे, आणि आपले कायदेही आपण करावे, अशी सवलत सिलानें आथेन्सच्या लोकांस दिली. पुढें त्यानें पिरियस जिंकलें आणि तेथील तटबंदी पाडून टाकिली. कांहीं दिवसांनीं ग्रीक लोकांची स्वातंत्र्याची धडपड कायमची बंद पडली, ( इ. स. पू. ८७ ).

ग्रीक संस्थानांनीं स्वतःची फौज ठेवूं नये अशी रोमन लोकांची सक्त व्यवस्था असल्यामुळें, देशांत चांचे लोकांचा उपद्रव जिकडे तिकडे सुरू झाला, सरकारची सक्तिही फार दुःसह होऊं लागली. तेथें येणारे कारभारी ठरावापेक्षां ज्यास्त कर लोकांपासून घेत; तसेंच पैसे भरून रोमन नागरिकत्वाचा हक्क मिळविण्याची सवलत ऐपतदार ग्रीक लोकांस देण्यांत आल्यामुळें, त्यांजवरील करांचा बोजा नाहींसा होऊन, उलट गरीब लोकांवर मात्र तो ज्यास्तच बसला; तेणेंकरून लोकांस अतिशय जाच होऊं लागला. त्यांत आणखी अशी भर पडली कीं, वरप्रमाणें जमविलेला पैसा रोम येथें पाठविण्यांत येऊं लागल्यामुळें, देशास दरिद्रावस्था प्राप्त झाली. व्यापार, संपत्ति, आणि लोकसंख्या सर्व कमी होत चाललीं; आणि अनेक ग्रीक शहरें बसून गेलीं. मुलखांतही पाहवें तिकडे ओसाड गांवें व पडित जमिनी ह्यांचा दुःखद देखावा दृष्टीस पडूं लागला.

जूलियस सीझरनें कॉरिंथ येथें लष्करी तटबंदी केली. पण ह्या कृत्यास पुरेसा पैसा नसल्यामुळें, गंवडी लोकांनीं कबरींचे व थडग्यांचे सुद्धां दगड काढून ह्या कामास लाविले. तथापि कित्येक लोक आपलें पूर्वीचें वैभव दाखविण्याचा आव घालीत; व त्यांस थोडी बहुत स्वतंत्रताही असे. निदान आपले अंमलदार आपण नेमणें, व रस्ते, शाळा, मंदिरें, इत्यादि स्थानिक उपयोगाच्या कामांसाठीं कर बसवून पैसे मिळविणें, ह्या गोष्टी त्यांस करतां येत होत्या.

ॲंफिक्टियॉनिक कौन्सिलच्या सभा पूर्वीप्रमाणें होत असत; तसेंच डेल्फायच्या मंदिरांत जाऊन ग्रीक लोक पूर्वीप्रमाणेंच कौल घेत असत. आथेन्स येथें एरियोपेगस व स्पार्टा येथें तीच संस्था आपापलीं कामें करीत होत्या. तरी ग्रीक लोकांची गरिबी वाढतच गेली. रोमन सावकारांपासून त्यांनीं रकमा कर्ज घेतल्या, त्या

फेडण्यास त्यांस आपल्या जिंदग्या विकाव्या लागल्या. मोठमोठ्या जमिनी परकी लोकांच्या ताब्यांत गेल्या; आणि ग्रीक लोक फक्त शेतकरी बनले, अल्पस्वल्प जमिनी मात्र त्यांजकडे राहिल्या.

कित्येक रोमन बादशहांनीं ग्रीस देशांत अनेक सत्कृत्यें केलीं. उदाहरणार्थ, हेड्रियननें कित्येक भव्य मंदिरें बांधिलीं; कॉरिंथ येथें सार्वजनिक स्नानगृहें बांधून, उत्तरेकडून पेलॉपोनेससपावेतों गाडीचा रस्ता केला. मार्कस ऑरेलियसनें आथेन्स येथें शालागृहें बांधिलीं; व शिक्षकांचे पगार वाढविले. दुसऱ्या कित्येक बादशहांनीं वेळोवेळीं पडलेलीं शहरें बांधिलीं व दुरुस्त केलीं. तरी इतर राष्ट्रांच्या मानानें ग्रीस देशाचा ऱ्हास होत चालला होता, तो रोमन बादशहांच्या अमदानींत बंद झाला नाहीं.

आर्केडियस व होनोरियस ह्या बादशहांच्या कारकिर्दींत ग्रीक लोकांवर गॉथ लोकांनीं स्वारी केली, तेणेंकरून ते एकदम खडबडून जागे झाले. ह्या रानटी गॉथ लोकांनीं आथेन्स लुटलें, सर्व देश धुळीस मिळविला, आणि पुष्कळ लोकांस धरून नेऊन गुलाम म्हणून विकिलें. तेव्हांपासून ह्या गॉथ लोकांचा त्रास ग्रीक लोकांस सदैव होऊं लागला. त्यांनीं शेवटीं रोमन बादशाहीचा सुद्धां विध्वंस केला.

मध्यंतरीं ग्रीस देशांत आणि विशेषतः पूर्वेकडील भागांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार सुरू झाला. युरोपियन ग्रीस देशांत प्राचीन काळचा धर्म संपुष्टांत येऊन, कान्स्टंटाइन बादशहाच्या वेळेस ख्रिस्ती धर्माचा प्रवेश सर्वत्र झाला. दुसरा एक मोठा फरक असा झाला कीं, रोमन बादशाहीची राजधानी रोम शहर होती, तें बदलून बायजांटियम शहर राजधानी झालें. बादशहानें हें राजधानीचें शहर इ. स. ३३१ त पुनः बांधून त्यास कॉन्स्टांटिनोपल असें नांव ठेविलें.

तेव्हांपासून रोमन बादशाहीचे दोन तुकडे झाले, एक पूर्वेकडचा, व एक पश्चिमकडचा. पूर्वबादशाहींत ग्रीसचा समावेश होऊन, तेथचा राज्यकारभार ग्रीक राजांच्या हातीं गेला. राज्याचे असे विभाग झाल्यावर गॉथ लोकांचा नायक अलॅरिक ह्यानें ग्रीसवर स्वारी केली. त्या वेळीं फार दिवसांच्या शांततेनें ग्रीस देश सधन

झाला होता. पण ह्या रानटी व लुटारू गॉथ लोकांनीं देशाची अशी दुर्दशा केली, कीं तींतून तो पुनः वर निघाला नाहीं.

थीब्स शहराची नवीन तटबंदी झाल्यामुळें तें फार मजबूत झालें होतें, तें काबीज करण्याचा प्रयत्न अलॅरिकनें केला नाहीं. आथेन्सच्या वाटेसही तो गेला नाहीं. पण बाकीचा आटिका प्रांत त्यानें धुळीस मिळविला. इल्युसिस शहर आणि तेथचें मंदिर ह्यांचा नाश झाला, आणि सर्व पेलॉपोनेसस प्रांत लढाईंत जाळपोळ होऊन उध्वस्त झाला. कॉरिंथ, आर्गॉस आणि स्पार्टा हीं शहरें धुळीस मिळालीं शिवाय, किती जिंदगी आणि माणसें ह्यांचा नाश झाला त्याची गणती नाहीं. ह्या स्वारीपासून वरिष्ठ दर्जाचे ग्रीक सर्व नाहींसे झाले; पुष्कळ लोक तलवारीखालीं मेले; आणि बाकी राहिले त्यांची सर्व जिंदगी आणि गुलाम नाहींसे झाल्यामुळें, ते केवळ शेतकरी बनले, आणि कांहीं देशत्याग करून निघून गेले.

अलॅरिक व त्याचे गॉथ लोक ग्रीस देश धुळीस मिळवीत असतां, इकडे हूण नांवाचे दुसरे कोणी रानटी लोक आशियाखंडांत सिरिया देश लुटूं लागले. थ्रेस आणि मासिडोनिया हे प्रांतही अशाच रानटी लोकांनीं लुटून फस्त केले.

ग्रीस देशांतील गुलामांत आणि खेडूत लोकांत एक प्रकारचा भेद नहमीं बाळगण्यांत येत असे. हा भेद नाहींसा करण्यासाठीं रोमन लोकांनीं वेळोवेळीं पुष्कळ कायदे केले. धन्यांनीं आपल्या गुलामांस शेतीशिवाय दुसरीं कामें सांगूं नयेत; ज्यानें जमिनीची लागवड तीस वर्षेंपर्यंत केली असेल, त्यास ती जमीन सोडतां येऊं नये; त्याच्या वंशजांनींही, इतर बाबतींत ते कितीही स्वतंत्र असले तरी, ती सोडून जातां नये, अशी कायद्यानें तजवीज केली. ह्याप्रमाणें देशांतील खालच्या पायरीचे लोक आणि गुलाम ह्यांचा एक जीव होऊन सर्फ म्हणजे नोकर असा एक नवीन वर्ग बनला.

ख्रिस्ती धर्माचा प्रचार ग्रीस देशांत चालू झाला, तरी खालच्या प्रतीचे लोक मूर्तिपूजेचे समारंभ व विधि पाळीतच असत. हीं मूर्ति-

पूजा जस्टिनियन बादशहाच्या वेळेपर्यंत चालू होती. जस्टिनियननें ती बंद केली; आणि देशांत अनेक ख्रिस्ती मंदिरें व मठ बांधिले.

तथापि जस्टिनियननें ग्रीस देशावर फार जुलूम केला. त्यानें स्वतंत्र शहरांची संपत्ति हरण केली, व त्यांचे हक्क काढून घेतले. पुढें करांचें ओझें वाढलें, आणि लोक भिकेस लागले, तेव्हां ते आपल्या पूर्वजांच्या कला व विद्या विसरून गेले, व अज्ञानी बनले. जस्टिनियनच्या कारकिर्दीत रेशमाच्या किड्यांची झाडें लावून रेशिम तयार करण्याची विद्या युरोपांत आली, व तेव्हांपासून ह्या धंद्याचा प्रसार सर्व ग्रीस देशांत झाला.

ग्रीसची लोकसंख्या कमी झाली, तेव्हां उत्तरेकडून नवीन लोक देशांत शिरले; व पूर्वी इलिरियन आणि इतर रानटी लोक अल्बेनियन नांवानें देशांत होते, त्यांस त्यांनीं थेट दक्षिणेंत हांकून दिलें. त्या ठिकाणीं जुन्यांचें व नव्यांचें मिश्रण झालें. म्हणून हल्लींच्या ग्रीक लोकांची उत्पत्ति ह्या मिश्रणापासून झाली आहे. ते अस्सल हेलन लोकांचे वंशज नव्हत. हळू हळू गुलामांची संख्या नाहींशी झाली. जर्मनीच्या जंगलांतून हत्यारबंद लोकांच्या नवीन टोळ्या आल्या, त्यांनीं थेसली व मासिडोनिया प्रांतांत वस्ती केली.

ग्रीक शहरांचा आणि ग्रीक सुधारणेचा ऱ्हास होण्याचें मुख्य कारण देशांतील रहदारीचे रस्ते नीट ठेवले गेले नाहींत हें होय. रस्ते बिघडल्यामुळें निरनिराळ्या प्रांतांतलें दळणवळण बरोबर चालेना. म्हणून हेलासचे किंवा ग्रीसचे ग्रीक लोक हे कांस्टांटिनोपलच्या ग्रीक लोकांहून अगदीं भिन्न उत्पत्तीचे आहेत.

पूर्वरोमन बादशाही म्हणजे ग्रीस देशांतील रोमन बादशाही अखेरीस बुडाली. आरब व तुर्क मुसलमान लोक प्रबळ होऊन, कित्येक शतकेंपर्यंत ते तिजवर स्वाऱ्या करीत होते. त्यांनीं इजिप्ट व सिरिया ह्या देशांत ग्रीक सुधारणेचा अल्पसुद्धां अवशेष राहूं दिला नाहीं. ग्रीक लोकांची संख्यासुद्धां बहुतेक त्यांनीं नाहींशी केली. ग्रीसची रोमन बादशाही इ. स. १४५३ त तुर्क लोकांनीं कार्बाज

केली, आणि कांस्टांटिनोपल शहरीं तुर्कांनीं आपलें ठाणें दिलें, तें अद्यापि कायम आहे.

---

# प्रकरण सव्विसावें.

—:०:—

## ग्रीसच्या अर्वाचीन इतिहासाचा सारांश.

कांस्टांटिनोपल काबीज करून तुर्कांनीं आपलें राज्य युरोपांत स्थापिल्यावर ग्रीक लोकही त्यांच्याच ताब्यांत गेले. देशांत तुर्की अंमलदार कारभार करीत; त्यांस पाच्छा असें म्हणत. हे अंमलदार लोकांवर नानाप्रकारचा जुलूम करीत. प्रत्येक गांवावर गांवकामदार असत, त्यांस आगा असें म्हणत. ते पाच्छांच्या हाताखालीं काम करीत. ते व दुसरे अंमलदार जुलूम करूं लागले.

ग्रीक व तुर्क ह्यांमध्यें धर्मभेदांमुळें ऐक्य असें कधीं झालेंच नाहीं. त्यांजमध्यें लग्नव्यवहार होणें शक्य नव्हतें. ग्रीक लोकांच्या मनांत महंमद पैगंबराविषयीं पूज्यबुद्धि नसल्यामुळें, त्यांचें व तुर्कांचें नेहमींचें वांकडें पडलें.

तुर्की अंमलाखालीं ग्रीक लोक अज्ञानी व दरिद्री राहिले. त्यांचा देश जो पूर्वीं इतका सधन, दाट वस्तीचा व सुधारलेला होता, तो अगदीं उजाड दिसूं लागला. मोठमोठ्या भव्य इमारती पडून गेल्या, व ग्रीक कलेचे प्राचीन नमुने बहुतेक नष्ट झाले. पेलॉपोनेसस प्रांतास तुर्क लोक मोरिया असें म्हणूं लागले. त्यांत एकही स्थळ राहिलें नाहीं. कांहीं थोड्या थोडक्या प्राचीन वैभवाच्या खुणा मात्र दिसत होत्या.

खालच्या द्वीपकल्पापेक्षां उत्तर ग्रीसची स्थिति बरी होती. आथेन्स येथें पुष्कळ सन्मान्य कुटुंबें राहत होतीं; आणि आटिका-च्या अनेक गांवांत लोक सुखी होते. सणाच्या दिवसांत नाना-प्रकारचे खेळ व उत्सव चालत. तथापि देशाच्या निकृष्ट स्थितीचीं चिन्हें जिकडे तिकडे स्पष्ट दिसत होतीं.

समशीतोष्ण हवा व सुपीक जमीन ह्यांच्या योगानें देशांत धान्य पुष्कळ पिके. जवस, तांदूळ, कापूस व तंबाकू हे पिकाचे मुख्य जिन्नस होत. आटिका प्रांतांत पूर्वीप्रमाणेंच लोक उत्कृष्ट आलिव्ह फळें व रेशमाकरितां तुतीचीं झाडें तयार करीत. बहुतेक लोक गुरें राखण्याचा व मासे मारण्याचा धंदा करीत, आणि वाकांचे लांकडें विकून उदरनिर्वाह करीत.

प्राचीन काळचीं सर्व मोठमोठीं शहरें आतां कुग्राम स्थितींत आलीं. त्यांपैकीं कित्येकांत ग्रीक व्यापारी आणि दुसरे धनवान व मोठे लोक राहत. तथापि बहुतेक लोकांचीं घरें म्हटलीं म्हणजे भिकारड्या झोंपड्यापेक्षां विशेष चांगलीं नव्हतीं.

रोमन अमदानींत ग्रीक लोक रोमन लोकांचा पेहराव करीत. तुर्की अंमलाखालीं त्यांनीं तुर्की लोकांचा पेहेराव स्वीकारिला. गरीब लोक अंगांत लहानसें कुडतें आणि डोक्याला टोपी घालीत.

इ. स. १७७२ त रशियाच्या चिथावणीनें ग्रीक लोकांनीं तुर्की सरकाराविरुद्ध बंड केलें. हें बंड तुर्की सरकारानें मोडिलें. तथापि आपलें राज्य स्वतंत्र करण्याविषयीं सर्व ग्रीक लोकांच्या मनांत उत्कट इच्छा उत्पन्न झाली. इ. स. १८१७ त ग्रीक लोकांनीं पुनः बंड केलें. त्यांचा मुख्य आल्बियन सरदार अली पाच्छा हा होता. त्याच्या मदतीनें बंडवाल्यांनीं पुष्कळ वर्षेंपर्यंत तुर्की सरकाराशीं झगडा केला. इ. स. १८२२त लढाई होऊन अली पाच्छा मारला गेला. तरी ग्रीक लोकांनीं आपला उद्योग सोडिला नाहीं. प्रथमतः ह्या झगड्याकडे कोणीं फारसें लक्ष दिलें नाहीं. पण हळू हळू ग्रीक लोकांबद्दल युरोपियन राष्ट्रांच्या मनांत, विशेषतः फ्रान्स आणि इंग्लंड ह्या देशांत, मोठी सहानुभूति उत्पन्न झाली. ग्रीक लोकांस मदत करण्याकरितां पुष्कळ राष्ट्रांचे लोक स्वतः ग्रीस देशांत गेले, आणि अनेकांनीं वर्गण्या जमवून त्यांस पैशाचा पुरवठा केला.

अशा प्रकारें आणखी सहा वर्षें कमजास्त जोराचें युद्ध चाललें. त्यांत तुर्क लोकांनीं आथेन्सला वेढा घालून तें शहर काबीज केलें.

तेव्हां ग्रीक लोकांचा पक्ष बुडण्याच्या बेतांत आला. अशा आणी-बाणीच्या प्रसंगीं काउंट कपो डिस्ट्रयास (Count Capo d'Istrias) नांवाचा एक ग्रीक गृहस्थ रशियाच्या नोकरींत होता, त्यास ग्रीक लोकांनीं परत बोलावून आपला कारभार पाहण्यास सांगितलें. त्यानें प्रेसिडेंट असें नांव धारण करून एक प्रकारची सुव्यवस्थित राज्य-पद्धति बनविली; आणि जे लोक स्वतंत्रतेकरितां निरनिराळ्या ठिकाणीं झगडत होते, त्यांची एक चांगली फौज तयार केली.

कपो डिस्ट्रयासनें राज्यपद्धति सुव्यवस्थित केल्याबरोबर, ग्रेटब्रिटन, रशिया व फ्रान्स ह्यांनीं तुर्कांविरुद्ध ग्रीक लोकांचा पक्ष घेतला. ह्या राष्ट्रांनीं सुलतानास अशी सूचना केली कीं, नियमित खंडणी घेऊन ग्रीस देशास स्वातंत्र्य द्यावें. ही सूचना सुलतानानें मान्य केली नाहीं. तेव्हां वरील राष्ट्रांनीं त्याजबरोबर उघड युद्ध सुरू केलें. नॅव्हॅरिनोच्या उपसागरांत एक निकराची लढाई स. १८२७ त झाली, तींत इजिप्ट व टर्की ह्यांचीं आरमारें नाश पावलीं. पुढें दोन वर्षांनीं रशियानें तुर्की फौजेवर जय मिळविला. तेव्हां स. १८२९त ग्रीस देश स्वतंत्र आहे असें सुलतानास कबूल करणें भाग पडलें.

सर्व राष्ट्रांनीं ह्या नवीन ग्रीक राज्याची मर्यादा ठरवून दिली. त्यास पूर्वीचें हेल्लॉस हें नांव देऊन बव्हेरियाच्या राजाचा दुसरा मुलगा ओथो ह्यास स. १८३२त ह्या राज्यावर बसविलें. पण ही राज्यव्यवस्था लोकांस पसंत पडली नाहीं. पहिल्याच वर्षीं लोकांनीं राजास पदच्युत केलें.

पुढें एक वर्षानें डेन्मार्कच्या राजाचा दुसरा मुलगा पहिला जॉर्ज, 'हेलेन्सचा राजा,' ह्या नांवानें आथेन्सच्या गादीवर बसला. तेव्हांपासून अनेक सुधारणा सुरू झाल्या. तरी उत्कृष्ट सृष्टिवैभव व समशीतोष्ण हवा असूनही, अद्यापि ग्रीस देशाचे पुष्कळ भाग पडित आहेत. कॉरिंथच्या संयोगिभूमींतून जलमार्ग खोदण्यांत आला आहे. व्यापाराचे नवीन नवीन उद्योग सुरू झाले आहेत. हल्लींचे ग्रीक लोक राज्यकारभाराच्या कामांत चांगली हुशारी दाखवीत आहेत; आणि राष्ट्रीय शिक्षणाच्या बाबतींत अतिशय यत्न

सुरू आहे. ह्यावरून फ्रान्स, इंग्लंड व रशिया ह्यांनीं उद्धार केलेलें हें ग्रीसचें नवीन राज्य लवकरच चांगल्या भरभराटीस येईल, अशी आशा वाटते.

---

## प्राचीन नगरराज्यांचें अंतःस्वरूप.

आथेन्स, कॉरिंथ, अगर रोमसारख्या प्राचीन काळच्या एखाद्या शहरांत आपण आहों अशी कल्पना करूं, आणि आपणांस कायकाय प्रकार दिसतात तें पाहूं.

आपलें सर्वस्व काय तें हें शहर. आपला सगळा देश, आपलें सगळें राज्य, आपले सगळे लोक व धर्म, सर्व कांहीं ह्या एका शहरांत आहे. शहराच्या बाहेर आपलें कांहीं नाहीं. सर्व व्यवहार ह्या एका शहरांत चालावयाचे. कोणीं एखाद्या खंडोबा अगर विठोबासारख्या देवानें प्राचीन काळीं हें शहर स्थापिलें. त्या देवाचें प्रस्थ येथें मोठें आहे. त्याची पूजाअर्चा येथें हमेश होत असते. त्या देवाचे मदतनीस दुसरे आणखी पुष्कळ देव आहेत. त्या सर्वांच्या मूर्ति व मंदिरें शहरांत अनेक ठिकाणीं आहेत. मंदिरें, बागा, राई, गुहा, डोंगर, तळीं, झरे वगैरे प्रकारचीं निरनिराळ्या देवतांनीं निर्माण केलेलीं पवित्र स्थळेंही जिकडे तिकडे आहेत. आथिनी देवीनें येथें भाला मारल्याबरोबर भूमींतून एक झाड निर्माण झालें, तें हें आलिव्ह झाड. दुसऱ्या एका देवीनें पाणी उत्पन्न केलें, तो हा झरा. एका साधूनें तपश्चर्या केली ती ही गुहा. हा स्वयंभू दगड, इत्यादि अनेक प्रकार असावयाचे.

ह्या देवांची पूजा होते, तींत फक्त नगरवासी लोक मात्र सामील होऊं शकतात. गुलामांस नागरिकांचे हक्क नाहींत, तसेंच दुसऱ्या शहरांतून ह्या शहरांत कोणत्याही कारणानें परकी लोक आले, तर त्यांसही येथें कांहीं हक्क नाहींत. येथील लोकांस आपलें शहर सोडून कायमचें बाहेर जातां येत नाहीं. शहर सोडून गेला कीं, तो हद्दपार झाला व आपल्या हक्कांस मुकला असें समजावें. एक प्रकारचा इहलोकचा

मृत्युच तो. त्यास मग कोठेंही आश्रय मिळावयाचा नाहीं. एक इसम दुसऱ्या शहरीं पाहुणा गेला, तर त्या शहराच्या समाजांत व समारंभांत त्यास थारा मिळावयाचा नाहीं. त्यास तेथें पुरा बहिष्कार समजावा.

शहरांत दरसाल अनेक उत्सव व समारंभ व्हावयाचे. त्या वेळीं जिकडे तिकडे चित्रें, पुतळे वगैरे मांडून आरास व शृंगार होतात. सर्व अडचणी दूर ठेवून प्रत्येकानें समारंभास गेलेंच पाहिजे. सगळे समारंभ उघड्या जागेंत होतात. देवाची स्वारी निघते. वाद्यें, भजन, मंत्रघोष वगैरे चालतात. व्याख्यानें होतात. ह्या समारंभासाठीं श्रीमंत व भाविक लोक मंदिरें, चौक, कारंजीं, नाटकगृहें वगैरे आपल्या खर्चानें बांधून लोकोपयोगास देतात. दीपोत्सव, नाच, रंग, खेळ, शर्यती, नाटकें, कुस्त्या, टकरा, इत्यादि प्रकार उत्सवाचे अंगभूत असून ते पाहण्यास सर्वांस मोकळीक असते. पैसे पडत नाहींत.

गरिबांकरितां असले समारंभ मुद्दाम करविणें हें श्रीमंताचें कर्तव्य आहे. हरएक प्रकारें श्रीमंतांनीं गरिबांचा समाचार घेतला पाहिजे. रोम शहरीं श्रीमंत वकील गरिबांचे कज्जे फुकट चालवीतात. गरीबांस साह्य करणें, त्यांच्या सर्व सोयी करून देणें, त्यांच्यासाठीं स्नानगृहें वगैरे बांधणें, हें मोठें पुण्य आहे. श्रीमंत लोक आपले बाग गरिबांसाठीं उघडे ठेवितात; तसेंच वाडे, इमारती, व संपत्ति आपल्या पश्चात् गरिबांच्या उपयोगास देऊन टाकितात. प्रमुख लोकांस सार्वजनिक उत्सवांत मुख्य भाग घ्यावा लागतो. ते व्याख्यानें देतात, त्यांनीं लोकांचा अभिमान जागृत राहून कांहीं विशिष्ट आपत्प्रसंगीं तो अभिमान ज्यास्तच प्रदीप्त होतो. पेरिक्लाज, डेमॉस्थेनिस, सिपियो, सिसरो ह्यांचीं उत्कृष्ट भाषणें ऐकून कोणाच्या अंतःकरणांत स्वाभिमानज्योत पेट घेणार नाहीं !

राज्यकारभारांत प्रत्येक नगरवाशास हक्क असतो. हल्लींच्या सारखे त्यास आपले प्रतिनिधि नेमावे लागत नाहींत. सर्वजण एकत्र जमून आपले कायदे करितात. जणूं काय, सर्व नगर म्हणजे हल्लींचा एक क्लबच होय. त्या शहरांचा विस्तारही कांहीं मोठा नाहीं. लाख पंन्नासहजार लोक असले म्हणजे पुष्कळ. सभोंवार

तट आहेत. तटाच्या बाहेर वस्ती नाहीं. तट संपला कीं जंगल लागलें. शहरांत स्वच्छता अशी कांहीं अप्रतिम असावयाची, कीं हल्लींच्या आरोग्यखात्यास त्याचें आश्चर्यच वाटेल. शहरांत, नदींत, तलावांत अगर अन्यत्र कोणीं कांहीं अस्वच्छता अगर दुर्गंधी केली कीं, त्या त्या देवता रुष्ट झाल्याच. ह्या भीतीमुळें सर्व लोक स्वच्छ राहतात. म्हणजे सर्व व्यवहार धार्मिक बंधनांनीं नियमित केले आहेत. हल्लीं मोठमोठ्या शहरांतून गरीब लोकांस अतिशय अस्वच्छ व घाणेरड्या स्थितींत राहावें लागतें, तसा प्रकार ग्रीक लोकांत नाहीं. ग्रीक लोक कधीं असे अस्वच्छ राहणार नाहींत. त्यांस कोणी समाजांत येऊंच देणार नाहीं. म्हणून शरीर व वस्त्रें धुणें, घांसणें चोळणें, साफ करणें, हा ग्रीक लोकांचा सर्वांत मोठा उद्योग. स्त्री असो, वा पुरुष असो, स्नान केल्याशिवाय कोणी राहवयाचा नाहीं. रोमन लोकांस तर ह्या स्नानाचें मोठेंच वेड. पांच पांच हजार लोक स्नान करूं शकतील अशीं मोठमोठीं अनेक स्नान-गृहें शहरांत असावयाचीं; आणि तेथेंच नाटकें, खेळ व्याख्यानें वगैरे व्हावयाचीं.

एवढ्यावरून म्हणजे ग्रीक लोकांत अनिष्ट प्रकार कांहीं नाहींत असें समजूं नये. युद्धें व लढाया नेहमीं चालू असतात. त्यांस एवढेंसें कारण पुरे होतें. एका नगरानें दुसऱ्या नगरास जिंकिलें, कीं, तें सर्व नगर जमीनदोस्त होतें. येथें शहर होतें अशी खूण सुद्धां राहवयाची नाहीं. दुसरें, प्रत्येक शहरांत गुलामांचा भरणा मोठा. शंभर लोकवस्तीपैकीं जवळजवळ नव्वद गुलाम असतात. ह्या गुलामांची स्थिति शुद्ध जनावरांसारखी. त्यांस कांहीं एक हक्क नाहींत. धन्यासाठीं काबाड कष्ट करून त्यांचा जाच सहन करावा एवढ्यासाठींच त्यांचें जिणें. स्त्रियांची स्थिति बहुतेक गुलामांसारखीच. घरचे नोकर म्हणजे स्त्रियाच. अशा ह्या प्राचीन नगरराज्यांस अर्वाचीन काळची राष्ट्र ही संज्ञा कशी देतां येईल?

